# अर्वाचीन मराठी

## व्याकरण, लेखन व वाङ्मय

लेखक

कृ. पां. कुळकर्णी, एम्. ए., बी. टी.

श्री. रा. पारसनीस, एम्. ए.


KARNATAK PUBLISHING HOUSE

BOMBAY

# प्रस्तावना

—: * :—

गेल्या अठरा वर्षांचा मराठी हा विषय दुय्यम शाळांतील वरील वर्गांत शिकविण्याचा आमचा स्वतांचा अनुभव जमेस धरून **अर्वाचीन मराठी** हें पुस्तक लिहिलें आहे. ह्यामध्यें मराठी व्याकरण, लेखन, भाषा व वाङ्मय ह्यांचा थोडक्यांत परिचय इत्यादि बाबी विवेचिल्या आहेत. ह्या सर्व विषयांचें विद्यार्थ्यांना कमींत कमी किती ज्ञान असावें हीच गोष्ट पुढें ठेवून त्या त्या विषयाची मांडणी केली आहे व ती करतांना मराठी भाषेचें अर्वाचीन स्वरूप प्रामुख्यानें विचारांत घेतलें असलें तरी त्याला उपयोगी पडणारी इतर माहितीहि पण थोडक्यांत दिली आहे. विद्यार्थ्यांच्या स्वतंत्र बुद्धीला चालना देण्यासाठीं त्या त्या प्रकरणाच्या शेवटीं नवीन पद्धतीस अनुसरून अभ्यास दिला आहे.

सध्यां मराठी हा विषय विद्यापीठाच्या अभ्यासक्रमांत अधिक अधिक येऊं लागल्यामुळें त्या विषयाच्या अध्ययनासंबंधीं पूर्वींच्या कल्पना सांप्रत सोडणें प्राप्त आहे. अशा वेळीं नवीन पद्धतीवर आधारलेलें हें पुस्तक विद्यार्थ्यांना उपयोगी पडेल अशी ग्रंथकर्त्यास खात्री वाटते.

ट्रेनिंग कॉलेजमधील वरील वर्गांनाहि हें पुस्तक उपयोगी पडण्यासारखी त्याची रचना आहे.

लेखक

# दुसऱ्या आवृत्तीची
# प्रस्तावना

—:०:—

आमच्या ह्या प्रयत्नाचा महाराष्ट्रांतील हायस्कूल्सच्या चालकांनीं पुरस्कार करून आमच्या पुस्तकाची दुसरी आवृत्ति काढण्याचा सुयोग आणून दिला ह्याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहों. आमच्या शिक्षक व प्राध्यापक स्नेह्यांनीं ज्या कांहीं सूचना केल्या त्यांचा अंतर्भाव प्रस्तुत आवृत्तींत केला आहे. मराठी वाङ्मयाची आजपर्यंतची माहिती विद्यार्थ्यांना असावी ह्या हेतूनें त्या प्रकरणांत कांहीं थोडी माहिती अधिक घातली आहे.

लेखक

# अनुक्रमणिका



**भाग ३—भाषा व वाङ्मय**

# अर्वाचीन मराठी

## भाग १

## व्याकरण



### प्रास्ताविक

१. भाषा हा शब्द भाष्=बोलणे ह्या संस्कृत धातूपासून निघाला आहे. आपल्या मनांतील विचार दुसऱ्यास कळवावयाचे असले म्हणजे आपण बोलतों. ह्या आपल्या बोलण्यास **भाषा** असे म्हणतात.

कधीं आपण आपल्या मनांतील भाव मुक्या माणसाप्रमाणे डोळे मिचकावून किंवा हातानें खुणा करून कळवितों. कधीं चित्रें काढूनहि आपण आपला भाव दुसऱ्यास कळवितों. ह्या प्रकारांना **भाषा** म्हणावयास हरकत नाहीं.

एक कुत्रा दुसऱ्या कुत्र्यावर भोंकतो. गाय आपल्या वासरास जवळ बोलावण्यासाठीं हंबरते. मांजर म्यँव् म्यँव् करतें व दुधाजवळ जातें. कावळा काव काव करतो. प्राण्यांचे निरनिराळे आवाज हे त्या त्या प्राण्यांच्या **भाषाच** होत.

मनुष्याची भाषा ही इतर सर्व प्राण्यांच्या भाषाहून निराळी आहे. मनुष्य आपल्या मुखांतील इंद्रियांच्या साहाय्यानें निरनिराळे ध्वनि काढतो. मनुष्याची भाषा निरनिराळ्या ध्वनींची बनलेली आहे.

भाषा ही मनुष्यास फार उपयोगी आहे. जगांतील सर्व मानवजातीच्या व्यवहाराचें सोपें साधन म्हणजे भाषा होय. मनुष्यप्राणी जन्मास येऊन त्यानें व्यवहार सुरू केल्यापासून भाषा सुरू झाली आहे. अशा रीतीनें भाषा ही मनुष्याइतकीच जुनी आहे.

२. व्यवहारामध्यें आपला जगांतील निरनिराळ्या वस्तूंशीं संबंध येतो. ह्यांतील प्रत्येक वस्तूचा द्योतक असा एक ध्वनिसमूह आपण तयार करतों.

ह्या ध्वनिसमूहाच्या साहाय्यानें ती वस्तु दाखविली जाते. जितक्या वस्तु तितके त्यांचे दर्शक ध्वनिसमूह असतात. ह्या ध्वनिसमूहास **शब्द** असें म्हणतात.

३. ध्वनिसमूहाच्या किंवा शब्दाच्या साहाय्यानें वस्तु दाखविली जाते हे खरें; परंतु एकट्या शब्दाचा अर्थ आपल्या व्यवहारास उपयोगी पडत नाहीं. तो अपुरा अर्थ आहे. असा व्यवहारोपयोगी अर्थ साधण्याकरितां निरनिराळ्या योग्य अशा शब्दांचे समूह आपणांस वापरावे लागतात. ह्या व्यवहारोपयोगी अर्थ साधणाऱ्या शब्दसमूहास **वाक्य** असें म्हणतात

हे ध्वनिसमूह किंवा शब्द वापरून आपण **वाक्य** तयार करतों व भाषा बोलतों व आपला व्यवहार चालवितों. हे शब्द सुद्धां आपण कांहीं ठराविक पद्धतीनें वापरतों. ते कसे बनतात, ते कसे वापरले जातात, त्याचे प्रकार, जाती काय व कोणत्या, वाक्याचे प्रकार कोणते वगैरे बाबींसंबंधीं कांहीं ठराविक नियम आहेत. हे नियम ज्या शास्त्रांत सांगितले आहेत त्या शास्त्रास **व्याकरण** असें म्हणतात.

भाषा फार जुनी आहे. भाषा अगोदरची व व्याकरण नंतरचें. भाषेच्या नंतरच व्याकरण तयार होतें.

४. जगामध्यें मनुष्यांची संख्या फार आहे. त्या सर्वांची एक भाषा असणें अशक्य आहे. निरनिराळ्या देशांतील लोकांच्या भाषा निरनिराळ्या आहेत. तसेंच कांहीं जातींत निरनिराळ्या भाषा चालू असलेल्या आढळतात. आर्य, तुराणी, मंगोली, द्राविडी, शिमी, बांटु ह्या जगांतील भाषांचे कांहीं मुख्य वर्ग आहेत.

५. आपली मराठी भाषा ही पहिल्या आर्य भाषांच्या वर्गांतील आहे. याच वर्गांतील संस्कृत, पाली, माहाराष्ट्री वगैरे प्राकृत, अपभ्रंश ह्या भाषा होऊन गेल्या. सध्यां हिंदी, बंगाली, गुजराती, सिंधी, उरिया इत्यादि हिंदुस्थानांत चालू असलेल्या भाषा ह्याच वर्गांतील आहेत. युरोपांतील इंग्रजी, फ्रेंच, जर्मन, लॅटिन, ग्रीक वगैरे भाषा ह्याच आर्यवर्गांतील होत. दक्षिण हिंदुस्थानांतील कानडी, तामील, तेलगु, मल्याळी, तुलु वगैरे भाषा द्राविडी वर्गांतील होत. अरबी, फारशी वगैरे ह्या भाषा तुराणी वर्गांतील होत. मंगोली वर्गांतील चिनी, तिबेटी, जपानी ह्या होत. बांटु भाषा आफ्रिकेंत आढळतात.

६. ह्यावरून खालील गोष्टी ध्यानांत ठेवाव्यात :—

१. जगांत निरनिराळ्या लोकांच्या निरनिराळ्या भाषा आहेत.

२. आर्य, द्राविडी वगैरे त्यांचे वर्ग असून 'मराठी' ही आर्यवर्गांतील आहे.

३. भाषा ही वाक्यांची बनलेली आहे.

४. वाक्य हें शब्दांचें बनलेलें आहे.

५. शब्द हा अक्षरांचा ( ध्वनि दाखविणाऱ्या चिन्हांचा ) बनलेला आहे.

६. वर्णांच्या लिखित चिन्हास अक्षर म्हणतात; अक्षराच्या उच्चाराला वर्ण ही संज्ञा आहे. अक्षर आणि वर्ण हे शब्द एकाच अर्थी वापरतात.

भाषेंत स्वर व व्यंजनें किंवा वर्ण ही पहिली अवस्था आहे व वाक्य ही शेवटची अवस्था आहे. व्याकरणांत **वर्ण, शब्द, वाक्य, भाषा** इतक्या सर्वांचा विचार येतो व तोच विचार पुढें क्रमानें केला आहे.

## वर्णसिद्धि

७. **वर्ण** :—आपण आपल्या मुखांतील कंठ, जिभेवरील तोंडांतील भाग, दांत, ओट इत्यादि अवयवांच्या साहाय्यानें ध्वनि काढतों. फुफ्फुसांतील श्वास बाहेर येतांना ह्या अवयवांपैकीं कांहींवर आदळतो व नाक किंवा तोंड यांतून बाहेर पडतो कीं लगेच कांहीं तरी उच्चार उत्पन्न होतो. हे उच्चार दाखविण्यासाठीं त्यांना कांहीं चिन्हें ठरविलीं आहेत. अ, आ, इ, उ, ऐ, क्, म्, क्त इत्यादि हीं निरनिराळ्या उच्चाराचीं चिन्हें होत. ह्यांना **वर्ण** म्हणतात.

अ, इ, क्, प्, ट् इत्यादि साधे उच्चार किंवा ध्वनि आहेत; म्हणून त्यांचीं चिन्हे हे **साधे वर्ण** होत.

क्+अ, प्+अ, क्+आ, ह्यांत दोन ध्वनींचें मिश्रण आहे. ह्यांना साधे **मिश्र वर्ण** म्हणतात.

क्+त्+अ=क्त; क्+र्+अ=क्र; हे संयुक्त उच्चार होत. ह्या चिन्हांना **संयुक्त वर्ण** म्हणतात.

८. 'का' हें एक अक्षर. 'त' हें एक अक्षर. 'का' हें एक, 'पू' हें दुसरें, 'स' हें तिसरें अक्षर. अशीं एक किंवा अधिक अक्षरें एकमेकांजवळ ठेवून त्यांपासून कांहीं अर्थ उत्पन्न झाला म्हणजे त्या अक्षराला किंवा अक्षरांना **शब्द** म्हणतात.

बीं, कात, कापूस हे शब्द निरनिराळीं अक्षरें एकमेकांजवळ ठेवून बनलेले आहेत.

हे असले शब्द एकमेकांजवळ ठेवून निरनिराळ्या संबंधानें जोडले आणि त्यांपासून व्यवहाराला उपयोगी असा अर्थ उत्पन्न झाला म्हणजे त्या सर्व शब्द-समूहाला **वाक्य** म्हणतात.

१. ध्वनि किंवा उच्चार ह्याचें दर्शक चिन्ह म्हणजे **वर्ण**.

२. वर्णांचा अर्थ उत्पन्न करणारा समूह म्हणजे **शब्द** होय.

३. शब्दांच्या योगानें **वाक्य** तयार होतें.

४. वाक्यांच्या योगानें **भाषा** तयार होते.

९. **वर्णांची संख्या**:—मराठी भाषेंत वर्णांची संख्या ४८ मानिली आहे.

(१) जे वर्ण दुसऱ्या वर्णांच्या साहाय्यावांचून स्वतंत्रपणें स्पष्ट उच्चारतां येतात त्यांना **स्वर** म्हणतात. हे चौदा आहेत:—
अ, आ, इ, ई, उ, ऊ, ऋ, ॠ, ऌ, ॡ, ए, ऐ, ओ, औ.

(२) जे वर्ण स्वतंत्रपणें उच्चारतां येत नाहींत, ज्यांना उच्चारासाठीं दुसऱ्या वर्णांचें साहाय्य लागतें त्यांना **व्यंजनें** म्हणतात. उदा०— क्, ख्, ग्, घ्, प्, फ् इत्यादि.

व्यंजनांचा उच्चार पूर्ण होण्यासाटीं त्यांना स्वरांचें साहाय्य लागतें.

अनुस्वार आणि विसर्ग ह्यांचे अनुक्रमें उच्चार 'म्', 'न्' आणि 'स्', 'ह्' ह्या वर्णांच्या उच्चारांसारखे होतात. हे उच्चारहि स्वरांच्या साहाय्याशिवाय होत नाहींत, म्हणून हीं **व्यंजनें** आहेत. हे उच्चार अनुक्रमें ं, ः असे दाखवितात.

**१०. वर्णांचे प्रकार व जाती** :—स्वरांमध्यें अ, इ, उ हे थोडक्या वेळांत उच्चारतां येतात म्हणून यांना **ऱ्हस्व स्वर** म्हणतात.

हाच उच्चार थोडा लांबविला म्हणजे **दीर्घ स्वर** तयार होतात. उदा०—आ, ई, ऊ.

ए, ऐ, ओ, औ—ह्या स्वरांना **संहित स्वर** किंवा **संयुक्त स्वर** म्हणतात. ह्यांमध्यें दोन विजातीय स्वरांचा संयोग झाला आहे.

**११.** व्यंजनें उच्चारतांना तोंडांतून बाहेर पडणाऱ्या श्वासास कंठ, तालु, ( जिभेवरील छपर ), मूर्धन् ( तालूजवळील मागचा भाग ), दांत, ओंठ ह्यांपैकीं कोणत्या तरी अवयवाशीं स्पर्श होतो. हवेचा स्पर्श अवयवाशीं होतो म्हणून ‘ क् ’ पासून ‘ म् ’ पर्यंतच्या व्यंजनांना ‘ **स्पर्शवर्ण** ’ असें म्हणतात.

त्यांचे प्रकार खालील तक्त्यांत दिले आहेत :—

| स्वर. | व्यंजनें. | स्पर्शाचें स्थान. | वर्गाचें नांव. |
|---|---|---|---|
| अ, आ, | क्, ख्, ग्, घ्, ङ्, ह्, | कंठ | कंठ्य |
| इ, ई, | च्, छ्, ज्, झ्, ञ्, श्, | तालु | तालव्य |
| ऋ, ॠ, | ट्, ठ्, ड्, ढ्, ण्, ष्, ळ्, | मूर्धन् | मूर्धन्य |
| ऌ, ॡ, | त्, थ्, द्, ध्, न्, स् | दंत | दंत्य |
| उ, ऊ, | प्, फ्, ब्, भ्, म्, | ओष्ठ | ओष्ठ्य |

य् र् ल् व् ह्यांना **अर्धस्वर** म्हणतात. कारण ह्यांच्यावेळीं स्पर्श पूर्णपणें होत नाहीं. ह्यांना **ईषत् स्पृष्ट व्यंजनें** म्हणतात.

श्, ष्, स्, ह् ह्या वर्णांना ‘ **ऊष्मे** ’ म्हणतात.

ए, ऐ, हे वर्ण **कंठतालव्य** आहेत.

ओ, औ हे वर्ण **दन्त्यौष्ठ्य** आहेत.

व्यंजनांचे पांच वर्ग वर दिले आहेत. प्रत्येक वर्गांत पांच व्यंजनें आहेत. पहिलीं दोन व्यंजनें **कठोर** व शेवटचीं तीन व्यंजनें **मृदु** होत. पहिलें व तिसरें व्यंजन ह्यांना **अल्पप्राण व्यंजनें** व दुसरें व चौथें ह्या व्यंजनांना **महाप्राण व्यंजनें** असें म्हणतात. शेवटच्या व्यंजनास **अनुनासिक** म्हणतात.

**अल्पप्राण व्यंजनें** :—क् ग्, च् ज्, ट् ड्, त् द्, प् ब्.

**महाप्राण व्यंजनें** :—ख् घ्, छ् झ्, ठ् ढ्, थ् ध्, फ् भ्.

**कठोर** :—क् ख्, च् छ्, ट् ठ्, त् थ्, प् फ्, श् ष् स्, ळ्.

**मृदु** :—ग् घ् ङ्, ज् झ् ञ्, ड् ढ् ण्, द् ध् न्, ब भ् म्, य् र् ल् व् ह्.

**अर्धस्वर** :—य् र् ल् व्.

**अनुनासिक** :—ङ् ञ् ण् न् म्.

**१२.** आधुनिक मराठींत ह्या वर दिलेल्या ४८ वर्णांपैकीं कांहीं वर्ण आढळून येत नाहींत. इतर कांहीं वण असे आहेत कीं, ते सध्यांच्या मराठी भाषेंत नव्यानेंच आढळतात.

स्वरांपैकीं ऋ, ॠ, ऌ, ॡ हे वर्ण सध्यांच्या मराठींत विशेष आढळत नाहींत. ऱ्हस्व ऋ कांहीं थोडासा आढळतो. परंतु दीर्घ ॠ, ऌ, ॡ हे वर्ण कधीं वापरले जात नाहींत.

व्यंजनांपैकीं ङ्, ञ् हे वर्ण फारच क्वचित् वापरलेले आढळतात.

**१३.** मराठींतील पुढील वर्ण उल्लेखनीय आहेत :—

१. ज्या वर्णाचा पहिला वर्ण अनुनासिक आहे व दुसरा वर्ण हकार आहे असा संयुक्त वर्ण मराठींत आहे. उदा०—चिन्ह, ब्रम्ह.

२. मराठींत अनुनासिक व अर्धवर्ण ( अर्धस्वर ) ह्याचे महाप्राण ( हकारमिश्रित ) आहेत. उदा०—कण्हेर, पन्हें, म्हाळसा, नव्हे, तऱ्हा, वल्हें.

३. मराठींत **तालव्य** व **दन्त्यतालव्य** असे तालव्याचे दोन प्रकार सध्यां रूढ आहेत.

**तालव्य** :—उदा० चार, विचार, उच्चार, वांछा, छत्र, जन, राजपुत्र.

**दन्त्यतालव्य** :—उदा०—चारा, चादर, जाण, जड, जवळ, झट, झगडा, झाड, झोका. ( दन्त्यतालव्य ‘ छ ’ चें उदाहरण सांपडत नाहीं ).

४. मूर्धन्य वर्णांच्या उच्चारांत एक विशेष लकब दृष्टीस पडते. ह्यांचा उच्चार कधीं नरम तर कधीं कडक केला जातो. हे वर्ण शब्दाच्या आरंभीं किंवा अंतीं येऊन द्वित्त झाले किंवा ह्यांच्या मागें

अनुनासिक असला तर त्यांचा उच्चार कडक होतो. परंतु ते इतरत्र आले तर त्यांचा उच्चार नरम व ओझरता होतो.

उदा०—टपका–अटप; टाईप–पटाईत; डकणें–अडकणें; ढका–चढण; खड्डा–खडा; खोण्ड–खोड; कण्ठ–कठडा.

डाग' व 'बडबड' ह्या दोन्ही शब्दांत 'ड'चा उच्चार सारखा नाहीं.

५. इंग्रजी वगैरे परकी भाषांच्या संसर्गानें मराठींत कांहीं उच्चार नवीन आले आहेत व येत आहेत.

तोकडा 'अ' उच्चार हा फारशी किंवा द्राविडी भाषांतून आला आहे.

उदा०—गवूत, गड्बड, सर्कार इ०; तसेंच विवृत अॅ, ऑ हे उच्चार नवे येऊं पाहत आहेत.

**१४. अनुस्वार** :—अनुस्वार ह्या शब्दाचा शब्दशः अर्थ पाठीमागून झालेला उच्चार. हा उच्चार नाकांतून होतो. हा ∸ अशा टिंबानें दाखवितात.

वर्णाच्या प्रत्येक वर्गाच्या शेवटच्या वर्णास **अनुनासिक** म्हणतात. 'ङ् ञ् ण् न् म्' हे अनुनासिक वर्ण होत. ह्यांनाच संस्कृतमध्ये **परसवर्ण** म्हणतात.

मराठीमध्ये अनुनासिक व्यंजनाच्या ऐवजीं अनुस्वार देण्याची पद्धत आहे. उदा०–पंक, पंच, पंडित, कुंभ. सध्यांच्या मराठींत पुन्हां संस्कृतप्रमाणें किंवा उच्चाराप्रमाणें हा उच्चार अनुनासिक वर्णानें लिहिण्याचा प्रकार कांहीं थोड्या लेखकांच्या लेखनांत आढळतो. उदा०–तण्टा, पङ्क, पञ्च किंवा पन्च, कुम्भ.

अनुस्वार म्हणजे य् र् ल् व् श् ष् स् ह्या व्यंजनांपूर्वीच्या अक्षरावर येणारा नाकांतून उच्चार हा होय. उदा०–संयोग, संरक्षण, संवाद, दंश, दंष्ट्रा, सिंह.

परंतु हेहि उच्चार "सॅय्योग, संवूरक्षण, सव्वाद, दंवृश, सिंव्ह" अशा पद्धतीनें कधीं कधीं कांहीं लेखक लिहितात.

अनुस्वाराचे उच्चार दोन आहेत :—एक स्पष्ट व दुसरा ओझरता. हा दुसरा ओझरता उच्चार सध्यांच्या मराठींत नाहींसा होत चालला आहे किंवा नाहींसा झाला आहे.

**स्पष्ट उच्चार** :—उदा०—पंक, पंखा, पंच, पंजा, पंडित, प्रांत, पिंपळ इ.

**ओझरता उच्चार** :—उदा०—कांकडी, चांचणी, तातडी, पांच, हें, तें, गहूं, त्यानें, फळें, करणें, साठीं इ.

हे ओझरते अनुस्वार कांहीं ठिकाणीं पूर्वीच्या स्पष्ट अनुस्वाराचे अवशेष असतात. उदा०—पांच (पंच), कांच (कांस्य), तर कांहीं ठिकाणीं इतर कांहीं कारणांनीं आलेले असतात. उदा०—हांस, केंस, धांव.

अनुस्वाराचा हा ओझरता उच्चारहि उच्चारण्यांत कमी कमी होऊं लागला आहे. तो अनुच्चारित होऊं लागला आहे.

१५. **विसर्ग** :—विसर्ग ह्याचा शब्दशः अर्थ श्वास सोडणें असा आहे. 'ह्' ह्या व्यंजनाच्या उच्चारास जोरानें हिसडा देऊन तोंडांतून हवा एकदम सोडली म्हणजे विसर्गाचा उच्चार होतो. उदा०—दुःख, अंतःकरण, प्रायः.

हा उच्चार संस्कृत शब्दांमध्यें फार येतो. क्वचित् मराठी शब्दांत येतो. उदा०—छिः, थूः, अः.

ह्याचा उच्चार 'ह्' किंवा 'स्' सारखा होतो. क्वचित् श् किंवा ष् सारखाहि होतो. उदा०—दुश्शासन, दुष्परिणाम.

---

## संधि

१६. सध्यांच्या मराठी भाषेंत दोन शुद्ध मराठी शब्द जवळ जवळ आले असता त्यांचे शेवटचे व आरंभाचे वर्ण प्रायः एकमेकांत मिसळून जात नाहींत. त्यांचा संधि न करण्याकडे विशेष रोंख आहे. वर्णांचा संधि हा त्याच्या जलद उच्चारामुळे होतो. तरी पण सध्यांच्या मराठींत संधि करण्याची प्रवृत्ति कमी आहे. मराठींत संस्कृत भाषेंतून बरेच शब्द आले असल्यामुळे त्यांचे संधि होतात व हे संस्कृतमधील नियमानें होतात. हे नियम पुढें दिले आहेत.

१७. जेव्हां दोन वर्ण एकापुढें एक असे होऊन ते दोन्ही वर्ण एकमेकांमध्यें मिळतात तेव्हा त्याच्या मिळणीस **संधि** असे म्हणतात.

पहिल्या शब्दाचा शेवटचा (अन्त्य) वर्ण व दुसऱ्या शब्दाचा पहिला (आद्य) वर्ण हे एकमेकांस मिळतात.

१८. संधीचे प्रकार दोन आहेत :—१ स्वरसंधि. २ व्यंजनसंधि.

१. ज्यावेळेस दोन स्वर एकमेकांत मिसळतात त्यावेळेस त्या संधीस **स्वरसंधि** म्हणतात.

उदा०—देव + आलय = देवालय. धुळ + अक्षर = धुळाक्षर.

२. दोन व्यंजनें अथवा व्यंजन व स्वर जेव्हां एकमेकांत मिसळतात तेव्हां त्या संधीस **व्यंजनसंधि** म्हणतात.

उदा०—षट् + रिपु = षड्रिपु. जगत् + आधार = जगदाधार.

स्वरसंधीचे प्रकार पुढीलप्रमाणें आहेत :—

१. एकाच जातीचे दोन स्वर, ऱ्हस्व किंवा दीर्घ, जेव्हां एकमेकात मिसळतात तेव्हां त्या दोहोंचा मिळून संधि तोच स्वर दीर्घ होऊन होतो. ह्या संधीस **सजातीय स्वरसंधि** म्हणतात.

वस्त्र + अन्न = वस्त्रान्न. धर्म + आश्रय = धर्माश्रय.

ब्रह्म + अर्पण = ब्रह्मार्पण. करी + इन्द्र = करीन्द्र.

कार्य + आरंभ = कार्यारंभ. नदी + ईश = नदीश.

सजातीय स्वरसंधि पुढीलप्रमाणें होतात :—

अ, आ + अ, आ = आ. उ, ऊ + उ, ऊ = ऊ.

इ, ई + इ, इ = ई.

२. जेव्हां दोन्ही स्वर भिन्न जातीचे असून एकमेकात मिसळतात तेव्हां त्यांच्या मिळणीस **विजातीय स्वरसंधि** म्हणतात.

ह्या स्वरसंधीमध्यें गुण, यणादेश हे दोन महत्त्वाचे फरक आहेत :—

(अ) अ किंवा आ ह्यांच्यापुढें इ, उ, ऋ हे ऱ्हस्व किंवा दीर्घ स्वर आल्यास त्या दोहोंबद्दल दुसऱ्या स्वराचा '**गुण**' म्हणजे अनुक्रमें ए, ओ, अर् होतो.

मुख + इन्दु = मुखेन्दु. गणेश + उत्सव = गणेशोत्सव.

देव + ऋषि = देवर्षि.

अपवाद – स्वैर, अक्षौहिणी इ.

(आ) ए, ऐ, ओ, औ, ह्यांचे पुढें कोणताहि स्वर आला तरी त्यांचे जागीं अनुक्रमें अय्, आय्, अव्, आव् असे आदेश होऊन त्यांच्या य्, व् मध्यें पुढील स्वर मिळतो. उदा०—

ने + अन = नयन　　ग + अन = गायन

नौ + इक = नाविक

(इ) अ किंवा आ यांच्यापुढें ए, ऐ; ओ, औ ह्यांपैकीं स्वर आल्यास 'ए, ऐ,' बद्दल 'ऐ' व 'ओ, औ' बद्दल 'औ' होतात.

राजा + ऐश्वर्य = राजैश्वर्य.　　जल + ओघ = जलौघ.

गंगा + ओघ = गंगौघ.

(ई) इ, उ, ऋ ह्या ऱ्हस्व किंवा दीर्घ स्वरांपुढें विजातीय कोणताहि स्वर आल्यास पहिल्या स्वराला यणादेश होतो. (म्हणजे अनुक्रमें य् व् र्) हे वर्ण येतात.

इति + आदि = इत्यादि.　　गुरु + इच्छा = गुर्विच्छा.

पितृ + आनंद = पित्रानंद.

३. मराठीमध्यें **पररूप** आणि **पूर्वरूप** असे स्वरसंधीचे आणखी दोन प्रकार आहेत.

(अ) जेव्हां दोन स्वर समोरासमोर येतात व दोहोंचा संधि दुसरा स्वर होतो तेव्हा **पररूपसंधि** होतो.

रेघ + ओटी = रेघोटी.　　घर + ईं = घरीं.

घर + आंतून = घरांतून.　　कर + ऊन = करून.

(आ) जेव्हां त्या दोन्ही स्वरांचा संधि पहिला स्वर कायम राहण्यांत होतो तेव्हां **पूर्वरूपसंधि** म्हणतात.

किती + एक = कितीक.　　चांगलें + असें = चागलेसें.

करितो + आहे = करितोहे.　　कांहीं + असा = कांहींसा.

२९. व्यंजनसंधीचे प्रकार पुढीलप्रमाणें आहेत :—

१. पहिल्या कठोर व्यंजनापुढें अनुनासिकाखेरीज मृदुव्यंजन किंवा स्वर आला म्हणजे पहिल्या कठोर व्यंजनाचें तिसरें व्यंजन होतें.

उदा०—षट् + रिपु = षड्रिपु.　　जगत् + ईश = जगदीश.

दिक् + विजय = दिग्विजय.　　सत् + आचार = सदाचार.

अपवादः—वाक् + मय = वाङ्मय　　सत् + मान = सन्मान.

२. ह्या प्रकारच्या उलट मृदु व्यंजनाच्या पुढें कठोर व्यंजन आलें म्हणजे पहिल्या मृदु व्यंजनाचें त्याच वर्गांतील पहिलें कठोर व्यंजन होतें.

उदा०—क्षुध् + पिपासा = क्षुत्पिपासा. शरद् + काल = शरत्काल.

३. पहिल्या पांच वर्गांतील कोणत्याहि व्यंजनापुढें जर अनुनासिक आलें तर त्या व्यंजनाचें त्याच वर्गांतील अनुनासिक होतें.

दिक् + मोह = दिङ्मोह. जगत् + नाथ = जगन्नाथ.
षट् + मास = षण्मास. सत् + मान = सन्मान.

४. 'म्' ह्या व्यंजनापुढें स्वर आल्यास तो स्वर त्या मकारात मिळतो. व्यंजन आल्यास 'म्' बद्दल त्या व्यंजनाच्या वर्गांतील अनुनासिक व्यंजन येतें.

सम् + आप्ति = समाप्ति. सम् + ताप = सन्ताप.
सम् + क्रान्त = सङ्क्रान्त. सम् + चय = सञ्चय.

५. त्, थ्, द्, ध्, ह्या दन्त्यव्यंजनापुढे जर चवर्ग किंवा टवर्ग ह्यांपैकीं एखादें व्यंजन आलें तर पूर्वीचें दन्त्य व्यंजन पुढील व्यंजनाच्या क्रमानें तालव्य (चवर्ग) किंवा मूर्धन्य (टवर्ग) होतें.

सत् + चरित्र = सच्चरित्र. सत् + टीका = सट्टीका.
सत् + जन = सज्जन.

६. विसर्गसंधीचे नियम खालीं मांडून दाखविले आहेत.

१ विसर्गाच्या मागें 'अ' व पुढें 'अ' अगर मृदुव्यंजन आले तर विसर्गाचा 'ओ' होतो.

रजः + गुण = रजोगुण मनः + रथ = मनोरथ
मनः + वृत्ति = मनोवृत्ति

अपवादः—पुनर्जन्म, अन्तर्गत. इ.

२ विसर्गाच्या मागें 'अ, आ' शिवाय इतर स्वर व पुढें मृदुव्यंजन अगर स्वर आला तर विसर्गाचा र् होतो.

बहिः + द्वार = बहिर्द्वार दुः + आत्मा = दुरात्मा

३. विसर्गाच्यापुढें क्, ख्, प्, फ्, आल्यास विसर्ग तसाच राहतो.
रजः+कण = रजःकण; अधः+पतन = अधःपतन.

४. विसर्गाच्या मागें इ, उ, असून तो विसर्ग प्रत्ययभिन्न असेल व त्यापुढें क्, ख्, प्, फ्, आल्यास विसर्गाबद्दल प्रायः ष् होतो.
निः + कारण = निष्कारण, निष्कपट, निष्पाप, निष्कळ.
परंतु दुः + ख = दुःख, निः+पक्ष = निःपक्ष

५. विसर्गाच्या पुढें च्, छ्, आल्यास त्याचा श्; त्, थ्, आल्यास स्; ट्, ठ्, आल्यास ष्, होतो.
शनैः+चर=शनैश्चर; अधः+तल=अधस्तल; रामः+टीकते=रामष्टीकते. कांहीं शब्दांत अनियमितपणानें विसर्गाचा 'स्' हि होतो.
उदा :—तिरस्कार, पुरस्कार, नमस्कार, यशस्कार.

### वर्णप्रक्रियेचे इतर प्रकार

२०. खालीं दिलेले महत्त्वाचे फरक सध्यांच्या मराठींत आढळून येतात.

कधीं कधीं एखादा जास्त वर्ण येतो. उदा०—लवकुश—लवांकुश, वानर—वांदर, घोरदर—घोरंदर, झूंज-झुंज, उच्च-उंच, भित्ति-भिन्त, कमर-कम्बर.

वर्णाचा लोपहि कधीं कधीं होतो. उदा०—रान ( अरण्य ), नंतर ( अनंतर ), यत्त ( ईयत्ता ).

एक + कामी — एकामी, केकत + ताड—केकताड; गुरे+राखी—गुराखी, रिकामी ( रिक्त + काम ) ह्या शब्दांमधील एक वर्ण लोपला आहे.

## मराठींतील आघात

२१. मराठी भाषेत शब्दावर आघात (जोर ) आहे कीं नाहीं ह्याबद्दल विद्वानांत एकमत नाहीं. आघात आहे असें कांहीं विद्वान म्हणतात तर तो नाहीं असे कांहीं म्हणतात. शब्दावर कांहीं ठिकाणीं उच्चारांत जोर आहे असे अनुभवास येतें. खेडेगांवातील लोकांच्या बोलण्यात अशा प्रकारचा जोर असल्याचे आढळांत येतें. शिवाय 'आघाता'मुळें कांहीं वेळां शब्दांच्या उच्चारांतील कांहीं वर्ण लोप पावतात, कांहीं नवीन येतात. त्यामुळे आघात असावासा वाटतो. मराठी भाषेच्या पूर्वीच्या संस्कृत, प्राकृत वगैरे भाषांत शब्दावर आघात असे. तेव्हां मराठी शब्दावरहि सध्यां आघात असला पाहिजे असें वाटतें.

सध्याच्या मराठींतील शब्दांच्या उच्चारांत जो आघात दिसतो त्यासंबंधीं खालील नियम देतां येतील :—

१. शब्दांतील उपान्त्य अक्षर दीर्घ असेल तर त्यावर जोर असतो. उदा०— कीर्ति, कांणा.

२. उपान्त्य अक्षर जर ऱ्हस्व असेल तर त्याच्या पूर्वीच्या अक्षरावर जोर असतो. उदा०—कीर्तन, वंळण, कांपड, बंध.

३. अर्धोच्चारित (तोकडा) 'अ' ज्या शब्दाच्या शेवटीं येतो त्या शब्दांत उपान्त्य अक्षरावर जोर येतो. उदा०—घंर, झांड, सडंक.

४. हा अर्धोच्चारित (तोकडा) 'अ' शब्दाच्या मध्यें आला तर त्याच्या पूर्वीच्या अक्षरावर तो आघात पडतो. उदा०—वंसकन, झंटकर.

५. संयुक्त व्यंजनाच्या पूर्वीच्या अक्षरावर जोर येतो, उदा०—हंल्ला, आंज्ञा, चिंत्र.

६. विसर्ग व अनुस्वार ह्यांनीं युक्त असलेल्या अक्षरावर जोर येतो. उदा०— दुं:ख, अन्तं:करण, अंक, अंश.

७. भिन्न अर्थाचे व सारख्या स्वरूपाचे दोन शब्द असले तर उच्चारतांना एक शब्द जोर देऊन उच्चारतात. उदा०—कांतर—कातर, पुंण्यांत—पुण्यांत.

---

## अभ्यास

१. भाषेचे मुख्य घटक कोणते व त्यांचें महत्त्व काय ?

२. जगांतील मुख्य भाषा कोणत्या ? आपली मराठी भाषा कोणत्या वर्गांतील आहे ?

३. आधुनिक मराठींत वर्ण किती आहेत ? संस्कृतमधील जुने वर्ण कां लोपले ?

४. आधुनिक मराठींत कोणते वर्ण नवीन आले आहेत ? त्यांच्या शब्दांचीं उदाहरणें द्या.

५. संधि म्हणजे काय ? पररूप व पूर्वरूप संधींचीं उदाहरणें व व्याख्या द्या.

६. अनुनासिक व अनुस्वार ह्यांमधील फरक सांगा.

७. अनुस्वाराचे प्रकार कोणते ? अनुच्चारित अनुस्वार कोणते ?

८. विसर्ग आणि अनुस्वार ह्यांचे अर्थ काय ?

९. गुण व यणादेश हे फरक सांगा

१०. वर्णलोप, वर्णादेश व आघात ह्यांची उदाहरणें सांगा.

११. वर्णांचा उच्चार कसा होतो ? उच्चारांचीं स्थानें कोणतीं ? व प्रत्येक स्थानापासून कोणते वर्ण उत्पन्न होतात ?

१२. संहित स्वर कोणते ? अल्पप्राण व महाप्राण व्यंजनें कोणतीं ?

१३. मराठींत संधि करण्याची प्रवृत्ति कमी कां होत चालली आहे ?

१४. य् र् ल् व् हे अर्धस्वर आहेत. त्यांना अर्धव्यंजनें म्हटलें तर चालेल का ?

१५. दन्त्यतालव्य, दन्त्यौष्ठ्य वर्ण सांगा.

---

# शब्दांच्या जाती

**२२.** व्यवहारास उपयोगी असा अर्थ ज्या वर्णसमूहांतून निघतो त्याला शब्द म्हणतात असें वर सांगितलें. ह्या शब्दाचे दोन प्रकार आहेत. एक **सव्यय** व दुसरा **अव्यय.**

१ ज्या शब्दांना प्रत्यय लागतात त्यांना **सव्यय शब्द** म्हणतात. प्रत्यय लावल्यावरच ते वाक्यांत वापरले जातात. ह्या सव्यय शब्दांचे चार प्रकार आहेत:—१ नाम, २ सर्वनाम, ३ विशेषण, ४ धातु.

२ ज्या शब्दांना प्रत्यय लागत नाहींत त्यांना **अव्यय** म्हणतात. प्रत्यय लाविल्याशिवाय जसेच्या तसे हे शब्द वाक्यांत वापरले जातात. ह्या अव्यय शब्दांचेहि चार प्रकार आहेत:—१ क्रियाविशेषण अव्यय, २ शब्दयोगी अव्यय, ३ उभयान्वयी अव्यय, ४ उद्गारवाचक अव्यय.

## नाम

**२३.** डोळे, कान, नाक, त्वचा व मन ह्या इंद्रियांना ज्ञात होणाऱ्या प्रत्येक पदार्थाचें जें नांव तें **नाम** होय.

उदा०—कागद, गाय, मनुष्य, राम, लक्ष्मण, शौर्य, विद्वत्ता, खरेपणा.

नामाचे प्रकार तीन आहेत:—१ सामान्यनाम, २ विशेषनाम, ३ भाववाचक नाम.

१. ज्या नामाच्या योगानें वस्तूंच्या जातीचा बोध होतो त्याला **सामान्य नाम** असें म्हणतात.

शिंगें, पाय, खूर, शेंपूट वगैरे अवयवांनीं युक्त जो 'गायपणा' ज्या ज्या प्राण्यांवर सांपडतो त्या प्राण्यास आपण गाय असें म्हणतों. ह्या जातीच्या सर्व प्राण्यांत सामान्यें करून एक स्वरूप सांपडतें म्हणून त्यांना आपण एक नाव देतों. त्या नांवानें त्या सर्व प्राण्यांची जाति दाखविली जाते. ह्या नांवाला **सामान्य नाम** असें म्हणतात.

२. कोणत्याहि जातींतील एक पदार्थ निराळा काढून त्याला **त्याचें** स्वतःचें जें निराळें नांव दिले जातें तें त्याचें विशेष नाम होय. त्या शब्दाला व्याकरणांत '**विशेष नाम**' म्हणतात.

'गाय' ही जाति. त्यातील आपल्या माहितीची एक गाय निराळी काढून तिला 'तांबू' असें नांव दिलें तर तें त्या गाईचें **विशेष नाम** होय. तांबू ह्या गाईत इतर गाईप्रमाणें 'गायपणाचे' सर्व गुण असून पुनः एक तिच्या-पुरतें विशिष्ट नांव दिलें आहे.

विशेष नामें हीं व्यक्तींचीं नांवे असतात. तीं त्या व्यक्तीचा निर्देश करतात. उदा०—कृष्ण, गोदावरी, शांता, वाघ्या, टिप्या, वगैरे **विशेषनामें** होत.

३. गोडी, राग, क्रौर्य, लोभ इत्यादि जे पदार्थ प्रत्यक्ष दिसत नाहींत व ज्याचा मनावर परिणाम, त्या त्या पदार्थांचा भाव अथवा धर्म दाखविण्यांत होतो त्याला **भाववाचक नाम** म्हणतात.

एखादा पदार्थ व त्याचा गुण हे नेहमीं एकमेकांस चिकटूनच राहतात. गोड आंबा, गोड साखर, गोड पक्वान्न, गोड बोलणें इत्यादि शब्दांत 'गोड' हा गुण त्या त्या पदार्थांस चिकटूनच आहे. निराळा नाहीं. ह्या तिन्ही पदार्थां-पासून 'गोड' हा गुण निराळा काढून जर त्याची मनानें कल्पना केली तर 'गोडपणा' असा एक निराळा काल्पनिक पदार्थ तयार होतो. 'रागीट मनुष्य, रागीट जनावर' ह्यांपासून रागीटपणा, तसेंच क्रौर्य, क्रूरपणा अशीं नामें तयार होतात.

**भाववाचक नाम**:—पदार्थांचा गुण, स्थिति, किंवा व्यापार दाखवितें.

**गुण**:—गोडी, माधुर्य, वाईटपणा. **स्थिति**:—जनन, मृत्यु, स्थापन.

**क्रिया**:—उड्डाण, चोरी.

**आधुनिक मराठींत** 'स्थिति व क्रिया' दाखविणाऱ्या शब्दांना सामान्य **नाम समजण्याची पद्धत आहे. जनन, मृत्यु, स्थापन, उड्डाण, चोरी इ० हीं** **सामान्य नामेंच** होत.

त्याप्रमाणें नामाचे पदार्थवाचक व समूहवाचक असे आणखी दोन प्रकार पूर्वी मानीत असत तेहि सध्यांच्या आधुनिक मराठींत मानीत नाहींत. "सोनें, लोखंड, रेशीम" इत्यादि पदार्थवाचक नामें असलीं तरी व "सैन्य, कळप, थवा" इत्यादि समूहवाचक नामें असलीं तरी तीं सामान्य नामेंच समजतात.

**२४.** नाम हें वाक्यांत कधीं कर्ता असतें, कधीं सकर्मक क्रियापदाचें कर्महि असतें तर कधीं इतर संबंधानेहि येतें.

| | |
|---|---|
| मनुष्य जातो.<br>रामा आहे. | ह्या वाक्यांत 'मनुष्य, रामा,' हे मुख्य शब्द असून कर्ते आहेत. |

रामा आंबा खातो. ह्यांत 'आंबा' हें नाम 'खातो' ह्या क्रियापदाचे कर्म आहे.

सध्यांच्या मराठींत नामासाठीं कधीं सर्वनाम, कधीं विशेषण, कधीं उद्गारवाचक अव्यय यांचा उपयोग केला जातो. कधीं कधीं तर कोणताहि शब्द व कोणतेहि अक्षर वाक्यांत नामाप्रमाणें वापरतात.

विशेषण नामाप्रमाणें—उदा०—**शहाण्यास** मार शब्दाचा.
**भले** सन्मार्ग सोडून जात नाहींत.

उद्गारवाचक अव्ययें—उदा०—त्याची **वाहवा** झाली. त्याची **छीःथू** झाली.

कोणताहि शब्द—मोरोपंतानें रामायणांत '**परंतु**' घातलें आहे.
तुझी '**री**' नेहेमीं तो ओढतो.

कोणतेहि वाक्य—'**मी शूर आहें**' असें तो बडबडला.

कांहीं सामान्यनामाचा विशेषनामाप्रमाणे उपयोग करतात.

उदा०—**पुरी**च्या यात्रेस पुष्कळ लोक जातात. **नगरास** पूर्वी निजामशाहीचें राज्य होतें.

कांहीं विशेषनामांचा सामान्यनामाप्रमाणें वाक्यात उपयोग करतात.

उदा०—तो केवळ **कर्ण** आहे. ती बाई म्हणजे शुद्ध **कैकेयी** होय.

कांहीं भाववाचकनामांचा सामान्यानामाप्रमाणे उपयोग करतात.

उदा०—तो मूर्तिमंत **खरेपणा** आहे. विद्यार्थ्यानें परीक्षेंत **शहाणपण** दाखविलें.

# सर्वनाम

**२५.** वाक्यांत नामाबद्दल येणारा व ज्याला स्वतःचा असा विशिष्ट अर्थ नसतो त्या शब्दाला '**सर्वनाम**' म्हणतात. उदा० मी, तूं, तो, हा, जो, कोण, आपण, इत्यादि.

'सर्वनाम' ह्या शब्दाचा संस्कृतमध्यें अर्थ निराळा आहे. "'सर्व' ह्या शब्दाच्या पुढें जे शब्द विवेचिले आहेत ते सर्वनामे होत" असा तेथे अर्थ आहे. 'सर्व' शब्दाच्या पुढें तत्, एतद्, अस्मत्, यूष्मत् इत्यादि शब्द विवेचिले असल्यामुळें ते सर्व 'सर्वनामें' होत.

सर्वनामाचा अर्थ "सर्वांसाठी येणारा शब्द" हाच बरोबर ठरेल. 'हा, तो, जो' इत्यादि सर्व पुल्लिंगी शब्दांबद्दल वापरतां येतात. तसेंच 'ही, ती, जी' हे सर्व स्त्रीलिंगी व 'हें, तें, जें' हे सर्व नपुंसकलिंगी शब्दांबद्दल वापरतां येतात. 'मी, तूं, कोण' हे तिन्ही लिंगीं वापरता येतात. तेव्हा सर्व नामांना अनुलक्षून जे शब्द वापरता येतात त्यांस 'सर्वनाम' म्हणावे. हाच 'सर्वनाम' ह्या शब्दाचा अर्थ योग्य ठरेल.

**२६.** सर्वनामाचे सहा प्रकार आहेतः—१ पुरुषवाचक. २ दर्शक. ३ संबंधी. ४ प्रश्नार्थक. ५ सामान्य. ६ विशिष्ट अर्थदर्शक.

१. जीं सर्वनामें मनुष्याच्या किंवा इतर प्राण्याच्या नांवाच्या ऐवजीं वापरतात, त्यांना '**पुरुषवाचक सर्वनामें**' म्हणतात.

"बोलणारा; ज्याच्याशीं बोलावयाचें तो; व ज्याच्याबद्दल बोलावयाचें" असे तीन प्रकार आहेत व त्यांच्या अनुक्रमानें 'बोलणारा' ह्या व्यक्तीबद्दलचें सर्वनाम **प्रथम पुरुष** होय, ज्याच्याशीं बोलावयाचें त्या व्यक्तीबद्दलचें सर्वनाम **द्वितीय पुरुष** होय, ज्याच्याबद्दल बोलावयाचे त्या व्यक्तीबद्दलचें सर्वनाम **तृतीय पुरुष** होय.

| उदा०— | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| १ प्रथम पुरुषः— | मी | आम्ही |
| २ द्वितीय पुरुषः— | तूं | तुम्ही |
| ३ तृतीय पुरुषः— | तो, ती, तें. | ते, त्या, तीं. |

२. दर्शक सर्वनाम :—ज्या सर्वनामाच्या साहाय्यानें जवळचा अथवा दूरचा पदार्थ दाखवितां येतो त्या सर्वनामांना '**दर्शक सर्वनाम**' म्हणतात.

उदा०—हा ( जवळचा ) घोडा, तो ( दूरचा ) घोडा. ही गाय, ती गाय; हें वासरूं, तें वासरूं; हे घोडे, ते घोडे; ह्या गायी, त्या गायी; हीं वासरें, तीं वासरें.

३. संबंधी सर्वनाम :—वाक्यामध्यें जेव्हां आपण पूर्वी वापरलेल्या नामाचा संबंध दाखवून बोलतों तेव्हां जें सर्वनाम वापरतों त्या सर्वनामास '**संबंधी सर्वनाम**' म्हणतात. ह्याला पूरक जें सर्वनाम येतें तें अनुबंधी होय.

संबंधी :—जो, जी, जें.

अनुबंधी :—तो, ती, ते. उदा :—जो करील तो भरील.

संबंधी सार्वनामिक विशेषणें :—जसा, जसला, जितका; तसा, तसला, तितका.

४. प्रश्नार्थक सर्वनाम :—प्रश्न विचारतांना वाक्यामध्यें जें सर्वनाम वापरतात त्यास '**प्रश्नार्थक सर्वनाम**' म्हणतात.

उदा०—कोण, कोणी, काय, किती, कितका, केवढा.

५. सामान्य सर्वनाम :—वस्तु अथवा पुरुष ह्यांच्याबद्दल अनिश्चितपणानें सामान्य रीतीनें निर्देश करणारें जें सर्वनाम तें '**सामान्य सर्वनाम**' होय.

उदा०—सर्व, अमुक, अमका, कित्येक, हरएक.

६. कांहीं सर्वनामांच्या अर्थावरून त्यांचे पोटभेद मानिले आहेत.

( अ ) परस्परान्वयी :—उभय, उभयतां, अन्योन्य, एकमेक.

( आ ) आत्मपदवाचक :—आपण, स्वतः.

( इ ) विभागदर्शक :—प्रत्येक, एकएक, हरएक.

'आपण' हें सर्वनाम वाक्यांत निरनिराळ्या अर्थानें वापरलें जातें.

१. 'स्वतः' बद्दल. उदा०—तो आपण बुडाला व त्यानें इतरांसहि बुडविलें.

२. मी आणि इतर याबद्दल. उदा०—आपण वाईट कर्मे करूं नये.

३. तुम्हीबद्दल आदरार्थी. उद०—आपण जर याल तर मी बरोबर येईन.

४. मी आणि तूं ह्यांबद्दल. उदा०—आपण बाहेर जाऊं व विचार करूं.

७. कांहीं सर्वनामें व सर्वनामापासून बनलेले शब्द विशेषणाप्रमाणें वाक्यांत वापरतात. हीं '**सार्वनामिक विशेषणें**' समजतात.

प्रकारदर्शक :—असा, असला; तसा, तसला; कसा, कसला इत्यादि.
संख्या किंवा परिमाणदर्शक :—इतका, तितका, एवढा, तेवढा इत्यादि.
उदा०—तो **असा** पदार्थ आहे. तूं हवे **तितके** आंबे तोड. त्या मुलास **तेवढा** अंगरखा मोठा होईल. **इतके** दिवस कां स्वस्थ बसला ?

---

## विशेषण

२७. जो सव्यय शब्द नामाचा विशेष ( गुण ) दाखवून त्याच्या अर्थाची व्याप्ति मर्यादित करतो त्या शब्दास **विशेषण** म्हणतात.

घोडा ह्या शब्दानें अर्थाची जी व्याप्ति दाखविली जाते त्यापेक्षां कमी व्याप्ति 'पांढरा घोडा' ह्या शब्दानें दाखविली जाते. 'पांढरा घोडा' म्हटल्यानें तांबडे, पिवळे, करडे, काळे इ. रंगाचे घोडे आपण विचारांत घेत नाहीं. त्यामुळें 'घोडा' ह्या शब्दाची व्याप्ति संकुचित केली जाते.

पांढऱ्या घोड्यास, पांढऱ्या घोड्यानें इत्यादि रूपांत 'पांढरा' ह्याचें पांढऱ्या असें सामान्यरूप होतें म्हणून हा शब्द सव्यय आहे. कवितेंत कधीं कधीं विशेषणास प्रत्यय लावलेले आढळतात. नेहमींच्या गद्य बोलण्यांत विशेषणास प्रत्यय लागत नाहींत.

विशेषण ज्या नामाचा गुण दाखवून त्याची व्याप्ति मर्यादित करतें त्या शब्दास **विशेष्य** म्हणतात. 'पांढरा घोडा' ह्या दोन शब्दांपैकीं 'पांढरा' हा शब्द विशेषण व 'घोडा' हा शब्द 'विशेष्य' होय.

विशेषण हें नेहमीं नामाच्या पूर्वीं येतें. 'पांढरा घोडा' ह्यांत 'पांढरा' हा शब्द 'घोडा' ह्या शब्दाच्यापूर्वीं आहे. अशा वेळीं त्याला **अधिविशेषण** म्हणतात.

परंतु कधीं कधीं विशेषण नामाच्या पुढेहि येते. नामाची व्याप्ति मर्यादित करून जे विशेषण विधान पूर्ण करतें त्याला **विधिविशेषण** म्हणतात. उदा०—"ह्या घोड्याचा रंग पांढरा आहे." 'पांढरा' हे विशेषण 'रंग' ह्या विशेष्याच्या पुढे आले आहे. नोकर प्रामाणिक व गरीब असावा. आंबे चागले पिकलेले आण.

**२८.** विशेषणाचे मुख्य प्रकार दोन आहेत :—१ **गुणविशेषण**; २ **संख्याविशेषण.**

१. पाढरा, काळा, चांगला, वाईट ( घोडा ) वगैरे विशेषणें 'गुण' दाखवितात म्हणून तीं **गुणविशेषणें** होत.

२. एक, चार, पांच, ( घोडे ) हीं विशेषणें संख्या दाखवितात म्हणून तीं **संख्याविशेषणें** होत.

संख्याविशेषपणाचे चार पोटभेद आहेत :—

१. **गणनावाचक** :—एक, दोन, तीन, चार, वीस, पन्नास, शंभर इ.

२. **क्रमवाचक** :—पहिला, दुसरा, तिसरा, चौथा, विसावा, पन्नासावा, शंभरावा इ.

३. **आवृत्तिवाचक** :—एकपट, दुप्पट, तिप्पट, चौप्पट, वीसपट, पन्नासपट, इ.

४. **पृथक्त्ववाचक** :—दरएक, हरएक.

ह्याशिवाय विशेषणाचा आणखी एक प्रकार आहे :—

१. **सार्वनामिक विशेषणें**—उदा०—असा मनुष्य, असला मनुष्य, अमुक मनुष्य.

**२९.** कांहीं विशेषणें विशेष्याप्रमाणें चालतात; काहीं विशेष्याप्रमाणें चालत नाहींत.

मोठा घोडा, मोठी घोडी, मोठें घोडें.—बदलणारें विशेषण.

उंच घोडा, उंच घोडी; उंच घोडें.—न बदलणारें विशेषण.

१ विशेष्याला जर विभक्तीचे प्रत्यय किंवा शब्दयोगी अव्यय लागलें तर पूर्वीच्या त्याच्या विशेषणाचें याकारान्त किंवा एकारान्त असें सामान्यरूप होतें.

**भल्या** माणसाचें हें काम नव्हे. **हलक्या** माणसानें केलें तर चालेल. त्या **थोरल्या** देवळावर शिखर बांधलें.

२. विशेषणास गद्यांत विभक्ति प्रत्यय लागत नाहींत. कवितेंत कधीं कधीं लागतात. ( विशेषणाचा उपयोग नामाप्रमाणें जर केला असेल तर अर्थात् त्याला प्रत्यय लागतील. )

उदा० दास्य करावें भावें न असावें **मानसें उदासीनें.**

३. एकच विशेषण जर एकापेक्षां अधिक विशेष्याचा गुण दाखवीत असेल तर तें त्याच्या लगतच्या विशेष्याप्रमाणे चालतें.

उदा०—**हिरवे** आंबे व चिंच खाऊं नये.

४. विधिविशेषणहि त्याप्रमाणें शेवटच्या विशेष्याप्रमाणेंच चालतें.

उदा०—त्याचे डोकें व चोंच **मोठी** होती.

५. एकापेक्षां अधिक विशेषणें एकाच विशेष्यासंबंधीं आलीं तर 'असा' हा शब्द त्याच्या शेवटीं घालतात.

उदा०—प्रत्येकानें ताजे, स्वच्छ, साधें, रुचकर **असें** अन्न खावें.

६. मराठीमध्ये विशेषणाचा तरतमभाव दाखविण्याचा विशेष प्रकार नाहीं. व त्याचे विशेष निराळे असे प्रत्ययहि नाहींत. विशेषणांचा 'तरतमभाव' अधिक, कमी, अमळ, किंचित् हे शब्द किंवा पंचमीचे प्रत्यय व पंचमीचीं अव्ययें वापरून दाखविला जातो.

उदा०—तो त्याच्याहून अधिक उंच आहे. दोन्ही भावंडांत बहीणच अधिक हुशार आहे. अमळ हलक्याशा किमतीचे जिन्नस घ्यावेत म्हणजे तेवढीच बचत होत. हा विद्यार्थी सर्व विद्यार्थ्यांत चपळ आहे. सर्व मराठा सैन्यांत दत्ताजीच काय तो शूर.

---

## क्रियापद

**३०.** वाक्यांतील क्रिया दाखविणारा व अर्थाची पूर्णता करणारा जो शब्द त्याला **क्रियापद** म्हणतात. क्रियापदांतील मूळ शब्दास '**धातु**' म्हणतात. ह्या धातूंना प्रत्यय लागतात म्हणून ते सव्यय शब्द होत. धातूंला प्रत्यय

लागले म्हणजे क्रियापद बनतें. उदा०—'वाच' हा धातु. 'तो' हा वर्तमान-काळीं पुल्लिंगी एकवचनाचा प्रत्यय. 'वाचतो' हें क्रियापद.

**३१.** धातूंचे वेगवेगळ्या दृष्टींनीं वेगवेगळे प्रकार करितां येतात. त्यांपैकीं एक प्रकार:—**सकर्मक** व **अकर्मक.** 'वाच,' 'कर' हे **सकर्मक**; 'बस' 'अस' हे **अकर्मक** धातु होत.

झालेली किंवा केलेली क्रिया वाक्यांत सांगितलेली असते. क्रिया दाखविणारें, वाक्याचा अर्थ पूर्ण करणारें जें पद तें **क्रियापद** होय. क्रिया करणारा किंवा दाखविणारा जो शब्द त्यास **कर्ता** म्हणतात. कर्त्यानें केलेली क्रिया कधीं कर्त्यावरच राहते व कधीं कर्त्याशिवाय इतर शब्दांवर जाते. ज्यावेळीं क्रिया कर्त्यावर राहते तेव्हां तें क्रियापद **अकर्मक** होय. जेव्हां ती क्रिया कर्त्याशिवाय इतर शब्दांवर जाते तेव्हां ते क्रियापद **सकर्मक** होय, व त्या दुसऱ्या शब्दास '**कर्म**' म्हणतात.

'रामा बसतो' या वाक्यात 'बस' हा धातु अकर्मक आहे. 'रामा' हा कर्ता व 'बसतो' हे क्रियापद होय.

'रामा पुस्तक वाचतो' या वाक्यांत 'वाच' हा धातु **सकर्मक** आहे.

'रामा' हा कर्ता, 'वाचतो' हें क्रियापद, 'पुस्तक' हें कर्म होय.

सकर्मक व अकर्मक ह्या दोन प्रकारच्या धातूंशिवाय धातूचा आणखी एक तिसरा प्रकार आहे. त्यास **अकर्तृक** किंवा **भावकर्तृक** धातु म्हणतात.

उदा०—उजाडणें, सांजावणें, कळमळणे इ.

ह्या धातूंना प्रत्यक्ष असा कर्ताहि नसतो व कर्महि नसते. केवळ झालेली क्रिया सांगितलेली असते. क्रियेचा जो भाव तोच ह्या धातूंचा कर्ता मानतात म्हणून ह्यांना **भावकर्तृक धातु** म्हणतात.

(२) दुसऱ्या एका दृष्टीने म्हणजे—धातूंच्या रूपावरून दोन भेद मानिले आहेत. १ **शक्य**, २ **प्रयोजक.**

'शक्य' धातु शक्यता, व शक्ति दाखवितो व प्रयोजक धातु दुसऱ्याकडून करवलेली क्रिया दाखवितो.

१. **शक्य**—मला काम **करवतें**; मला चार मैल **जाववतें.**

२. **प्रयोजक**—तो माझ्याकडून काम **करवतो.**

( ३ ) तिसऱ्या एका दृष्टीने १ **सहाय**; २ **गौण**; ३ **नियमित**; ४ **अनियमित**; ५ **संयुक्त** असे धातूंचे प्रकार आहेत.

१. सहाय धातु दुसऱ्या मुख्य धातूला साहाय्य करतात. क्रियापदाचा अर्थ व काळ योग्य रीतीनें दाखविण्यासाठीं जे धातु वापरतात त्याना **सहाय धातु** म्हणतात.

उदा०—मला काम केलें **पाहिजे.** तो काम करीत **असे**; इ.

सहाय क्रियापदें हीं संयुक्त क्रियापदे तयार करतांना उपयोगीं पडतात.

२. ज्या धातूंचीं काहीं रूपें भाषेंत आढळत नाहींत त्यांना **गौण धातु** म्हणतात. 'पाहिजे, नलगे, नको, इत्यादि' हींच फक्त रूपें भाषेंत आढळून येतात, ह्यांचीं इतर रूपे नाहींत.

३. व ४. ज्यांचीं भूतकाळाचीं रूपे सर्वसामान्य रीतीने होतात ते धातु **नियमित** होत व ज्यांचीं तशीं होत नाहींत, जरा निराळ्या रीतीनें होतात ते धातु **अनियमित** होत.

**नियमित** :—चाल—चालिला; चोर—चोरिले; बांध—बांधले.

**अनियमित** :—कर—केले; जा—गेलें; या—आले इ.

५. दोन धातूंचा संयोग होऊन जो एक दोन्ही क्रिया दाखविणारा धातु तयार होतो त्यास **संयुक्त धातु** म्हणतात व त्या धातूचें जें रूप बनतें त्यास **संयुक्त क्रियापद** म्हणतात.

मराठींत संयुक्त क्रियापदें पुष्कळ आहेत. संयुक्त धातूंत एक धातु मुख्य व दुसरा त्याला मदत करणारा गौण दुय्यम स्वरूपाचा धातु असतो. मुख्य क्रिया दाखविणाऱ्या धातूचें कृदन्त व दुय्यम धातूचें पूर्ण रूप मिळून संयुक्त क्रियापद तयार होतें.

| | |
|---|---|
| परीट कपडे धुऊन **टाकतो.** | मला काम **केलें पाहिजे.** |
| मुलें खाऊ खाऊन **टाकतात.** | मी काम **करीत आहें.** |

ह्यांतील ‘धुऊन, खाऊन, केलें, करीत’ हीं मुख्य धातूंचीं रूपें होत व ‘टाकतो, टाकतात, पाहिजे, आहे’ हीं गौण दुय्यम धातूंचीं रूपें आहेत. हीं दोन्ही मिळून संयुक्त क्रियापदें होतात.

ह्या संयुक्त धातूंशिवाय दुसऱ्या एका प्रकारचे संयुक्त धातु मराठींत आढळतात. हे संयुक्त धातु वरीलप्रमाणें दोन धातूंचे बनलेले नसून एक नाम व एक धातु ह्यांचे बनलेले असतात. नाम व धातु ह्या दोहोंचा मिळून जो अर्थ होतो तोच त्या संयुक्त धातूला प्राप्त होतो.

उदा०—प्रीति करणें; शिक्षा करणे; पारख करणें, सिद्ध करणें, दया येणें; ममता लावणे; अंगांत घालणे; मार खाणें; मेहनत घेणें इ.

काहीं व्याकरणकार संयुक्त धातु मानीत नाहींत, व कांहीं मानतात. मुलाना स्थूल कल्पना येण्यासाठीं वर दोन्ही प्रकार दिले आहेत. दुसरा प्रकार जरी मानिला नाहीं तरी पहिल्या प्रकारचे संयुक्त धातु मानावेच लागतात.

---

## क्रियाविशेषण

**३२.** स्थळ, काळ, परिणाम, रीति वगैरेसंबंधीं क्रियापदाचा विशेष अर्थ सांगणाऱ्या अविकारी शब्दास **क्रियाविशेषण अव्यय** म्हणतात. उदा०—तेथें; येथें; आतां; मग; थोडें; फार; सहज; आपोआप.

ज्याप्रमाणे विशेषणाच्या योगानें नामाचा अर्थ मर्यादित केला जातो त्याप्रमाणें क्रियाविशेषणाच्या योगाने क्रियापदाचा व कधीं विशेषणाचा व दुसऱ्या क्रियाविशेषण अव्ययाचा देखील अर्थ मर्यादित केला जातो. उदा०—तो काम करतो; तो काम **जलद्** करतो; तो काम **फार जलद्** करतो. चांगलें फळ; **फार** चांगलें फळ.

**३३.** क्रियापदाचा अर्थ ज्या निरनिराळ्या प्रकारांनीं विशेष रीतीने सांगितला जातो त्या प्रकारांवरून क्रियाविशेषण अव्ययांचे प्रकार टरविले जातात.

( १ ) **स्थलवाचक क्रियाविशेषण अव्ययें** ( ठिकाण दाखविणारीं )
उदा०—तेथें, येथें, जेथें.

( २ ) **कालवाचक** ( क्षण, अवधि, पुनःपुनः दाखविणारीं ) उदा०—
आतां, मग, तूर्त, तेव्हां, अकस्मात्, पूर्वी, परवा, सदा, वारंवार.

( ३ ) **परिमाणवाचक** ( सख्या, माप, चढउतार दाखविणारीं ) उदा०—
थोडेफार, किंचित्, प्रायः, अगदीं, एकदां, अति, पुष्कळ, खरोखर.

( ४ ) **रीतिवाचक.**—उदा०—सहज, आपोआप, भराभर, फुकट, बहूत-करून, कदाचित्, असें, कितपत.

**३४.** क्रियाविशेषण अव्यय हें अव्ययाचा एक प्रकार आहे. ह्याला विभक्ति प्रत्यय लागत नाहींत.

मूळ संस्कृतमधील क्रियाविशेषण अव्यये मराठी भाषेंत येतांना अव्ययें म्हणूनच आलीं. परंतु मराठीभाषेंतील कांहीं क्रियाविशेषण अव्ययें विभक्तीचे प्रत्यय लागलेलीं अशीं दिसतात. संस्कृतमधील विभक्ति प्रत्यय घेऊन आलेले कांहीं शब्द मराठी भाषेत क्रियाविशेषण अव्ययें म्हणून वापरलीं जातात. विभक्ति प्रत्यय लागलेले हे शब्द क्रियाविशेषण अव्ययेंच समजलीं पाहिजेत. कारण, जरी एके काळीं ते विभक्तीचे प्रत्यय घेतलेले शब्द असले तरी त्यांचा प्रत्ययपणा आतां नाहींसा झाला आहे. त्यांच्यांत अव्ययत्व आलें आहे.

१. निरनिराळ्या शब्दांपासून :—साधित.

अ. नामापासून प्रत्यय लावून बनलेलीं—वस्तुतः, व्यक्तिशः, यत्नतः.

आ. विशेषणापासून बनलेलीं:—इतक्यांत, मोठ्याने, मुकाट्यानें पहिल्यानें—दां, द्विधा.

इ. धातूपासून बनलेलीं—हंसत, देखत, नकळत, उठल्या बसल्या, चालतां बोलतां.

ई. सर्वनामापासून बनलेलीं—सार्वनामिक क्रियाविशेषणें.

( १ ) दर्शक :—जेथें—तेथें; जेथून—जेथपर्यंत; तेथून—तेथपर्यंत; जंव—तंव; जेव्हां—तेव्हां; तेणेंकरून—जेणेंकरून

( २ ) प्रश्नार्थक :—कोठं; कोठपासून; केव्हां; कधीं कधीं.

२. क्रिया होतांना जो ध्वनि होतो तो दाखविणारीं—अनुकरणवाचक क्रियाविशेषण अव्ययें :—

उदा०—गटगट, झटझट, झटकन्, गपकन्, पटकन् इ.
टकमक, झणझण, छमछम, भडभड, घमघम.

३. संस्कृत व इतर भाषेंतील अव्ययें जशींच्या तशींच मराठींत उतरलीं आहेत. तत्सम क्रियाविशेषण अव्ययें :--

उदा०—१ प्रथमतः, स्वरूपतः, यत्नतः, उभयतः.
२ सदा, सर्वदा, एकदां, दहादां, बहुधा.
३ क्रमशः, शब्दशः, बहुशः, अनेकशः.
४ सर्वत्र, एकत्र, अन्यत्र, परत्र.

फारशी :—हमेश, दररोज, हरघडी, बिनहरकत, गैरकायदा, बेमालूम, बेशक, निखालस.

**३५.** क्रियाविशेषण अव्यय हें वाक्यांत ज्या क्रियापदाशीं, किंवा विशेषणाशीं अथवा दुसऱ्या क्रियाविशेषणाशीं त्याचा संबंध आला असेल त्याच्या पूर्वी लगत वापरण्याचा प्रघात आहे. उदा०—पाऊस **आज** पडावा. पाऊस **निस्संशय** आज पडावा. पाऊस **आज** खात्रीलायक पडलाच पाहिजे.

**३६.** अकारान्त व कांहीं ऊकारान्त क्रि. वि. अव्ययांखेरीज सर्व क्रियाविशेषण अव्ययांवर मराठी लेखनांत अनुस्वारदर्शक टिंब देतात. उदा०—आतां, पुढें, खालीं, एकदां, तेथें, जेव्हां, पर्वां.

परंतु अकारान्त—नंतर, मग. ऊकारान्त :— सुरू, चालू.

**३७.** कांहीं क्रियाविशेषण अव्ययें वाक्यें जोडण्याचें काम करतात. त्यांना **संबंधी क्रियाविशेषण अव्ययें** म्हणावें. उदा०—जेव्हां—तेव्हां; जेथें—तेथें; हीं क्रियाविशेषणे जवळजवळ उभयान्वयी अव्ययाचें काम करतात.

क्रियाविशेषण व क्रियाविशेषण अव्यय या दोहोंमध्यें सूक्ष्म फरक आहे तो ध्यानांत ठेवावा. 'तो उभा आहे', 'ती उभी आहे', 'मूल उभें राहतें' या उदाहरणांत 'उभा' या क्रियाविशेषणाचीं रूपें बदललीं आहेत. 'तो चांगलें गातो', 'ती चांगलें गाते', मूल चांगलें गातें', ह्या उदाहरणांत 'चागला' या क्रियाविशेषणाचीं रूपें बदललीं नाहींत. तेव्हां पहिल्या प्रकारास नुसतीं क्रियाविशेषणे म्हणावें व दुसऱ्या प्रकारास क्रियाविशेषण अव्ययें म्हणावें.

---

## शब्दयोगी अव्यय

**३८.** वाक्यांत नाम व इतर तसले शब्द ह्यांचा इतर शब्दांशीं असलेला संबंध जो अविकारी शब्द दाखवितो त्याला **शब्दयोगी अव्यय** म्हणतात.

उदा०—पक्षी **घरावर** बसला; तसेंच 'खालीं, कडे, पर्यंत.' वगैरे शब्द

१. हें अव्यय नेहमीं शब्दाला त्याच्या प्रत्ययाप्रमाणें जोडतात व प्रत्यय लावतांना ज्याप्रमाणें शब्दाचें उच्चाराला योग्य असें सामान्यरूप करतात त्याप्रमाणें हें अव्यय लावतांनाहि करतात.

२. शब्दयोगी अव्यय व प्रत्यय ह्या दोहोंत फरक इतकाच कीं प्रत्यय हे लिंगवचनाप्रमाणें बदलतात व शब्दयोगी अव्यय हें अव्यय असल्यानें बदलत नाहीं.

३. पूर्वीं एकेकाळीं नामें व धातू असलेल्या शब्दाना विभक्तीचे व काळाचे प्रत्यय लावून सध्यांचीं काहीं शब्दयोगी अव्ययें बनलेलीं आहेत.

नामें :—मध्य ( सप्तमी)—मध्यें.
विषय( „ )—विषयीं.
कडे, योगें, कारणें,
प्रमाणें; पाशीं; इ.

धातु :—पावेतों; लागीं, देखत,
लागून, करितां,
करून, इ.

**३९.** शब्दयोगी अव्ययाचे काळ, स्थल, गति, करण वगैरे संबंध दाखविणारे निरनिराळे प्रकार आहेत.

१. **कालदर्शक**—आंत, पुढें, नंतर, अगोदर, पूर्वीं.

२. **स्थलदर्शक**—आंत, ठाईं, मागें, परोक्ष, मध्यें, बाहेर, पाशीं, समीप, संनिध, समक्ष, पुढें, समोर, अलीकडे, पलीकडे.

३. **गतिदर्शक**—आंतून, कडे, पर्यंत, पावेतों, वरून, मधून, खालून, पासून.

४. **करणदर्शक**—कडून, करवीं, द्वारां, हातीं.

५. **इतर**—पैकीं, खेरीज, शिवाय, वाचून, विना, प्रमाणें, जवळ, मोबदला, ऐवजीं, भोंवता, पुरता, साठीं, विषयीं, बरोबर, सवें, संगें, सहित, विरुद्ध, उलट, सुद्धां.

**४०.** पुढें दिलेले शब्द हे शब्दाला जोडून नेहमीं येतात व तीं अव्ययें असल्यामुळें त्यांना **शब्दयोगी अव्ययें** म्हणावें. हीं अव्ययें जोडतांना मागील शब्दाचें सामान्यरूप होत नाहीं. उदा०—च, हि, मात्र, देखील. उदा०—मीच,—मीहि,—मीमात्र—मीदेखील येईन.

**४१.** शब्दयोगी अव्ययें हीं विभक्ति प्रत्ययांसारखीं आहेत. विभक्तिप्रत्यय ज्याप्रमाणें निरनिराळ्या विभक्तींचे संबंध दाखवितात त्याप्रमाणें कांहीं शब्दयोगी अव्ययेहि वाक्यांतील शब्दांचे संबंध दाखवितात. ह्या शब्दयोगी अव्ययांना **विभक्तिप्रतिरूपक शब्दयोगी अव्ययें** म्हणतात.

उदा०—द्वितीया व चतुर्थी—कारणें, करिता, साठीं, स्तव, लागीं, लागोनी.
तृतीया—करून, मुळे, कडून, सह, सवें, करवीं, हातें.
पंचमी—पेक्षां, पासून, कडून, वरून, खेरीज, शिवाय.
सप्तमी—मध्ये, आंत, विषयीं, माजी, माझारी.

**४२.** सध्यांच्या मराठींत शब्दयोगी अव्ययें वापरण्याची विशेष प्रवृत्ति आहे. वाक्यांतील शब्दांचे निरनिराळे संबंध विभक्तिप्रत्ययांच्या साहाय्यानें दाखविण्याच्या ऐवजीं शब्दयोगी अव्ययांच्या साहाय्यानें दाखविण्याकडे मराठीभाषेंत सध्यां विशेष प्रवृत्ति आहे.

**४३.** शब्दयोगी अव्यय शब्दाला लावण्यापूर्वी शब्दांचे सामान्यरूप करतात.
घर—घरापासून, घराकडे, घरामुळें, घराविषयीं इत्यादि.

कांहींवेळेस सामान्यरूप होत नाहीं; परंतु सध्यांच्या मराठींत कधीं कधीं होतें. सामान्यरूप करावे किंवा न करावें असा विकल्प आहे.

१. परभाषेंतून आलेले व मराठींत स्थिर न झालेले शब्द :—
टेबलवर,—टेबलावर, स्टेशनपावेतों—स्टेशनापावेतों.

२. काळदर्शक शब्द—दिवसपर्यंत, सकाळपावेतों, दिवसापर्यंत, सकाळपावेतों.

३. कांहीं ठिकाणीं नामाचें षष्ठीचें सामान्यरूप करून नंतर शब्दयोगी अव्यय लावतात. घराबाहेर किंवा घराच्याबाहेर; देवळांत किंवा देवळाच्या आंत.

## उभयान्वयी अव्यय

**४४.** जो अविकारी शब्द वाक्यांतील क्रियेचें वैशिष्टय न दाखवितां त्यांतील दोन शब्द, दोन वाक्यांश किंवा दोन वाक्ये जोडतो त्याला **उभयान्वयी अव्यय** म्हणतात.

( उभय + अन्वय–दोघांना एकत्र करणारें अव्यय ).

रामा **आणि** गोविंदा हे दोघे आले. तो शाहाणा **आणि** श्रीमंत आहे. वारा आला **व** पाऊस गेला, इ.

**४५. प्रकारः**—शब्द किंवा वाक्ये जोडतांना केव्हां त्यांचा एकत्र मिलाफ किंवा **समुच्चय** केला जातो; केव्हां त्यांच्यांत **विरोध** दाखविला जातो; केव्हां त्यांच्यांत **कारण, परिणाम, संकेत,** वगैरे दाखविले जातात. ह्या उभयान्वयाच्या निरनिराळ्या कार्यामुळे त्यांचे प्रकार झाले आहेत.

१. **समुच्चयबोधक**—एकत्र बेरीज दाखविणारीं. उदा०—आणि, आणखी, व, आणीक.

२. **विकल्पबोधक**—दोहोंपैकीं एक पक्ष किंवा विरोध दाखविणारीं. उदा०—वा, किंवा, कीं, अथवा, अगर.

३. **कारणबोधक**—कारण दाखविणारीं. उदा०—कारण, कीं, कांकीं, कारण कीं.

४. **परिणामबोधक**—परिणाम, शेवट दाखविणारीं. उदा०—म्हणून, तेव्हां, यास्तव, अतएव, सबब, त्यास, तस्मात्.

५. **उद्देशबोधक**—उद्देश, हेतु दाखविणारीं. उदा०—सबब, म्हणून, कारण, कीं, कांकीं.

६. **संकेतबोधक**—अट दाखविणारीं. उदा०—जर–तर; जरी–तरी; यद्यपि–तथापि; म्हणजे–कीं.

७. **न्यूनत्वबोधक**—कमीपणा दाखविणारीं. उदा०—पण, परंतु, किंतु, बाकी, परी.

८. **स्वरूपबोधकः**—उदा०—म्हणून, म्हणजे, कीं.

वरील सात प्रकारांत दिलेलीं कांहीं अव्ययें दोन प्रकारचीं आहेत:–

उदा०–"कारण, कीं," हीं कारणहि दाखवितात व परिणाम आणि उद्देशहि दाखवितात.

"म्हणून, सबब, अतएव," वगैरे परिणाम, उद्देश असे दोन्ही दाखवितात.

"प्रायः, क्वचित्, कदाचित्, बहुतकरून, किंबहुना" हे शब्द उभयान्वयी अव्ययें नव्हत. हे क्रियेचे धर्म दाखवितात म्हणून क्रियाविशेषणें होत. मी उद्यां **कदाचित्** येईन. ही गोष्ट **बहुतकरून** होईल. इ.

**४६.** मराठींतील बरींच उभयान्वयी अव्ययें संस्कृत व फारशी भाषांतून आलीं आहेत व त्या मूळ भाषांत तीं अव्ययेच आहेत.

उदा०–संस्कृत–कारण, परंतु, किंतु, परी, वा, किंवा, अथवा, तस्मात्, अतएव, यद्यपि, तथापि.

फारशी–सबब, लेकीन, बाकी, मगर, अगर.

कांहीं अव्ययें हीं पूर्वी निराळ्या जातीचे शब्द असून त्यांना सध्यां अव्ययाचें स्वरूप प्राप्त झालें आहे.

'म्हणजे' हें म्हण धातूचें कर्मणिरूप आहे. 'म्हणून' हें म्हण ह्या धातूचे पूर्वकालवाचक धातुसाधित आहे; 'करितां' हें कर धातूचें वर्तमानकालवाचक धातुसाधित आहे. 'आणि' हें अन्यत् ह्या संस्कृत सर्वनामापासून आलें आहे.

पुढील अव्ययें मराठीभाषेतील अस्सल आहेत: उदा०–जर–तर; जरी–तरी.

**४७.** उभयान्वयी अव्ययांचा उपयोग वाक्यें जोडण्याकडे होतो. जरी वाक्यांत बाह्यतः उभयान्वयी अव्यय शब्द जोडतांना दिसलें तरी खरें पाहिलें असतां ते वाक्येंच जोडतें.

'रामा आणि गोविंदा हे दोघे आले.' ह्या वाक्यांत "रामा आला आणि गोविंदा आला" अशीं दोन वाक्यें आहेत.

तो शाहाणा आणि श्रीमंत आहे–तो शाहाणा आहे आणि तो श्रीमंत आहे.

वर सात प्रकारचीं जीं उभयान्वयी अव्ययें दिलीं आहेत त्यांतील कांहीं मुख्य प्रधानवाक्ये जोडणारीं आहेत व काही गौण वाक्यें जोडणारीं आहेत.

आणि, व, वा, किंवा, म्हणून, तेव्हां, पण, परंतु इत्यादि प्रधान वाक्यें जोडतात.

जर, सबब, कारण, कीं, कांकीं, म्हणजे, म्हणून, इत्यादि गौण वाक्यें जोडतात.

वाक्यांत बोलण्याचा जो उद्देश असेल त्याप्रमाणें त्या जातीचें उभयान्वयी अव्यय योजावें.

वाक्यांत उभयान्वयी अव्ययांचें काम कधीं संबंधी सर्वनामें किंवा संबंधीक्रियाविशेषणें करतात. ह्या असल्या शब्दांचा आणि उभयान्वयी अव्ययांचा घोंटाळा होऊं देऊं नये. जो–तो; ( सर्वनाम ); जसें–तसें; जेथें–तेथें; जेव्हा–तेव्हां; ज्याप्रमाणे–त्याप्रमाणें ( क्रि. वि. ).

---

## केवलप्रयोगी अव्यय

४८. वाक्यामध्ये बोलणाऱ्याच्या मनांतील निरनिराळे विकार किंवा भावना ज्या शब्दाच्या योगानें एकदम दाखविल्या जातात व ज्यांचा वाक्यांतील इतर शब्दांशीं कांहीं संबंध नसतो त्या अविकारी शब्दांना **केवलप्रयोगी अव्ययें** म्हणतात.

उदा०—अहाहा, अबब, अरेरे, वाः, शाबास, रामा शिवा गोविंदा !

हे विकार किंवा ह्या भावना शब्दाच्या द्वारां एकदम उच्चारिल्या जातात म्हणून त्यांना **उद्गारवाचक अव्ययहि** म्हणतात.

ह्या अव्ययांचा वाक्यातील इतर शब्दांशीं कांहीं संबंध नसतो. हें अव्यय म्हणजे जवळ जवळ एक वाक्यच असतें. फक्त तेथे वाक्यांतील कर्ता, कर्म, क्रियापद वगैरे शब्द नसतात. परंतु बोलणाराच्या मनांतील भावार्थ दाखविणे हे जें वाक्याचें कार्य तें हे अव्यय करतें. ह्या त्याच्या स्वरूपामुळें त्याला **केवलप्रयोगी अव्यय** ( फक्त वाक्य तयार करणारें ) म्हणतात.

**४९.** मनांतील जे विकार ह्या अव्ययांच्या द्वारां दाखविले जातात, त्यांत आनंद, शोक, आश्चर्य, रुकार, नकार, तिरस्कार, धिःकार हे मुख्य होत. ह्याप्रमाणें केवलप्रयोगी अव्ययाचे निरनिराळे प्रकार ठरतील.

१. **हर्षद्योतक** :—वाः, वाहवा, अहाहा, ओहो, अहा, इत्यादि.

२. **शोकद्योतक** :—हायहाय, हरहर, शिवशिव, रामराम, अरेरे, देवारे, इ०

३. **आश्चर्यद्योतक** :—अबब, अहाहा, अरे बापरे, अगबाई, इ०

४. **रुकारदर्शक** :—होय, ठीक, वाहवा, तथास्तु, यंव, हं, इ०

५. **नकारदर्शक** :—छे, हट्, छी छी, च, हूं, इ०

६. **धिःकार, तिरस्कार** :—थूत्, शुक्, हं हं, छी, छत्, इ०

७. **संबोधनदर्शक** :—अरे, अहो, अगे, अगो, इ०

हीं अव्यये भाषेतील सर्वांत अगोदरचे शब्द होत असे कांहीं विद्वान लोक समजतात. ह्यांतील बरींच अव्ययें विकाराच्या ओघात एकदम जो ध्वनि तोंडांतून बाहेर निघतो त्यापासून बनलीं आहेत. उदा०—छे, हं हं, अगगग, अरेरे, हट्, फुस्, छप्, चुप, शिशिशि.

**५०.** कांहीं संबोधनवाचक नामांना अव्ययाचे स्वरूप प्राप्त झालें आहे. उदा०—हरहर, शिवशिव, रामराम, अगबाई, रामाशिवागोविंदा.

देवाचे नांव उच्चारल्यानें भीतीचें, संकटाचे, अनिष्टाचें, निवारण होईल म्हणून हीं संबोधनें उच्चारिलीं जातात व पुढें ओघानें त्यालाच अव्ययत्व येते.

काहीं संस्कृत वाक्यांनाच अव्ययत्व प्राप्त झाले आहे. तथास्तु, विष्णवे नमः, रामाय नमः, रामाय स्वस्ति. रावणाय स्वस्ति.

**५१.** हें अव्यय वापरल्यावर त्याच्या पुढें उद्गारवाचक (!) चिन्ह घालावें.

विकार किंवा भावना ज्या महत्त्वाची असेल त्याप्रमाणें उद्गारवाचक चिन्हें एक, दोन किंवा तीन घालावीं. जो मनाचा विकार दाखवावयाचा त्याच्या स्वरूपाप्रमाणे केवलप्रयोगी अव्यय वापरावे.

हें अव्यय वाक्याच्या आरंभीं किंवा मध्येंच वापरतात. वापरण्याची वहिवाट अधिक आहे.

## अभ्यास

१. नामाचे प्रकार सांगून त्यांचीं उदाहरणें द्या.

२. सर्वनामानें वाक्यांत शब्दांची काटकसर कशी होते हें सिद्ध करा.

३. ज्या सर्वनामांत विशेषणाचा गुणधर्म दिसतो अशीं सर्वनामें कोणतीं ?

४. षष्ठी विभक्त्यंत नामांत विशेषणाचा गुणधर्म कितपत आहे ?

५. सर्वनामाप्रमाणें वाक्यांत विशेषण व क्रियाविशेषण ह्यांच्या योगानेंहि शब्दांची काटकसर कशी करतां येते तें सांगा. उदाहरणें द्या.

६. (१) विशेषणामुळें नामाला स्पष्टता येते. (२) विशेषण हें नामाचें वर्णन करतें. ह्यांपैकीं तुम्ही कोणती व्याख्या पसंत करतां व ती कां ?

७. शब्दांचें वर्गीकरण खालीलप्रमाणें केलें आहे तें ध्यानांत ठेवा.




८. सर्वनामाची व्याख्या करतांना काय अडचणी येतात त्या द्या.

९. सर्वनामाचे प्रश्नार्थक, आत्मार्थक, व दर्शक हे उपयोग दाखविणारीं वाक्यें रचा.

१०. सर्वनामाचे विभक्ति आणि पुरुष यांचीं रूपें स्पष्ट करणारा एक तक्ता तयार करा.

११. संबंधी सर्वनाम व इतर पुरुषवाचक सर्वनामें ह्यांत फरक काय तें सांगा.

१२. गौण वाक्यांचीं उदाहरणें द्या व त्यांत सर्वनामाचें काय कार्य होतें तें सांगा.

१३. हा, तो ह्या दर्शक सर्वनामाच्या जोडींत भेद काय आहे तो स्पष्ट करा.

१४. खालीं सर्वनामाच्या वर्गीकरणाचा एक तक्ता दिला आहे, त्यांत त्या त्या जातीचीं सर्वनामें भरा.

सर्वनाम
- प्रत्यक्षदर्शी
  - पुरुषवाचक
  - आत्मदर्शक
  - प्रश्नार्थक
  - दर्शक
- अप्रत्यक्षदर्शी
  - संबंधी

१५. विशेषणाचे दोन मुख्य वर्ग कोणते ?

१६. अर्थमर्यादा व संख्यामर्यादा म्हणजे काय ? व विशेषण वापरल्यानें त्या कशा साधतात ?

१७. विशेषणांचें वर्गीकरण करा व त्याचा तक्ता तयार करा.

१८. विशेषण व संबंधी सर्वनाम यांतील फरक काय ?

१९. लोंकर ह्या शब्दापासून लोंकरी हें विशेषण आहे. असलीं विशेषणें तयार करा.

२०. पुढील नामांना योग्य अर्थदर्शक अशीं विशेषणें वापरा :—किल्ला, रात्र, बर्फ, सूर्यास्त, सूर्योदय, खेळाडू, उंदीर, चंद्र-प्रकाश, घोडधांव, गवत.

२१. क्रियाविशेषण अव्ययाची तुमच्या मताप्रमाणें एखादी व्याख्या तयार करा.

२२. कोणत्या क्रियाविशेषण अव्ययांमध्यें दोन वाक्यें जोडण्याचा धर्म आहे तें उदाहरणासह सांगा.

२३. विशेषण, सर्वनाम, नाम ह्यांपासून सिद्ध झालेलीं दोन दोन क्रियाविशेषण अव्ययें सांगा.

२४. पुढील क्रियाविशेषण अव्ययें वाक्यांत वापरून दाखवा :—जेव्हां-तेव्हां; ज्या-अर्थी—त्याअर्थी; यावज्जीव; येथून—तेथून; आपोआप; उत्तरोत्तर; अलीकडे.

२५. पुढील वाक्यांत योग्य क्रियाविशेषण अव्ययें घालून वाक्यें पूर्ण करा :—

हें इंग्रजी पुस्तक—ठेव. नदी—वाहाते.

विद्यार्थी अभ्यास—करतो. मी माझा जुना स्नेही—पाहिला.

कुत्रा—भुंकतो.

# रूपसिद्धि

## प्रत्यय व रूपें

**५२.** मागे शब्दांचे '**सव्यय** व **अव्यय**' हे दोन प्रकार सांगितले. नाम, सर्वनाम, विशेषण, क्रियापद हे **सव्यय** शब्दांचे पोटभेद; ह्यांना प्रत्यय लागतात. म्हणून ह्यांना सव्यय म्हणतात.

**५३.** शब्दाला कांहीं शब्द, किंवा अक्षरें पुढें जोडून वाक्यांत वापरण्यास योग्य केले म्हणजे त्याला '**रूप**' असें म्हणतात.

शब्दाला जीं अक्षरे पुढे जोडतात त्यांना '**प्रत्यय**' म्हणतात. वाक्यांत येणाऱ्या निरनिराळ्या प्रातिपदिकांना प्रत्यय जोडतात.

**५४.** हे प्रत्यय दोन प्रकारचे आहेत:—एक प्रकार म्हटला म्हणजे नाम, सर्वनाम यांचा क्रियापदांशीं असलेला संबंध दाखविणारे प्रत्यय व दुसरा प्रकार म्हटला म्हणजे क्रियापदाचे काल व अर्थ दाखविणारे प्रत्यय.

मराठींत पहिल्या प्रकारास **विभक्ति प्रत्यय** म्हणतात व दुसऱ्यास **क्रियापदाचे प्रत्यय** म्हणतात.

संस्कृतमध्यें पहिल्या प्रकारास **नाम विभक्ति** व दुसऱ्या प्रकारास **आख्यात विभक्ति** असें म्हणतात. विभक्ति म्हणजे विकार किंवा प्रत्यय होय. मराठींत नामसर्वनामांना जे प्रत्यय लागतात त्यानाच फक्त विभक्ति म्हणतात.

लिंग, वचन वगैरे दाखविणारे फरक ह्या प्रत्ययांत पुनः पडतात; व ते सर्व फरक विचारांत घेऊन प्रत्ययाचे सर्व प्रकार पुढीलप्रमाणे होतात:—

(अ) **नामसर्वनामविशेषणांचे—१ लिंग, २ वचन, ३ विभक्ति.**

(आ) **क्रियापदांचे—१ काळ, २ पुरुष, ३ लिंग, ४ वचन, ५ अर्थ.**

हे सर्व प्रत्यय पुढे त्या क्रमाने सागतों.

---

## लिंग

**५५.** सृष्टीमध्यें सजीव प्राण्यांच्या बाबतींत नर व मादी असे दोन प्रकारचे प्राणी ईश्वराने उत्पन्न केलेले दिसतात. नर जातीच्या प्राण्यांना **पुल्लिंगी** प्राणी

व मादी जातीच्या प्राण्यांना **स्त्रीलिंगी** प्राणी असें म्हणतात. पुल्लिंग व स्त्रीलिंग ह्या दोन लिंगांशिवाय नपुंसकलिंग म्हणून आणखी एक प्रकार आहे. ज्या वेळेस ठाम रीतीनें पुल्लिंग किंवा स्त्रीलिंग असा बोध होत नाहीं त्या वेळीं **नपुंसकलिंग** असें म्हणतात.

प्राण्यांसंबंधीं सृष्टीमध्ये ज्याप्रमाणें हीं तीन लिंगें मानतात, त्याचप्रमाणें तद्दर्शक शब्दांमध्येंहि व्याकरणांत तीन लिंगे मानतात. सजीव सृष्टींत ज्याप्रमाणें तिन्ही लिंगांपैकीं प्रत्येक लिंगाचे प्राणी आढळून येतात, त्याप्रमाणें निर्जीव अचेतन सृष्टींतहि प्रत्येक लिंगाचे निरनिराळे पदार्थ आढळून येतात. निर्जीव पदार्थांच्या बाबतींत त्याचें लिंग त्या पदार्थांच्या काल्पनिक पुरुषत्वावरून किंवा स्त्रीत्वावरून ठरवितात.

**५६.** शब्दाचा वास्तविक किंवा काल्पनिक पुरुषपणा, स्त्रीपणा किवा यांच्या-पेक्षां निराळेपणा दाखविणारा जो धर्म त्यास त्या। शब्दाचें **लिंग** म्हणतात.

**५७.** शब्दांचीं लिंगें तीन—१ **पुल्लिंग**, २ **स्त्रीलिंग**, ३ **नपुंसकलिंग.**

मराठी भाषेंत शब्दाचें लिंग ठरविण्याचे निश्चित नियम नाहींत. मराठी भाषा नवीन शिकणारांना ह्या बाबतींत फार अडचणी येतात.

पुरुषामध्यें शक्ति, जोर, कठीणपणा, मोठेपणा.हे गुण असतात.

स्त्रीमध्यें नाजुकपणा, सौंदर्य वगैरे गुण असतात.

निर्जीव पदार्थांचें लिंग ठरवितांना त्या पदार्थांच्या अंगीं पुरुषत्वाचे गुण किंवा स्त्रीत्वाचे गुण ह्यापैकीं कोणते गुण आहेत हे पाहतात. १ पदार्थामध्यें जोर, शक्ति, निबरपणा वगैरे गुण असले तर तो शब्द **पुल्लिंगी**; २ नाजुकपणा, मार्दव वगैरे गुण असले तर तो शब्द **स्त्रीलिंगी** व ३ ह्या दोन्हीपैकीं कोण-तेहि गुण नसून लघुत्व, क्षुद्रत्व, तिरस्करणीयत्व वगैरे गुण असले तर तो शब्द **नपुंसकलिंगी** अशी साधारणपणें शब्दांचे व्याकरणांतील लिंग ठरवितांना विचारसरणी असते.

**५८.** पुढील शब्दांत लिंगाचे भेद कसे झाले आहेत ते पहा.

| | पु. | स्त्री. | न. |
|---|---|---|---|
| उदा०— | मुलगा | मुलगी | मुलगें |
| | घोडा | घोडी | घोडें |
| | कुत्रा | कुत्री | कुत्रें |
| | बकरा | बकरी | बकरें |
| | कोल्हा | कोल्ही | कोल्हें |

५९. १. संस्कृतमधून जे तत्सम प्रकारचे शब्द मराठींत आले आहेत त्यांचीं लिंगें व त्यांचीं लिगें दाखविणारीं रूपें संस्कृतरूपासारखींच होतात.

| | पु. | स्त्री. | पु. | स्त्री. |
|---|---|---|---|---|
| उदा०— | विद्वान् | विदुषी | श्रीमान् | श्रीमती |
| | भगवान् | भगवती | युवा | युवती |
| | अन्नदाता | अन्नदात्री | ग्रंथकर्ता | ग्रंथकर्त्री |
| | दास | दासी | गोप | गोपी |
| | तरुण | तरुणी | हंस | हंसी |
| | हरण | हरिणी | मृग | मृगी |

हरि, गुरु, भानु इत्यादि पुल्लिंगी शब्द आहेत.

मति, रुचि, बुद्धि, तनु इत्यादि स्त्रीलिंगी शब्द आहेत.

२. कांहीं विवक्षित तत्सम शब्दांचें संस्कृतमधील लिंग मराठींत बदललें आहे.

| शब्द | संस्कृत लिंग. | मराठी लिंग. |
|---|---|---|
| स्वप्न | पुल्लिंग | नपुंसकलिंग |
| खड्ग | ,, | ,, |
| जन्म | नपुंसकलिंग | पुल्लिंग |
| मित्र | ,, | ,, |
| अश्रु | ,, | ,, |
| राशि | पुल्लिंग | स्त्रीलिंग |
| शपथ | ,, | ,, |
| मध्यान्ह | ,, | ,, |

ह्यांतील कांहीं शब्द मराठी कवितेमध्यें मूळ संस्कृतमधील त्यांच्या लिंगांत वापरण्यांत आले आहेत.

३. फारशी, इंग्रजी वगैरे दुसऱ्या भाषांमधून जे शब्द मराठींत आले आहेत त्यांचें लिंग त्यांच्या मराठींत होणाऱ्या अर्थावरून ठरवितात.

उदा०—पु०–फैसल्ला, इनसाफ (निकाल); स्त्री०–कंपनी (मंडळी); कमिटी (सभा), नपुं०–बूक (पुस्तक) स्टेशन (ठिकाण).

४. कांहीं प्राणिवाचक व धंदेवाचक पुल्लिंगी नामाचें स्त्रीलिंगरूप '**ईण**' प्रत्यय लावून तयार करतात.

| पुल्लिंग. | स्त्रीलिंग. |
|---|---|
| सिंह, वाघ. | सिंहीण, वाघीण. |
| सुतार, लोहार, कासार, गवळी. | सुतारीण, लोहारीण, कासारीण, गवळीण. |
| सोनार, माळी, शिक्षक. | सोनारीण, माळीण, शिक्षकीण. |

५. खालीं दिलेले शब्द दोन्ही लिंगी आहेत :—

वीणा (पु. आणि स्त्री.), वेळ (पु. आणि स्त्री.), तंबाखू (पु. स्त्री.) हरीण (पु. आणि न.), मजा (पु. आणि स्त्री.).

६. कांहीं शब्द सामान्यलिंगी म्हणजे तिन्ही लिंगी असतात :—

उदा०—मूल—(पु. स्त्री. न.), पोर—(पु. स्त्री. न.).

७. खालीं दिलेल्या शब्दांचीं स्त्रीलिंगीं रूपें अगदीं निराळींच होतात–

| | | |
|---|---|---|
| पुरुष—स्त्री | नवरा—बायको | बोका—भाटी |
| विधूर—विधवा | दीर—जाऊ | उंट—सांड, सांडणी |
| पुत्र—कन्या | मोर—लांडोर | वाघ्या—मुरळी |
| पिता—माता | बैल—गाय | साहेब—मडम |
| रेडा—म्हैस | खोंड—कालवड | |

## वचन

**६०.** शब्दाच्या रूपावरून पदार्थ एक आहे का अनेक आहेत याचा जो बोध होतो त्यास त्याचें '**वचन**' असें म्हणतात. वचनें दोन आहेत— **१ एकवचन. २ अनेकवचन.**

१. देव, मुलगा, कथा, माळ, पांखरूं हीं रूपें एकवचनी आहेत.

२. देव, मुलगे, कथा, माळा, पांखरें हीं रूपें अनेकवचनी आहेत.

शब्दाचें मूळ रूप हें एकवचनी असतें. त्यामध्यें फरक होत नाहीं. अनेकवचन दाखविणाऱ्या रूपांत मात्र फरक झालेला असतो. शब्दाच्या एकवचनी रूपाच्या अन्त्याक्षरांत फरक करून अनेकवचनी रूप तयार होतें.

**६१.** वचनाचे नियम पुढीलप्रमाणें तयार होतात.

### (अ) पुल्लिंगी शब्द

१. अकारान्त, इकारान्त, ईकारान्त, उकारान्त, ऊकारान्त, ओकारान्त शब्दांच्या अनेकवचनी रूपांत कांहीं फरक होत नाहीं. त्याचीं एकवचनी व अनेकवचनी रूपें सारखींच असतात.

| | ए. व. | अ. व. |
|---|---|---|
| **अकारान्त** | देव | देव |
| ,, | ढग | ढग |
| ,, | खांब | खांब |
| **इकारान्त** | कवि | कवि |
| ,, | अग्नि | अग्नि |
| **ईकारान्त** | पक्षी | पक्षी |
| ,, | तेली, धोबी | तेली, धोबी |
| **उकारान्त** | शत्रु, गुरु, हेतु | शत्रु, गुरु, हेतु |
| **ऊकारान्त** | लाडू, पेरू, गहूं | लाडू, पेरू, गहूं |
| **ओकारान्त** | खोखो, लाहो, टाहो, | खोखो, लाहो, टाहो |

२. आकारान्त नामाच्या अनेकवचनीरूपांत मात्र फरक होतो.

| | ए. व. | अ. व. |
|---|---|---|
| **आकारान्त** | आंबा, घोडा, चुलता | आंबे, घोडे, चुलते |
| | भ्राता, कुत्रा, लांडगा | भ्राते, कुत्रे, लांडगे |

## (आ) स्त्रीलिंगी शब्द

१. अकारान्त स्त्रीलिंगी नामाचें अनेकवचन कधीं आकारान्त तर कधीं ईकारान्त तर कधीं आकारान्त व ईकारान्त अशा दोन्ही प्रकारांनीं होतें.

| | ए. व. | अ. व. |
|---|---|---|
| **पहिला प्रकार.** आकारान्त. | आत, सून, लवंग | आता, सुना, लवंगा |
| | माळ, जीभ, वीट | माळा, जिभा, विटा |
| **दुसरा प्रकार.** ईकारान्त. | भित, केळ, रीत | भिंती, केळी, रीती |
| | वाघीण, माळीण | वाघणी, वाघिणी; माळणी |
| **तिसरा प्रकार.** आ व ईकारान्त. | | |
| | वागणूक, परात | वागणुका-की, पराता-ती |
| | मशाल, करमणूक | मशाला-ली, करमणुका-की |

२. ईकारान्त व ऊकारान्त स्त्रीलिंगी नामांचे अनेकवचन अनुक्रमानें याकारान्त व वाकारान्त होतें.

| | ए. व. | अ. व. |
|---|---|---|
| **ई**=आ | भाकरी, कात्री, जाळी | भाकऱ्या, कात्र्या, जाळ्या |
| | नदी, लेखणी | नद्या, लेखण्या |
| | काठी, धावळी | काठ्या, धावळ्या |
| **ऊ**=आ | सासू, बाजू, जळू | सास्वा, सासवा; बाजवा, जळवा |
| | पिसू, टाळू | पिसवा, टाळवा |

३. इतर अन्त्य वर्णांचीं कांहीं स्त्रीलिंगी नामे आहेत:—उदा०—आते, पै, बायको यांचीं अनेकवचनें आता, पया, बायका अशीं होतात.

४. कांहीं तत्सम शब्दांचीं अनेकवचनी रूपें तशींच (एकवचनाच्या रूपासारखींच) राहतात. उदा०:—विद्या, आशा, सुवासिनी, धेनु, रीति.

### (इ) नपुंसकलिंगी शब्द

१. अकारान्त नामाचें अनेकवचन एकारान्त होते.

| | ए. व. | अ. व. |
|---|---|---|
| उदा०— | घर, दार, फूल, शेत, सूप | घरें, दारें फुलें, शेतें, सुपें |

२. ईकारान्त व उकारान्त तत्सम नामाचीं एकवचनी व अनेकवचनी रूपे एकसारखीं होतात.

| | ए. व. | अ. व. |
|---|---|---|
| उदा०— | अस्थि, वारि, मधु, वपु. | अस्थि, वारि, मधु, वपु. |

३. ऊकारान्त नामाचें अनेकवचन एकारान्त होतें:—

| ए. व. | अ. व. |
|---|---|
| गुरूं, वासरू, पाखरू, लिंबू, तट्टू. | गुरं, वासरें, पाखरें, लिंबें, तट्टें. |

४. एकारान्त नामांचीं अनेकवचनी रूपें ईकारान्त होतात:—

| ए. व. | अ. व. |
|---|---|
| केळे, तळें, कुत्रे, देणे, घोसाळे. | केळीं, तळीं, कुत्रीं, देणीं, घोसाळीं. |

**६२.** पुल्लिंगी, स्त्रीलिंगी, नपुंसकलिंगी अशा तिन्ही लिंगी नामांचीं दोन्ही वचनांचीं रूपे वर दिलीं. त्यांवरून असे दिसून येईल कीं,

१. आकारान्ताशिवाय सर्व पुल्लिंगी नामें, आ–इ–उ–कारान्त स्त्रीलिंगी व इ–उ–कारान्त नपुंसकलिंगी नामे ह्यांचीं एकवचनी व अनेकवचनी रुपें सारखींच होतात. त्यांच्या अनेकवचनांत कांहीं फरक होत नाहीं.

२. पुल्लिंगी नामाच्या अनेकवचनाचा प्रत्यय '**ए** हा आहे.' ह्याला कांहीं अपवाद आहेत. उदा०—खांब, माळी, लाडू.

३. स्त्रीलिंगी नामाच्या अनेकवचनांचे प्रत्यय '**आ**' व '**ई**' हे आहेत.

४. नपुसकलिंगी नामाच्या अनेकवचनांचे प्रत्यय '**एं**' व '**ईं**' हे आहेत.

५. विशेषनामाचें अनेकवचन होत नाहीं. विशेषनाम जर सामान्य-नामाप्रमाणें वापरले असलें तर त्याचें अनेकवचन होतें.
उदा०—कलियुगांत **लाखों कर्ण** सांपडणें कठीण आहे.

६. आदर दाखवावयाचा असेल तर अनेकवचन (आदरार्थी बहुवचन वापरतात. उदा०—नानासाहेब पेशवे, माधवराव रानडे.

७. कांहीं नामें अनेकवचनीच पुष्कळ वेळां उपयोगांत येतात. उदा०—खडावा, मिशा, जोडे, देवी, कांजिण्या, आख्यापाख्या, मिटक्या, आळेपिळे इत्यादि.

८. पूर्वीच्या काळच्या ऐतिहासिक व्यक्तीविषयीं एकवचनी प्रयोग घालतात. उदा०—**नेपोलियन** लढाईत होता. **शिवाजी** तानाजीस म्हणतो. **बाजीराव** स्वारीस जातो.

९. पदार्थांची सामग्र्यानें एक गटानें एक कल्पना द्यावयाची झाली तर एकवचन योजतात. उदा०—लढाईत तीन हजार **गोरा** होता. रमण्यांत दक्षिणेसाठीं लाखों **ब्राह्मण** उभा असे. या गांवांत पांचशें **उंबरा** आहे.

१०. पुढें दिलेल्या नामांसारख्या कांहीं नामांचें अनेकवचन होत नाहीं. उदा०—पाणी, लोखंड, शिसें, तांबें इ.

त्यांच्यांतील प्रकार दाखवावयाचे असले तर अनेकवचनाचा उपयोग करतात.

## विभक्ति

**६३.** नामसर्वनामांचा क्रियापदाशीं संबंध निरनिराळ्या प्रकारानीं येतो. कर्ता म्हणून, कर्म म्हणून, करण—साधन म्हणून, संप्रदान–देणें म्हणून, अपादान—त्याग म्हणून, अधिकरण म्हणून असा निरनिराळ्या प्रकारांनीं येतो. कधीं नामसर्वनामांचा वाक्यांतील क्रियापदाशीं संबंध न येतां दुसऱ्या एखाद्या शब्दाशीं येतो. नामांचे व सर्वनामाचे वाक्यांत इतर शब्दांशीं येणारे संबंध ज्या विकारांनीं दर्शविले जातात त्यांना विभक्ति म्हणतात.

नामें व सर्वनामें ह्यांचा क्रियेशीं जो संबंध येतो त्याला कारक असें म्हणतात. ह्या प्रत्येक संबंधाला ओळीनें एक, दोन अशीं सातपर्यंत नांवें दिलीं आहेत.

**प्रथमा, द्वितीया, तृतीया, चतुर्थी, पंचमी, षष्ठी, सप्तमी** अशीं त्यांचीं नांवें आहेत.

'**षष्ठी**' म्हणून जी सहावी विभक्ति आहे तिचा संबंध क्रियापदाशीं न येतां वाक्यांतील इतर नामांशीं येतो.

ह्या साताशिवाय आणखी एक '**संबोधन**' म्हणून विभक्ति आहे. एखाद्याला हाक मारताना, बोलावतांना ही विभक्ति वापरतात. अशा ह्या आठ विभक्ति होत.

प्रत्येक विभक्तीस एकवचन व अनेकवचन दाखविणारे प्रत्यय आहेत.

**६४.** विभक्तींचे प्रत्यय व त्यांचे अर्थ खालीं दिले आहेत:—

| विभक्ति | एकवचन प्रत्यय | अनेकवचन प्रत्यय |
|---|---|---|
| १ प्रथमा | — | — |
| २ द्वितीया | **—, स, ला, तें** | **—, स, ला, ना, तें** |
| ३ तृतीया | **नें, एं, शीं** | **नीं, इं, हीं, शीं** |
| ४ चतुर्थी | **स, ला, तें** | **स, ला, ना, तें** |
| ५ पंचमी | **ऊन, हून** | **ऊन, हून** |
| ६ षष्ठी | **च** (पु. स्त्री. न. **चा, ची, चें**) | **च** (पु. स्त्री. न. **चा, ची, चें**) |
| ७ सप्तमी | **ई, आं, (आं) त** | **त, ई, (आं) त** |
| ८ संबोधन | — | **नो** |

१. एकंदर विभक्ति संबोधनासह आठ आहेत.

२. प्रथमा विभक्तीला प्रत्यय नाहींत. शब्दाचें मूळ रूप तेंच प्रथमेचें रूप असतं. ( शास्त्राच्या खऱ्या दृष्टीनें बोलावयाचें म्हणजे शब्दाला प्रत्यय लागून त्याचा लोप झाला आहे. ह्या खेरीज तो शब्द वापरण्यास योग्य असें रूप होत नाहीं. )

३. शब्दाचें प्रत्ययान्वित असेंच रूप वाक्यांत वापरतां येण्याजोगें असतें; मग तो प्रत्यय प्रत्यक्ष दिसो अथवा त्याचा लोप झालेला असो.

४. द्वितीया विभक्तीच्या बाबतींत हे दोन्ही प्रकार आढळून येतात. कधीं प्रथमेप्रमाणें तिच्या प्रत्ययाचा लोप होतो, तर कधीं **स, ला, ना, तें**

इत्यादि तिचे प्रत्यय लागून द्वितीयेचीं रूपें होतात. तेव्हां द्वितीयेचे दोन प्रकार आहेत:—१ **अप्रत्यय द्वितीया,** २ **सप्रत्यय द्वितीया.** ही विभक्ति कर्माची असते.

## सामान्यरूप

**६५.** विभक्तीचे प्रत्यय लावतांना सविभक्तिक शब्दाला विकार होऊन जें रूप तयार होतें त्यास **सामान्यरूप** म्हणतात. हें रूप सर्व विभक्तींच्या बाबतींत एकच, सारखें सामान्य असे होते म्हणूनच त्याला **सामान्यरूप** म्हणतात.

शब्दाचा अन्त्य स्वर जसा असेल त्याप्रमाणे हें सामान्यरूप बदलतें.

**६६.** मराठींत सामान्यरूप साधण्याचे सात प्रकार आहेत. बहुतेक शब्दांचें एकवचनी आणि अनेकवचनी सामान्यरूप एकच असते. शब्दांचे सामान्य-रूप सिद्ध झाल्यावर एकवचनी किंवा अनेकवचनी विभक्तीचे प्रत्यय लावून तीं तीं रूपे सिद्ध होतात. कांहीं शब्दाचें मात्र एकवचनी सामान्यरूप निराळें आणि अनेकवचनी सामान्यरूप निराळे होते.

**प्रकार १** – अकारान्त सामान्यरूप.

| | | ए० व० | अ० व० |
|---|---|---|---|
| (पु.) | वाघ | वाघास | वाघांस |
| | खांब | खांबास | खांबांस |
| (न.) | घर | घराचे | घरांचें |
| | वासरूं | वासराचे | वासरांचें |

**प्रकार २** – ईकारान्त सामान्यरूप

| | | ए. व. | अ. व. |
|---|---|---|---|
| (पु.) | कवि | कवीला | कवींना |
| (स्त्री.) | भिंत | भिंतीचा | भिंतींचा |
| ,, | देवी | देवीस | देवींस |

प्रकार ३ – ऊकारान्त सामान्यरूप

| | | ए. व. | अ. व. |
|---|---|---|---|
| (पु.) | खाऊ | खाऊस | खाऊंस |
| (स्त्री.) | बाजू | बाजूचा | बाजूंचा |
| (न.) | वपु | वपूला | वपूंना |

प्रकार ४ – एकारान्त सामान्यरूप

| | | ए. व. | अ. व. |
|---|---|---|---|
| (स्त्री.) | सून | सुनेला | सुनांना |
| ,, | जीभ | जिभे | जिभांस |

प्रकार ५ – ओकारान्त सामान्यरूप

टाहो, कोको, फोनो, फोटो इत्यादि ओकारान्त शब्दांचें सामान्यरूप मूळ शब्दासारखेंच म्हणजे ओकारान्तच होतें.

बायको या ओकारान्त शब्दाचें एकवचनी सामान्यरूप मूळ शब्दासारखें राहतें, पण अनेकवचनीं मात्र आ–कारान्त सामान्यरूप होते.

| | | ए. व. | अ. व. |
|---|---|---|---|
| (स्त्री.) | बायको | बायकोचा | बायकांचा |

प्रकार ६ – या-कारान्त सामान्यरूप.

| | | ए. व. | अ. व. |
|---|---|---|---|
| (पु.) | घोडा | घोड्यास | घोड्यांस |
| ,, | माळी | माळ्यानें | माळ्यांनीं |
| (स्त्री.) | स्त्री | स्त्रियेला | स्त्रियांना |
| (न.) | पाणी | पाण्याचा | पाण्यांचा |
| ,, | तळें | तळ्याचा | तळ्यांचा |

प्रकार ७ – वा-कारान्त सामान्यरूप.

| | | ए. व. | अ. व. |
|---|---|---|---|
| (पु.) | भाऊ | भावास | भावांस |
| (स्त्री.) | जाऊ | जावेस | जावांना |
| (न.) | तारू | तारवास | तारवांना |

६७. सामान्यरूप हें सर्व आर्यभाषांत होतें. संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश ह्या सर्व पूर्वीच्या भाषांत असे रूप होई. बिहारी, गुजराती, पजाबी, सिंधी ह्या भाषांतहि होतें. सामान्यरूप हें जरी उच्चारास सोपे असे रूप असले तरी त्याच्यामागें इतिहास असून ते हळूंहळूं उत्क्रांत होत आलें आहे. मराठीच्या जुन्या स्वरूपाच्या भाषेत सामान्यरूप होत असे.

उदा०—घराचेया, देवाचिया, देवाचे–आ, देवाचेया.
देविआ, भक्तिआ, पुणिया–स, पुणियाचे.

अशीं जुनीं रूपें आढळतात. ह्या सर्व रूपांत एआ, एया, इआ, इया, या इत्यादि रूपे दिसतात. हीं सर्व 'इदम्,' ह्या सर्वनामापासून उत्पन्न झालीं आहेत. कोणी म्हणतात कीं वर दिलेले सामान्यरूपाचे पाची प्रकार संस्कृतमधील षष्ठी विभक्ति किंवा चतुर्थी विभक्ति ह्यांच्या प्रत्ययापासून निघाले आहेत.

उदा०–हस्तस्य—हत्थह—हातहं—हातअ—हाता–स.
हस्तानाम्—हत्थणं—हातणं—हातअं—हातां–स.

असेच बाकीचे चारी प्रकार निघूं शकतात.

६८. १. खालीं दिलेल्या शब्दांचें एकवचनी सामान्यरूप एक प्रकारानें व अनेकवचनी सामान्यरूप दुसऱ्या प्रकारानें होतें.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| बायको—बायको–स, | बायकां–स; | काठी—काठी–स, | काठ्यां–; |
| आत—आते–स, | आतां–स; | नदी—नदी–स, | नद्यां–स; |
| सून—सुनेस, | सुना–स; | घोडी—घोडी–स, | घोड्यां–स; |
| चिंच—चिंचे–स, | चिंचां–स; | स्त्री—स्त्रिये–नें, | स्त्रियां–नीं; |
| गुंज—गुंजे–स, | गुंजां–स. | | |

२. खालीं दिलेल्या नामांचीं सामान्यरूपें दोन प्रकारांनीं होतात :—

| | |
|---|---|
| सासू—सासू–स, सासवे–स; | सासूं–ना, सासवां-ना; |
| जाऊ—जाऊ–स, जावे–स; | जाऊं–ना, जावा-ना; |
| ढाल—ढाली–स, ढाले–स; | ढालीं–स, ढालां-ना; |
| शाल—शाली–स, शालेस; | शालीं–स, शालां-ना; |

३. खालीं दिलेल्या नामांचें मूळ रूपापेक्षां निराळें असें सामान्यरूप होत नाहीं. त्यांचें मूळ रूप तेंच सामान्यरूप होतें.

एकाक्षरी शब्द—क-ने, ब-ला, ऊ-ची ट्र, इ.

रूढ न झालेले परकी शब्द—जार्ज–नें, जेम्स–ला.

देशाचीं व गांवाचीं नावें—इंग्लंड–ला, हिंदुस्थाननें.

६९. खाली विभक्तींचीं रूपें दिलीं आहेत :—

## १. नामाचीं विभक्तीचीं रूपें

| | **पु. अकारान्त.** | | **स्त्री. आकारान्त.** | |
|---|---|---|---|---|
| | ए. व. | अ. व. | ए. व. | अ. व. |
| **प्र.** | राम | राम | रमा | रमा |
| **द्वि.** | रामास–ला–ते | रामां–स–ला–ना–तें | रमेस–ला–ते | रमांस–ला–ना–तें |
| **तृ.** | रामा–ने–रामें–शीं, | रामां-नीं, रामीं, रामांहीं, रामांशीं | रमेनें–शीं | रमां–नीं, रमाहीं, रमांशीं |
| **च.** | द्वितीयेप्रमाणें | | द्वितीयेप्रमाणे. | |
| **पं.** | रामाहून | रामांहून, | रमाहून | रमांहून |
| **ष.** | रामाचा–ची–चे | रामाचा–ची–चें | रमाचा–ची–चें रमेचा | रमांचा-चीं-चें |
| **स.** | रामांत, रामीं | रामांत, रामीं | रमांत, | रमांत |

इतर स्वरांमध्ये अन्त होणारीं नामें तिन्ही लिंगात वर सांगितलेल्या नियमाप्रमाणें त्यांचीं सामान्यरूपें तयार करून नंतर विभक्तींचे प्रत्यय लावून चालवावींत.

## २. सर्वनामाचीं विभक्तींचीं रूपें

| | ए. व. | अ. व. |
|---|---|---|
| १ | मी | आम्ही |
| २ | मला, माते-मस | आम्हाला–स–ते |

| | |
|---|---|
| ३ म्या, मीं, मजशीं | आम्हीं, आम्हाशीं |
| ४ मला, मजला, मातें | आम्हांस, आम्हांला |
| ५ मजहून | आम्हांहून |
| ६ माझा | आमचा |
| ७ माझ्यांत | आमच्यात |

असे '**तूं**' हे सर्वनाम चालते.

**तो** ( सामान्यरूप **त्या** )

| | |
|---|---|
| १ तो | ते |
| २ त्यास-ला-तें | त्यांस, त्याना-ते |
| ३ त्याने, त्याशीं | त्यानीं–हीं, शी |
| ४ त्यास–ला | त्यांला, त्यांना |
| ५ त्याहून | त्यांहून |
| ६ त्याचा | त्यांचा |
| ७ त्यांत | त्यांत |

**ती,** व **तें** हीं दोन्ही रूपें थोड्याशा फरकानें ह्याप्रमाणें चालवावीं.

तसेंच 'हा, जो, ही, जी, हें, जें, जशी, कशी' वरीलप्रमाणे चालवावींत.

मी व आम्ही यांचीं–माझ्यानें, माझ्याशीं, आमच्याने, आमच्याशीं ( तृ. ); माझ्याहून, आमच्याहून ( पं. ); माझ्यांत, आमच्यात ( स. ); अशीं रूपे कधीं कधीं होतात. अशींच रूपें तूं, तो, जो याचींहि होतात. विभक्ति प्रत्यय लागण्यापूर्वी एक अक्षर अधिक येते. यांना सविकरणी तृतीया–पंचमी–सप्तमी असें म्हणतात.

**कोण**—( सामान्यरूप **कोणा** )

| | |
|---|---|
| १ कोण | कोण |
| २ कोणास-ला-ते | कोणास-ला-तें |
| ३ कोणी | कोणी |
| ४ कोणास | कोणास-ला-तें |

| | |
|---|---|
| ५ कोणाहून | कोणाहून |
| ६ कोणाचा-ची-चे | कोणाचा-ची-चें. |
| ७ कोणांत | कोणांत |

'कोणता' कोणप्रमाणे चालवावा.

## ३. विशेषणांचीं विभक्तींचीं रूपें

विभक्तिप्रत्यय लावलेल्या नामाचे जे विशेषण असतें त्याचें सामान्यरूप होतें. अकारात व इतर कांहीं विशेषणाचें सामान्यरूप होत नाहीं.

उदा०—दुष्ट मनुष्य; दुष्ट मनुष्याने. रुपेरी पडद्यावर, नागपुरी लुगड्यांचे रंग, मऊ बिछान्यावर.

आकारान्त व इतर कांहीं विशेषणाचें सामान्यरूप होतें.

उदा०—चागला मनुष्य; चागल्या मनुष्याने. वेडं कोंकरूं; वेड्या कोंकरानें.

विशेषण नामाप्रमाणे वापरलें म्हणजे त्याचें सामान्यरूप होऊन त्याला विभक्तीचे प्रत्यय नामाप्रमाणें लागतात.

| पु. | | स्त्री. |
|---|---|---|
| शहाणा | शहाणे | शहाणी |
| शहाण्यास-ला-ते | शहाण्यास-ला-ना-ते | शहाणीस-ला-तें |
| शहाण्याने-एं-शीं | | शहाणीनें-शीं |
| इतर रूपें आकारान्त नामाप्रमाणें | | इतर रूपे ईकारान्ताप्रमाणें. |

पहिला, दोघे, इ. वरीलप्रमाणे.

| पु. | स्त्री. |
|---|---|
| एक | एक |
| एकाला | एकीस-ला |
| एकानें | एकीने-शीं |

इ. इ. इ.

## क्रियापदाचीं रूपें

**७०.** वाक्यांत कर्ता हा जसा एक मुख्य शब्द असतो तसें 'क्रियापद' हि एक महत्त्वाचा मुख्य शब्द आहे.

धातूला अर्थ व काळ ह्यांचे प्रत्यय लागून जे रूप तयार होतें व जे वाक्याची पूर्णता करते त्यास **क्रियापद** म्हणतात.

वाक्यांत क्रियापद व कर्ता ह्यांचा संबंध असल्यामुळें कर्त्याच्या लिंग, वचन, व पुरुष ह्यांप्रमाणें क्रियापदाच्या रूपांत फरक पडतो. कर्ता हा प्रथम, द्वितीय किंवा तृतीय पुरुषी असूं शकेल, पुल्लिंगी, स्त्रीलिंगी किंवा नपुंसकलिंगी असूं शकेल व त्याचें एकवचन किंवा अनेकवचन असूं शकेल. त्याप्रमाणे क्रियापदाच्या रूपांतहि फरक पडेल.

## अर्थ

**७१.** वाक्यांतील क्रिया ज्या उद्देशाने घडते त्या उद्देशाला **अर्थ** म्हणतात. हा अर्थ क्रियापदाच्या रूपावरून ओळखला जातो.

क्रियापदाचे 'अर्थ' चार आहेत:—

१ **स्वार्थ**, २ **आज्ञार्थ**, ३ **विध्यर्थ**, ४ **संकेतार्थ.**

१. ज्यावेळीं वाक्यांत साधें सरळ विधान केलें असतें व त्यामध्यें विशेष उद्देश नसतो त्यावेळीं '**स्वार्थ**' होतो. हे विधान होकारार्थी, नकारार्थी किंवा प्रश्नार्थीहि असेल. उदा०—

१ झाडावर फुलें आहेत. २ ह्या झाडास फुले येत नाहींत.

३ ह्या झाडास फुले कां येऊं नयेत ?

२. वाक्यांत आज्ञा, आशीर्वाद, प्रार्थना, इच्छा वगैरे दाखविण्याचा जेव्हां उद्देश असतो तेव्हां तें क्रियापद **आज्ञार्थी** असते. आज्ञार्थांत द्वितीय पुरुषी कर्ता कधीं कधीं अध्याहृत असतो. उदा०—

१ जा आणि आपलें काम कर. २ ईश्वर करो आणि गांवांतील सांथ बरी होवो.

३ राजा प्रजेचें रक्षण करो.

३. ज्यावेळीं क्रियापदाच्या रूपावरून विधि म्हणजे कर्तव्य, धर्म, योग्यता ह्यांस प्राधान्य येतं त्यावेळीं तें क्रियापद **विध्यर्थी** असतें. उदा०—

१ मनुष्यानें खरें बोलावें. २ मुलांनीं विद्या शिकावी.
३ ईश्वरानें सुबत्ता करावी.

वाक्यांत दाखविल्या जाणाऱ्या उद्देशाच्या दृष्टीनें कधीं कधीं आज्ञार्थ आणि विध्यर्थ हे दोन्ही सारखेच उद्देश दाखवितात.

विध्यर्थ दाखविणारे प्रत्यय **वा** ( पु. ), **वी** ( स्त्री. ), **वें** ( न. ) हे आहेत.

४. ज्यावेळीं क्रियापदाच्या रूपावरून संकेत, अट, संशय इत्यादि उद्देश समजतात त्यावेळीं **संकेतार्थ** होतो. सकेतार्थी वाक्यांत जर, तर, जरी, तरी, यद्यपि, तथापि हीं अव्ययें घालतात. उदा०—१ पाऊस जर पडता तर सुबत्ता होती. २ तो जर येता तर बरे झालें असतें.

५. क्रियापदाच्या तीन अर्थांपैकीं 'स्वार्थी' व 'संकेतार्थी' क्रियापद वर्तमान, भूत, भविष्य ह्या तिन्ही काळीं असूं शकतें.

मनुष्य काम करतो—स्वार्थी वर्तमानकाळ
मनुष्यानें काम केलें—स्वार्थी भूतकाळ
मनुष्य काम करील—स्वार्थी भविष्यकाळ

आज्ञार्थी व विध्यर्थी क्रियापद वर्तमान व भविष्य ह्या दोन्ही काळीं असूं शकतें.

तू काम कर—आज्ञार्थी वर्तमान
तो काम करो—आज्ञार्थी भविष्य
तूं काम आज (उद्यां) करावें—दोन्ही काळीं रूप सारखेंच.

## काळ

**७२.** वाक्यांत सांगितलेली क्रिया घडल्याची जी वेळ तिला त्या क्रियापदाचा **काळ** म्हणतात. हे काळ क्रियापदाच्या रूपांवरून समजले जातात.

काळ तीन आहेत :—१ **वर्तमान,** २ **भूत,** ३ **भविष्य.**

## १. वर्तमानकाळ

१. क्रिया ज्या चालू सध्यांच्या काळीं घडते त्याला क्रियेचा **वर्तमानकाळ** म्हणतात.

गुरूं गवत खाते. विद्यार्थी अभ्यास करतो.

एखादी क्रिया सर्वकाळीं सारखीच लागू असते. त्यावेळींहि वर्तमानकाळ असतो.

गुरें गवत खातात. साधु पुरुष सत्य बोलतात.

कधीं पूर्वीच्या काळची क्रिया अगदीं नजीकच्या पूर्वीच्या काळची असून सुद्धां सध्यांच घडत आहे असें समजून क्रियापद वर्तमानकाळीं वापरतात.

अर्जुन म्हणतो मी कौरवांचा निःपात करीन.
मी हा आतांच जेवून उठतों आहें, फक्त हातच धुतले.

कधीं पुढील काळची क्रियाहि आतां लगेच होत आहे असें समजून तिच्यासंबंधीं क्रियापद वर्तमानकाळीं वापरतात.

उदा०—तूं येशील तेव्हां मी निघतों.

वर्तमानकाळांतील क्रिया ज्याप्रमाणें अपूर्ण, किंवा सतत घडली असेल त्याप्रमाणें **अपूर्ण वर्तमान, चालू वर्तमान, रीतिवर्तमान** असे वर्तमान-काळाचे **पोटभेद** होतात.

मी काम करतों. मी काम करीत आहे.

**७३.** वर्तमानकाळाचे प्रत्यय पुढें दिले आहेत. ते धातूला लाविले म्हणजे वर्तमानकाळीं क्रियापदाचीं रूपें तयार होतात.

| | | एकवचन | | | अनेकवचन |
|---|---|---|---|---|---|
| | | पु. | स्त्री. | न. | तिन्ही लिंगीं |
| प्र. | पु. | **तों** | **तें** | **तें** | **तों** |
| द्वि. | पु. | **तोस,** | **तेस, तीस** | **तेंस** | **तां, ता** |
| तृ. | पु. | **तो** | **ते, ती** | **तें** | **तात** |

ह्या प्रत्ययांवरून असें दिसेल कीं लिंगाप्रमाणे एकवचनांत प्रत्यय बदल-तात. अनेकवचनांत तिन्ही लिंगी प्रत्यय सारखेच आहेत. मराठींतील

वर्तमानकाळाचें रूप संस्कृतमधील वर्तमानकाळधातुसाधित विशेषणापासून आल्यामुळे तें लिंगाप्रमाणें बदलतें. वर्तमानकाळांत स्त्रीलिंगाचीं त्यें, त्येस, तां, (अ. व.) हे प्रत्यय लागून रूपें होतात. परंतु त्यांचा प्रसार अलीकडील अर्वाचीन मराठींत कमी कमी होत चालला आहे. तीं रूपें फारशीं आढळत नाहींत.

## २. भूतकाळ

**७४.** वाक्यांतील क्रिया चालू काळाच्या पूर्वीं घडली असेल तर त्या क्रियेच्या काळास **भूतकाळ** म्हणतात.

उदा०—विद्यार्थी उभा राहिला. विद्यार्थ्यानें पुस्तक वाचिलें.
आतांच उजाडलें.

लगतच्या भविष्यकाळीं होणारी क्रिया किंवा लगतच्या वर्तमानकाळीं झालेली क्रिया कधीं कधीं भूतकाळाच्या प्रत्ययानें दाखविली जाते.

हा मीं आलोंच, जरा थांबा. (भविष्यकाळाची क्रिया.)

भूतकाळाची क्रिया पुरी किंवा अपुरी झाली असेल त्याप्रमाणें **पूर्ण भूतकाळ, अपूर्ण भूतकाळ** इत्यादि त्याचे **पोटभेद** आहेत.

त्यानें पुस्तक वाचिलें होतें. तो पुस्तक वाचीत होता. इ.

भूतकाळचे प्रत्यय खालीलप्रमाणें आहेत:—

| | पुल्लिंग | | स्त्रीलिंग | | नपुं. लिंग | |
|---|---|---|---|---|---|---|
| | ए. व. | अ. व. | ए. व. | अ. व. | ए. व. | अ. व. |
| प्र. | **लों** | **लों** | **लें** | **लों** | **लें** | **लों** |
| द्वि. | **लास** | **ला, लात** | **लीस** | **लां, लात** | **लेंस** | **लां, लात** |
| तृ. | **ला,** | **ले, लेत** | **ली** | **ल्या** | **लें** | **लीं** |

**धर धातूचीं रूपें**

| | पुल्लिंग | | स्त्रीलींग | | नपुं. लिंग | |
|---|---|---|---|---|---|---|
| | ए. व. | अ. व. | ए. व. | अ. व. | ए. व. | अ. व |
| प्र. | धरिलों | धरिलों | धरिलें | धरिलों | धरिलां | धरिलों |
| द्वि. | धरिलास, | धरिला-लात | धरिलीस | धरिला-लात | धरिलेंस | धरिल-लात |
| तृ. | धरिला | धरिले-लेत | धरिली | धरिल्या | धरिलें | धरिलीं |

इतर रूपें अशींच सिद्ध होतात.

**ल्ये, ल्या** ( स्त्री. ), **लीं त, लेत** ( न. ) हेहि भूतकाळाचे प्रत्यय आहेत. परंतु ह्या प्रत्ययाचीं रूपें अर्वाचीन मराठींत कमी वापरात येतात. तीं रूपें न वापरण्याकडे बोलणारांचा कल आहे.

वर्तमान व भूतकाळाचीं कांहीं धातूंचीं रूपें तयार होतांना प्रत्ययापूर्वी **'इ'** हा आदेश कधीं विकल्पानें तर कधीं नेहमीं होतो; अर्वाचीन मराठी भाषेत **'इ'** हा आदेश न करण्याकडे प्रवृत्ति आहे.

१. अकारान्त सकर्मक धातूस **'इ'** आदेश होतो.

उदा०—धर, धरितो, धरिला.

२. आचार, आठव, उत्तर, जेव, चाव, जिक, थुंक इत्यादि धातूंस **'इ'** हा आदेश विकल्पानें होतो. ह्या धातूंच्या गणाला **आचरगण** म्हणतात.

उदा०—आचरतो, आचरले; आचरितो, आचरिले इत्यादि.

३. उमजगणांतील धातूंना **'इ'** आदेश होत नाहीं. ह्या गणात उमज, ओक, खेळ, चढ, पसर, पोंच, पोह, पढ, बोल, म्हण इ. धातु येतात. उमजतो—उमजला; ओकतो—ओकला; चढतो—चढला.

४. कांहीं धातूंचीं रूपे अनियमित रीतीनें होतात.

आकारान्त :—ध्या—ध्याइला, गा—गाइली, गाइले.

पी—प्यालों, भी—भ्यालों, वी—व्याली.

## ३. भविष्यकाळ

**७५.** वाक्यांतील क्रिया पुढें येणाऱ्या काळात घडणार असेल तर त्या क्रियेच्या काळास **भविष्यकाळ** असे म्हणतात. ती क्रिया दाखविणारें क्रियापद भविष्यकाळीं असतें.

| | ए. व. | | अ. व. |
|---|---|---|---|
| प्र. | **ईन** ( सकर्मक व 'जा,' 'खा' इत्यादि एकावयवी अकर्मक धातूंस); | **एन** ( अकर्मक व 'शीक,' 'बोल' इत्यादि सकर्मक ); | ऊं |

| | ए. व. | | अ. व. |
|---|---|---|---|
| द्वि. | **शील** | | **आल** |
| तृ. | **ईल** ( सकर्मक व 'जा', 'खा' इत्यादि एकावयवी अकर्मक ); | **एल** ( अकर्मक व 'शीक', 'बोल' इत्यादि सकर्मक ); | **तील** |

कर्त्यांच्या लिंगभेदाप्रमाणे हे प्रत्यय बदलत नाहींत. तिन्ही लिंगांत सारखेच प्रत्यय असतात.

कर व बस धातूंचीं भविष्यकाळचीं रूपे :--

| | ए. व. | अ. व. | ए. व. | अ. व. |
|---|---|---|---|---|
| प्र. | करीन | करूं | बसेन | बसूं |
| द्वि. | करशील | कराल | बसशील | बसाल |
| तृ. | करील | करतील | बसेल | बसतील |

**ईन** हा सकर्मक धातूंचा प्रत्यय अकर्मक धातूंनाहि अर्वाचीन मराठींत लावलेला आढळतो :—बसीन, पडीन; परंतु हीं रूपे अद्याप शुद्ध समजलीं जात नाहींत.

## ४. रीतिभूतकाळ

७६. मराठींत आणखी एका—रीतिभूतकाळाचे—स्वतंत्र प्रत्यय आहेत. वाक्यातील क्रिया मागील काळांत सारखी चालू असली म्हणजे त्या क्रियेच्या काळास **रीतिभूत** असें म्हणतात. उदा०--अर्जुन बाण फेंकी. योद्धे पूर्वी लढत.

| | ए. व. | अ. व. |
|---|---|---|
| प्र. | **ई** ( सकर्मक ), **एं** ( अकर्मक ) | **ऊं, ओं** |
| द्वि. | **स** | ( आ ), **आ** |
| तृ. | **ई** ( सकर्मक ), **ए** ( अकर्मक ) | **त** |

ह्याच रूपांसारखीं क्रियापदाचीं रूपे पद्यांत वापरलेलीं आढळतात.

उदा०——नामा **म्हणे** पुरुषोत्तमा. **उतरे, चढे** हि **वर्षे**. देव **करी** तरी काय येक **नोहे** ?

| | **कर** धातूचीं रूपें. | | **बस** धातूचीं रूपें. | |
|---|---|---|---|---|
| | ए. व. | अ. व. | ए. व. | अ. व. |
| प्र. | करीं | करूं, करों. | बसे | बसूं, बसों |
| द्वि. | करीस | ( करां ) करा | बसस | ( बसां ) बसा |
| तृ. | करी | करीत | बसे | बसत |

अर्वाचीन मराठींत **करा, बसा** अशींच रूपें येतात. करां, बसां अशीं सानुस्वार रूपें वापरत नाहींत म्हणून कंसांत दिलीं आहेत.

**७७.** आज्ञार्थ, विध्यर्थ व संकेतार्थ ह्यांचे उद्देश वर दिलेच आहेत. येथें त्याचें प्रत्यय देतों.

| | **आज्ञार्थ** | | **विध्यर्थ** | |
|---|---|---|---|---|
| | ए. व. | अ. व. | ए. व. | अ. व. |
| प्र. | **ऊं ( ओं )** | **ऊं ( ओं )** | **आवा** | **आवे** |
| द्वि. | **( ई, एं )** | **आ** | **आवास** | **आवेत, आवे** |
| तृ. | **ऊ, ओ** | **ऊत, ओत** | **आवा** | **आवेत, आवे** |

ह्याचें स्त्रीलिंग **आवी, आव्या,** नपुंसकलिंग **आवें, आवीं** अशीं रूपें होतात. आद्य ' आ ' धातूच्या अन्त्य स्वरांत मिळतो.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| प्र. | करूं–रों | करूं | करावा | करावे |
| द्वि. | कर | करा | करावास | करावेत |
| तृ. | करू, करो | करूत, करोत | करावा | करावे–वेत |

**संकेतार्थ प्रत्यय**

| | पु. लिं. | | स्त्री. लिं. | | न. लिं. | |
|---|---|---|---|---|---|---|
| | ए. व. | अ. व. | ए. व. | अ. व. | ए. व. | अ. व. |
| प्र. | **तों** | **तों** | **तें** | **तों** | **तें** | **तों** |
| द्वि. | **तास** | **तां, तेत** | **तीस** | **तां, त्यात** | **तेंस** | **तां, तींत** |
| तृ. | **ता** | **ते** | **ती** | **त्या** | **तें** | **तीं** |

| | | |
|---|---|---|
| प्र. | करितों | करितों |
| द्वि. | करितास | करितां–तेत |
| तृ. | करिता | करिते |

याप्रमाणेच स्त्रीलिंगी व नपुंसकलिंगी प्रत्यय लावून त्याचीं रूपें बनतात.

# वाक्य सिद्धि

## शब्दक्रम

७८. बोलणाराच्या मनांतील एखाद्या पूर्ण विचाराचा पूर्ण उच्चार म्हणजे **वाक्य** होय. वाक्यांत मुख्य शब्द दोन—ज्याच्याविषयीं बोलावयाचे तो—**कर्ता** व जे बोलावयाचे ते—**क्रियापद.** मराठी भाषेंत वाक्यांतील शब्दाचा क्रम स्थूल भानानें ठरला आहे. प्रथम **कर्ता**, नंतर असल्यास **कर्म** व शेवटीं **क्रियापद.**

उदा०—मनुष्य काम करतो. मनुष्य चालतो.

कर्त्यांचीं व कर्माचीं विशेषणें असलीं तर तीं कर्त्याच्या व कर्माच्या पूर्वी येतात. विधिविशेषण मात्र विशेष्याच्या पुढें येतें.

उदा०—मेहनती व कष्टाळु मनुष्य काम करतो. तो विद्यार्थी हुशार आहे.

वाक्यांत क्रियाविशेषण अव्यये असलीं तर तीं क्रियापदाच्या लगत पूर्वी येतात. त्याचा विशेषणाशीं किंवा इतर क्रियाविशेषणांशीं संबंध असेल तर तीं त्या त्या शब्दाच्या पूर्वी लगत येतात. उदा०—तो विद्यार्थी जलद वाचतो.

कालदर्शक व स्थलदर्शक क्रियाविशेषण अव्ययें कर्त्यानंतर लगेच येतात.

मी आजपर्यंत तुझ्यासारखे छपन्न पाहिले.
शिकाऱ्यानें काल तेथें त्या दरींत वाघाला मारिलें.

कर्ता व कर्म आणि त्यांच्या संबंधाचे शब्द ह्यांशिवाय इतर विभक्त्यंत शब्द किंवा शब्दयोगी अव्ययान्त शब्द बोलणाराच्या इच्छेप्रमाणें पुढें-मागें परंतु क्रियापदाच्या पूर्वी येतात. उदा०—चांगला मनुष्य आपलें काम फार विचारानें व शांत वृत्तींत राहून करतो.

भावनेच्या किंवा विकाराच्या आवेशांत जर मनुष्य बोलूं लागला तर वर सांगितलेला वाक्यांतील शब्दांचा क्रम बदलतो.

उदा०—करायचें काय ! आहे कोठें तो चोर ? टाकतों मारून त्याला
एकदाचें झटकन् ! अरेरे, करावे काय त्या बिचारीनें ?

वाक्यांत निरनिराळ्या विभक्तींचे प्रत्यय लागलेले शब्द असले तर अगोदर **सप्तमी,** नंतर **प्रथमा,** नंतर **तृतीया,** नंतर **चतुर्थी,** नंतर **द्वितीया** अशा क्रमानें ते विभक्त्यंत शब्द घालावे.

उदा०—फार प्राचीन काळीं इंद्रप्रस्थ नगरात कर्ण नांवाचा राजा आपल्या हातानें गरीब लोकांना दान देता झाला.

विभक्तिप्रतिरूपक शब्दयोगी अव्ययांना हाच नियम लागू आहे. तीं तीं विभक्तिदर्शक अव्ययें वरील क्रमानेंच येतात.

दोन कर्मपदांपैकीं मुख्य कर्मपद हे क्रियापदाच्या जवळ येते. गौण कर्मपद हें मुख्य कर्मपदाच्या पूर्वी येतें किंवा संप्रदानार्थी चतुर्थ्यन्त पद कर्माच्या अगोदर येतें.

उदा०—त्यानें मला आंबा दिला. रामानें गणूस ही गोष्ट सांगितली.
बिरबल बादशहास गोष्ट सांगतो. श्रीकृष्णें सुदामजीला सोन्याची नगरी दिधली.

जो—तो, जरी—तरी, जेव्हां—तेव्हां, जेथें—तेथें, इत्यादि **संबंधदर्शक सर्वनामें** व **क्रियाविशेषण अव्ययें** त्या त्या वाक्याच्या आरंभीं येतात.

उदा०—जो तळें राखी, तो पाणी चाखी. जसा भाव, तसा देव.
जसें द्यावें, तसें घ्यावें. (जेथे) अती, तेथें माती.

**संबंधी सर्वनामापुढें** जर पुष्कळ नामें आलीं तर त्याच्या जवळच्या नामाप्रमाणें त्या सर्वनामाचें लिंगवचन होतें.

उदा०—हातांमध्यें **जो** ग्रंथ, पुस्तक, पोथी, चोपडी सांपडेल **ती** वाचावी.

**प्रश्नार्थक सर्वनामें, विशेषणें** व **क्रियाविशेषण अव्ययें** आपापल्या नेहमींच्या ठिकाणीं येतात. प्रश्नार्थक सर्वनाम हें कर्ता असेल तर **आरंभीं,** कर्म असेल तर **मध्यें, करण, संप्रदान** असेल तर त्या संबंधाप्रमाणें येईल. **प्रश्नार्थक विशेषणें** त्यांच्या विशेष्याच्या पूर्वीच येतात. **प्रश्नार्थक क्रिया-**

**विशेषण अव्ययें** वाक्याच्या आरंभीं किंवा क्रियापदाच्या लगत पूर्वी येतात. (वरील नियम पहा).

**शब्दयोगी** अव्यये विभक्तिप्रत्ययाप्रमाणें त्या त्या शब्दांच्या पुढें त्यांना जोडून येतात.

**उभयान्वयी** अव्यये ज्या दोन शब्दांस, वाक्यांशास किवा वाक्यांस जोडतात त्या दोहोंच्या मध्यें येतात.

उदा०—मधु आणि माधव गेले.
मधु हुशार आहे पण आळशी आहे.

**संबोधन** हे वाक्याच्या आरंभीं घालतात. कधीं कधीं वाक्याच्या शेवटींहि घालतात.

उ०—महाराज, माझी एक विनवणी ऐका. तेथें किती मोठा प्रसंग गुजरला ! काय सांगावे महाराज !

## कर्ता व क्रियापद

७९. वाक्यांतील मुख्य शब्द **कर्ता** आणि **क्रियापद** हे असल्यामुळें ते एकमेकांशीं **संबद्ध** असतात.

कर्तरिप्रयोगांत कर्त्याचें जे लिंगवचन तेंच क्रियापदाचें असतें. कर्तरिप्रयोगांत कर्ता हा प्रथमा विभक्तींत असतो.

घोडा धावतो, घोडी धावते, घोडें धावतें, घोडे धावतात इ.

वाक्यात मुख्य क्रियापद **असणें** किंवा **नसणें** हें असेल तर ते मुख्य कर्त्याप्रमाणें चालतें; विधेयांतील शब्दाप्रमाणे चालत नाहीं.

उदा०—अर्जुन हा बृहन्नडा झाला होता (झाली होती असा प्रयोग होत नाहीं.) तूं मुलगी झाला असतास तर एव्हांना तुझें लग्न होऊन दोन मुलेंहि झालीं असतीं.

जेव्हां दोन किंवा अधिक प्रथमान्त कर्ते '**आणि, व**' या समुच्चयवाचक उभयान्वयी अव्ययानें जोडलेले असतात, तेव्हां त्याचें क्रियापद अनेकवचनी असते.

उदा०—सिंहगडावर तानाजी व उदयभानु धारातीर्थी पडले.

एकाच लिंगाचे एकापेक्षां जास्त कर्ते असतील तर त्याच्यासाठीं येणाऱ्या क्रियापदाचें वचन अनेकवचन होईल आणि लिंग कर्त्यांच्या लिंगाप्रमाणें होईल.

उदा०—राम, लक्ष्मण, शत्रुघ्न हे भाऊ होते.
सीता, सावित्री व मंडोदरी ह्या मोठ्या पतिव्रता होत्या.

वाक्यांतील एकापेक्षां अधिक असलेले कर्ते भिन्न लिगाचे असतील तर त्यांचें क्रियापद नपुंसकलिंगी अनेकवचनी होतें.

उदा०—राम व सीता हीं अरण्यांत राहिलीं.
राम, सीता व हरीण हीं अरण्यांत राहिलीं.

सध्यांच्या मराठींत पुल्लिंगी व स्त्रीलिंगी कर्त्यांबद्दल पुल्लिगी क्रियापद वापरतात.

'राम व सीता हे दण्डकारण्यांत राहिले' असेंहि वाक्य शुद्ध आहे.

जेव्हां दोन किंवा अधिक कर्ते '**किंवा**' ह्या अव्ययानें जोडलेले असतात तेव्हां क्रियापद त्याच्या जवळच्या ( म्हणजे शेवटच्या ) कर्त्याप्रमाणें चालतें.

उदा०—तूं किंवा तुझीं मुलेंमाणसें जरी जेवण्यास आलीं तरी चालतील.
किंवा, तुझीं मुलेंमाणसे किंवा तूं स्वतः जरी आलास तरी चालेल.

निर्जीव पदार्थ दाखविणारे जर अनेक कर्ते असतील व जर ते '**आणि व**' ह्या अव्ययांनीं जोडिले असतील तर क्रियापद शेवटच्या कर्त्याप्रमाणें चालतें.

उदा०—शेतांत दाणागोटा व फळफळावळ होतें.

जेव्हां वाक्यांत निरनिराळ्या पुरुषाचे कर्ते असतात, त्यावेळेस प्रथमपुरुषी कर्ता मुख्य समजून त्याप्रमाणें क्रियापद चालवावें. प्रथमपुरुषी कर्ता नसेल तर द्वितीयपुरुषी कर्त्याप्रमाणें व द्वितीयपुरुषी नसेल तर मग तृतीयपुरुषी कर्त्याप्रमाणें क्रियापद चालवावें. वचन अर्थातच अनेकवचन होईल.

उदा०—मी व तूं गेलों. मी आणि माझा भाऊ फार सुखी आहों.
तो व तूं गेलांत. मी, तो व तूं असे जाऊं.
तो व ती गेलीं. ती व तूं हें काम करा. इ.

## कारक अर्थ

८०. वाक्यात विभक्तींचे प्रत्यय लावून बनलेलीं जीं पदें असतात त्यांचा क्रियापदाशीं जो संबंध असतो, त्या संबंधाला **कारक संबंध** अथवा **कारक अर्थ** म्हणतात. ज्या अर्थी हे संबंध विभक्तींच्या प्रत्ययांच्या योगानें दाखविले जातात त्या अर्थी त्यांना **विभक्तीचे कारक** असेंहि म्हणतात.

वाक्यात पदांचा ज्याप्रमाणें क्रियापदाशीं संबंध येतो, त्याप्रमाणें वाक्यांतील इतर पदांशींहि येतो. इतर पदांशीं आलेल्या ह्या संबंधांना **उपपदार्थ** असें म्हणतात.

प्रत्येक विभक्तीला **कारकार्थ** व **उपपदार्थ** असे दोन्ही अर्थ असतात.

खालीं क्रमानें विभक्ति देऊन त्यांच्यापुढे त्यांचे कारकार्थ व उपपदार्थ उदाहरणांसह दिले आहेत.

| विभक्ति | अर्थ | उदाहरण |
|---|---|---|
| **प्रथमा**— | १ **कर्ता** | —मुल शाळेत जातात. |
| | २ **उद्देश** | सावित्री ही मोठी साध्वी स्त्री होऊन गेली. |
| **द्वितीया**— | १ **कर्म** | —मुलें आंबे खातात. राम अहिल्येस ओळखतो. आईनें मुलास ओळखलें. |
| | २ **अधिकरण**— | |
| | **काळ** | —कौरवपांडवांचे युद्ध अठरा दिवस झाले. |
| | **स्थळ** | —प्रवासी सर्व हिंदुस्थान हिंडला. |
| | **अंतर** | —त्याची तासीं चाल तीन मैल होती. |
| | **परिमाण** | —रताळीं पैशा पासरी मिळतात. |
| **तृतीया**— | १ **कर्ता** | —नेपोलियननें युरोपचा बराच भाग पादाक्रांत केला. |
| | २ **करण** | —शिपायानें सुरीनें वार केला. |

३ **हेतु** — तो गोड शब्दानें आपलें काम साधतो.
४ **अंगविकार** — तो कानानें बहिरा, पायानें अधु आहे.
५ **रीति** — विद्यार्थी मोठ्यानें वाचतो.
६ **सान्निध्य** — त्याच्या घराशीं माझें घर आहे.
काळा रंग पांढऱ्याशीं जुळत नाहीं.
७ **अधिकरण** — राम बारा वर्षांनीं परत आला.

**चतुर्थी**—१ **संप्रदान** — कर्णानें भिकाऱ्यास दान दिलें.
२ **अपादान** — त्याच्या डोळ्यास गळती लागली आहे.
— तो नोकरीस मुकला.
३ **अधिकरण** — त्याच्या डोक्याला पगडी आहे. मी चाराला येईन. तो मुंबईस गेला. हाताला मळ लागला.

४ **इतर संबंध**
१ उद्देश — तो कर्तव्याला जागतो.
२ योग्यता— मुलगी लग्नाला योग्य झाली.
३ प्रमाण — पैशाला दोन तर चार पैशाला किती?
४ मर्यादा— दहाला दहा मिनिटे आहेत.
५ तुलना — सीतेला जसा राम तसा दमयंतीला नळ.

**पंचमी**—१ **अपादान** — मी गांवाहून आलों.
२ **करण** — त्याच्या हातून हें काम व्हावयाचें नाहीं.
३ **तुलना** — मऊ लोण्याहूनि आम्ही विष्णुदास.
४ **करण** — त्याच्या हातून हें होणार नाहीं.
५ **इतर**—
१ अंतर — पुण्याहून मुंबई ११२ मैल आहे.
२ भेद — माझ्याहून माझा भाऊ वेगळा.

**षष्ठी**—ह्या विभक्तीला कारकार्थ नसून उपपदार्थ आहे असें कांहीं व्याकरणकार म्हणतात.

**संबंधाचे प्रकार—**

| | | | |
|---|---|---|---|
| | १ **प्रयोजन, हेतु** | — | पिण्याचें भांडें, नेसण्याचें धोतर. |
| | २ **कार्यकारण** | — | चांदीचें भांडें, सोन्याचा दागिना. |
| | ३ **जन्यजनक** | — | माझा मुलगा, कालिदासाचा रघुवंश. |
| | ४ **धर्मधर्मी** | — | नीतीचा माणूस. |
| | ५ **साकल्य** | — | गांवचा गांव. |
| | ६ **अविकार** | — | जशाचा तसा, कोराचा कोरा. |
| **सप्तमी**— | १ **अधिकरण** | — | तो सायंकाळीं बागेंत फिरतो. |
| | २ **करण** | — | मला उदाहरण तोंडीं सांग. |
| | ३ **हेतु** | — | मी त्याच्यापायीं बुडालों. |
| | ४ **सर्वोत्तम** | — | माणसांत माणूस, लहानांत लहान. |

---

## प्रयोग

मराठीमध्यें निरनिराळ्या प्रकारचीं वाक्यें आहेत. कांहीं वाक्यांत कर्त्याप्रमाणें क्रियापद चालते. कांहीं वाक्यांत कर्माप्रमाणें क्रियापद चालतें. त्याच्या पुरुषलिंग-वचनाप्रमाणें क्रियापदाचें पुरुषलिंगवचन बदलते.

इतर काहीं वाक्यांत कर्ता व कर्म याप्रमाणें क्रियापद न चालतां तें नपुंसक-लिंगी एक वचनी राहतें. ह्याप्रमाणें वाक्यांतील कर्ता, कर्म व भाव ह्यांचा क्रियापदाशीं जो संबंध त्याला **प्रयोग** म्हणतात.

८२. **प्रकार**:—मराठींत मुख्य प्रयोग तीन आहेत. १ **कर्तरि**, २ **कर्मणि**, ३ **भावे. भावकर्तरि** म्हणून आणखी एक प्रकार कांहीं विशिष्ट क्रियापदाच्या बाबतींत मानतात.

### १. कर्तरि प्रयोग

कर्तरि प्रयोगांत जो शब्द कर्ता असतो त्याच्या रूपावर क्रियापदाचें रूप अवलंबून असतें. कर्तृपदाचे जें लिंग, वचन, पुरुष तेंच क्रियापदाचें असतें. क्रियापद कर्तृगामी असते.

उदा०—तो जातो; ती जाते; ते-त्या-तीं जातात.

पुरुष काम करतो. स्त्री काम करत्ये. पुरुष काम करतात.

कर्तरि प्रयोगाचे दोन प्रकार आहेत. ( अ ) **सकर्मक कर्तरि**, ( ब ) **अकर्मक कर्तरि.** क्रियापदाला कर्म असेल तर **सकर्मक** आणि कर्म नसेल तर **अकर्मक कर्तरि** समजावें.

उदा०—तो **जातो**. मी उठतों. वगैरे अकर्मक कर्तरि प्रयोग.

पुरुष **काम** करतो. मी पुस्तक वाचतों. वगैरे सकर्मक कर्तरि प्रयोग.

कर्तरि प्रयोगांत कर्ता प्रथमा विभक्तींत असतो हें उघड आहे. कर्म जर असेल तर, ते सप्रत्यय किंवा अप्रत्यय द्वितीयेत असतें.

उदा०—तो **पुस्तक** देतो. तो **बैल** धरतो, तो **बैलास** धरतो.

१. खालीं दिलेल्या ठिकाणीं कर्म सप्रत्यय द्वितीया विभक्तींत असतें.

( अ ) कर्म मनुष्यवाचक विशेषनाम अथवा सामान्य नाम असल्यास,

उदा०—मी **रामाला** बोलावितों. मी **काकाला** बोलावितों.

( ब ) विशेषनामाबद्दल सर्वनाम वापरलें असल्यास,

उदा०—रामा हा चांगला विद्यार्थी आहे; मी **त्याला** बोलावितों.

२. खालीं दिलेल्या ठिकाणीं कर्म अप्रत्यय द्वितीया विभक्तींत असतें.

( अ ) प्राणीवाचक नामाशिवाय इतर **नामें** किवा त्यांचीं **सर्वनामें**;

उदा०—तो काम करतो, परीट कपडे धुतात, ती भांडें घासते.

आंबे गोड आहेत. ते खावयास घे.

( ब ) **स्थान नामें.**

उदा०—शिवाजी सुरत लुटतो. महादजी दिल्ली काबीज करतो.

## २ कर्मणि प्रयोग

वाक्यामध्यें जेव्हां क्रियापदाचें रूप कर्माच्या रूपावर अवलंबून असतें, तेव्हां त्या वाक्यांत **कर्मणिप्रयोग** होतो. कर्माचें जें लिंग, वचन, पुरुष तेंच क्रियापदाचें असतें.

कर्मणि प्रयोगांत सामान्येंकरून कर्तृपद तृतीया विभक्तींत असतें. अकर्मक धातूंच्या बाबतींत कर्मणि प्रयोग कधीं होणें शक्य नाहीं हें उघड आहे.

उदा:—त्याने पुस्तक वाचलें. मजुरानें भित बांधिली.

क्रियापद जर विध्यर्थी अथवा शक्यार्थी असेल तर कर्ता चतुर्थी विभक्तींत असतो, किंवा त्याच्या षष्ठीच्या सामान्यरूपाला तृतीया विभक्तीचे प्रत्यय लावतात.

उदा०—विद्यार्थ्याला पुस्तक वाचवतें. विद्यार्थ्याच्याने पुस्तक वाचवतें.

कर्मणि प्रयोगांत जर एकापेक्षा अधिक कर्में असलीं तर क्रियापद शेवटच्या कर्मशब्दाप्रमाणें चालतें.

उदा०—राजाने त्याला ढाल, तरवार व **पोशाख दिला**.
त्याने बाजारांतून पेरु, केळीं व **भाजी आणिली**.

कधीं कधीं हीं सर्व कर्में उभयान्वयी अव्ययांनीं जोडून शेवटीं त्या सर्वांबद्दल दर्शक सर्वनाम वापरतात.

उदा०—संन्याशानें बायका, पोरें, आप्तजन, इष्टमित्र हीं सर्व सोडिलीं.

## ३ भावे प्रयोग

वाक्यामध्यें जेव्हां क्रियापदाचे रूप नेहमीं नपुंसकलिंगी तृतीयपुरुषी एकवचनी असते व कर्त्यावर किंवा कर्मावर अवलंबून असत नाहीं तेव्हां त्या वाक्यात **भावे प्रयोग** होतो.

ह्या प्रयोगांत कर्तृपद तृतीया किवा चतुर्थी विभक्तींत असतें. कर्मपद ( जेव्हां असतें तेव्हां ) सप्रत्यय द्वितीयेत असते, आणि क्रियापद तृतीयपुरुषी नपुसकलिंगी एकवचनी असते.

ह्या प्रयोगाचे ( १ ) **अकर्मक भावे** आणि (२) **सकर्मक भावे** असे दोन प्रकार आहेत. भावे प्रयोगात कर्तृपद कधीं तृतीयान्त तर कधीं चतुर्थ्यन्त असतें.

**अकर्मक भावे—**

उदा०—त्यानें जावें, म्यां बसावें.
त्याला गेलें पाहिजे. त्याला बसावें लागतें,

**२. सकर्मक भावे**—

उदा०—त्यानें मुलास मारिलें. शिक्षकानें विद्यार्थ्यांस शिकवावें.

## मराठींतील इतर कांहीं प्रयोग

१. **भावकर्तरि**:—ह्या प्रयोगांत क्रियापद कर्त्याप्रमाणें किंवा कर्माप्रमाण न चालतां क्रियेच्या भावाप्रमाणें चालतें. क्रियेचा जो भाव तोच कर्ता असतो म्हणून ह्या प्रयोगाला **भावकर्तरि प्रयोग** म्हणतात.

उदा०—मला कळमळतें. वाटसरूस गांवाजवळ सांजावलें.

भावकर्तरि हा प्रयोग स्वतंत्र मानण्याचें कारण नाहीं. हा भावेप्रयोगाचा एक प्रकार समजावा. "कळमळतें, सांजावलें, फावलें" ह्या क्रियापदांस वाक्यांमध्ये स्पष्ट अथवा अध्याहृत असा कर्ता नसतो व कर्महि नसतें. हीं क्रियापदें अकर्तृक व अकर्मक अशीं असतात. क्रियापदें तृतीयपुरुषी नपुंसकलिंगी एकवचनी असतात म्हणून ह्यांना भावेप्रयोग समजण्यात चूक नाहीं. कर्ता व कर्म नसल्यामुळे हा प्रयोग **अकर्मक अकर्तृक भावेप्रयोग** समजावा.

२. **कर्मकर्तृरि**:—ह्या प्रयोगांत क्रियेचें जे कर्म तेंच कर्तृपद असतें.

उदा०—शिपायाकडून **चोर** धरला जातो. रामाकडून **रावण** मारला गेला. मजकडून **अभ्यास** केला जाईल.

अर्थाच्या दृष्टीनें क्रियेचा जो कर्ता त्याच्यापुढें '**कडून**' हें अव्यय लावून मुख्य धातूच्या '**ला**' कृदन्तापुढें '**जा**' ह्या सहाय धातूचें रूप घातलें म्हणजे हा प्रयोग तयार होतो. ह्या प्रयोगालाच कांहीं व्याकरणकार '**नवीन कर्मणि**' प्रयोग म्हणतात.

३. **संकीर्ण प्रयोग**:—कांहीं वेळेस कर्तरि व कर्मणि ह्या दोन्ही प्रयोगाच्या किंवा कर्तरि आणि भावे, कर्मणि व भावे ह्या दोन्ही प्रयोगांच्या छटा एकाच प्रयोगांत दिसून येतात. अशा वेळीं ज्या दोन प्रयोगांच्या छटा त्या प्रयोगावर दिसून येतात त्यांचें मिळून नांव त्या प्रयोगास देणें सयुक्तिक होईल.

उदा०—तूं मला आंबा दिला किंवा दिलास.
तूं मला आंबे दिले किंवा दिलेस.

ह्या प्रयोगांत 'दिला' हें क्रियापद 'आबा' या कर्मपदाप्रमाणें चाललें; परंतु 'स' हा प्रत्यय कर्त्याच्या द्वितीय पुरुषाबद्दल लागला आहे. तेव्हां ह्या प्रयोगावर कर्तरि व कर्मणि अशा दोन्ही प्रयोगांची छटा पडल्यामुळें त्याला **कर्तृकर्मसंकर** असे म्हणावे.

तसेंच 'आईनें मुलीला निजविली; त्यानें भावास दुकानांत ठेविला;' ह्या वाक्यांत कर्तृपद तृतीयान्त असून क्रियापद कर्माप्रमाणें चाललें; परंतु कर्मपदास द्वितीयेचे प्रत्यय लागले आहेत. कर्मणि व भावे ह्या दोन्ही प्रयोगाचीं चिन्हें ह्या प्रयोगांत दिसतात, म्हणून हा प्रयोग **कर्मभावसंकर** आहे.

खालीं दिलेलीं वाक्यें एकाच अर्थाचीं परंतु भिन्न प्रयोगाचीं आहेत.

| | |
|---|---|
| १ राम रावण मारतो. | **सकर्मक कर्तरि प्रयोग** |
| रामानें रावण मारला,–मारावा. | **कर्मणि प्रयोग** |
| रामाकडून रावण मारला जातो. | **कर्मकर्तरि प्रयोग** |
| रामानें रावणास मारिलें. | **भावे प्रयोग** |
| २ मी आंघोळ केली. | **कर्तरि प्रयोग** |
| मीं आंघोळ केली. | **कर्मणि प्रयोग** |
| ३ तो जावा. | **अकर्मक कर्तरि प्रयोग** |
| त्यानें जावें. | **अकर्मक भावे प्रयोग** |
| ४ त्यानें हें काम केलें. | **कर्मणि प्रयोग** |
| त्याच्याकडून हें काम केलें गेलें. | **कर्मकर्तरि प्रयोग** |

## क्रियापदें–अभ्यास

१. क्रियापदें सिद्ध करण्याचे प्रत्यय सांगा. नाम, विशेषणें ह्यांपासून क्रियापदें सिद्ध करा.

२. क्रियापदांच्या साहाय्यानें वाक्यांतील शब्दांचे कोणकोणते संबंध दाखविले जातात ?

३. 'अस्' धातूचीं रूपें लिहा.

४. कर्मणि, कर्तरि ह्या वाक्यरचनेंतील भेद स्पष्ट करा.

५. कर्मणि प्रयोगानें लेखनरीतींत काय परिणाम होतो ?

६ सहाय क्रियापदें सांगून त्यांचें मुख्य क्रियापदाला साहाय्य कसकसें होतें तें सांगा.

७. अर्थ म्हणजे काय ? कोणाचा अर्थ ? संकेतार्थाची जरूरी आहे का ?

८. पुढील वाक्यांतील क्रियापदें कोणत्या अर्थी आहेत :–
फौज काटा; हाणा; मारा; ईश्वर तुमच्यावर दया करो; तुमचें कल्याण होवो; लवकरच तूं तयार व्हावेंस अशी मी इच्छा करतों.

९. खालील धातु भूतकाळीं चालवा :––कर, पड.

---

## वाक्य–पृथक्करण

८३. **वाक्य–पृथक्करण** म्हणजे वाक्य तोडून वाक्यांतील निरनिराळ्या शब्दांचा परस्परांशीं संबंध दाखविणें हें होय.

वाक्य तयार करतांना ज्याप्रमाणें प्रत्येक शब्दाचा वाक्यांतील संबंध पूर्णपणें माहीत असावा लागतो, त्याप्रमाणें वाक्य तोडतांनाहि प्रत्येक शब्दाचा संबंध माहीत असावा लागतो. वाक्यरचनेइतकेंच वाक्य-पृथक्करण हे महत्त्वाचें आहे.

८४. वाक्यामध्यें **दोन शब्द मुख्य** असतात. एक ज्याच्याविषयीं आपण बोलतों तो व दुसरा, जें कांहीं बोलतों तो. पहिल्यास **उद्देश्य** म्हणतात व दुसऱ्या शब्दास **विधेय** म्हणतात.

'मुलगा वाचतो' ह्या वाक्यांत 'मुला'विषयीं आपण बोलतों म्हणून तो शब्द उद्देश्य आहे, व मुलाविषयीं आपण वाचण्याची क्रिया सांगितली म्हणून 'वाचतो' हें विधेय आहे. 'मुलगा वाचतो' हें एक साधें शुद्ध किंवा केवल वाक्य आहे.

८५. उद्देश्य व विधेय हे वाक्यांतील दोन्ही शब्द आपणास त्यांच्यापूर्वी कांहीं अधिक शब्द घालून वाढवितां येतात.

१. 'काळा' मुलगा; 'हुशार' मुलगा; 'शहरांतील' मुलगा; 'हातांत पुस्तक घेतलेला' मुलगा; 'उभा राहणारा' मुलगा; 'काल जो शाळेंत आला तो' मुलगा; इतक्या रीतीनें 'मुलगा' हा शब्द आपणास वाढवितां आला. असे जे वाढ करण्याचे शब्द त्याना उद्देश्याचा विस्तार असें म्हणतात.

कर्त्याचीं सर्वप्रकारचीं विशेषणें हीं वाक्याचे पृथक्करण करतांना **उद्देश्यविस्तारा**च्या सदरांत घालावींत.

२. उद्देश्य जसे वाढवितां येतें तसें विधेयहि वाढवून त्याचा अर्थ पुरा करतां येतो. 'मुलगा वाचतो' ह्या वाक्यांतील विधेय पुढीलप्रमाणें वाढविता येईल. मुलगा 'पुस्तक' वाचतो. 'कवितेचें पुस्तक,' 'काल विकत घेतलेलें' 'काल जे विकत घेतले ते पुस्तक' अशा रीतीने विधेय वाढवून त्याचा अर्थ पुरा केला. ह्याला **विधेयपूरक** म्हणतात.

३. ह्या विधेयपूरकाप्रमाणे विधेयाचा विस्तारहि करता येतो. "मुलगा पुस्तक वाचतो" ह्या वाक्यांतील 'वाचतो' हें विधेय "मोठ्याने वाचतो,' 'फार मोठ्यानें वाचतो,' 'दुसऱ्यास ऐकूं जाईल इतक्या मोठ्यानें वाचतो' अशा रीतीनें विस्तारितां येईल.

१ मोठ्यानें, २ फार मोठ्यानें, ३ दुसऱ्यास ऐकूं जाईल इतक्या मोठ्यानें, हीं तिन्ही **विधेयविस्तार** होत.

८६. ह्यावरून ध्यानात येईल कीं,

(१) कर्म, कर्माचीं विशेषणें, विधिविशेषणें व क्रियापद हीं सर्व विधेय होत व तीं वाक्यपृथक्करण करतांना विधेयाच्या सदरांत घालतात.

(२) क्रियाविशेषणें हीं सर्व विधेयविस्तार होत व तीं विधेयविस्ताराच्या सदरांत येतात.

उद्देश्याविषयीं आपण जें कांहीं बोलतों तें **विधेय** होय. विधेयामध्यें मुख्य शब्द '**क्रियापद**' असतो. अर्थाच्या दृष्टीने क्रियापद कधीं अपूर्ण असते. "मुलगा बसतो" हें वाक्य अर्थाच्या दृष्टीनें पूर्ण आहे. परंतु "मुलगा करतो" हे वाक्य अर्थाच्या दृष्टीनें अपूर्ण आहे.

ह्या अपूर्ण वाक्याचा अर्थ पूर्ण करण्यासाठीं त्याला आणखी शब्द घालावे लागतात. "मुलगा काम करतो" हे वाक्य पूर्ण अर्थाचें आहे.

"सकर्मक क्रियापदें" अपूर्ण अर्थाचीं असतात. त्यांचा अर्थ पूर्ण करण्यासाठीं कर्माची जरूरी असते. कर्में दोन प्रकरचीं आहेत :—

**१ प्रत्यक्ष कर्म, २ अप्रत्यक्ष कर्म.** 'त्यानें मला पुस्तक दिलें' ह्या वाक्यांत 'पुस्तक' हे **प्रत्यक्ष कर्म** व 'मला' हें **अप्रत्यक्ष कर्म** होय. बहुतेक अकर्मक क्रियापदें पूर्ण अर्थाचीं असतात. त्यांना कर्माची जरूरी नसते.

परंतु कांहीं अकर्मक क्रियापदें अपूर्ण अर्थाचीं आहेत.

उदा०—'मुलगा आहे' ह्या वाक्याचा अर्थ पूर्णपणं समजत नाहीं. 'शहाणा', 'वयानें लहान', 'सर्वांस आवडणारा' असे कांहीं शब्द त्या वाक्यांत घातल्याखेरीज त्याचा अर्थ पुरा होत नाहीं.

विधेयाच्या सदरांत मूळ मुख्य क्रियापद, कर्म, कर्माचीं विशेषणें व विधेय-पूरक शब्द—विधिविशेषणें वगैरे हे येतात.

**८७.** वाक्याचे प्रकार तीन आहेत:—१ **साधें** किंवा **केवल वाक्य,** २ **मिश्र वाक्य,** ३ **संयुक्त वाक्य.**

१. ज्या वाक्यात एक उद्देश्य व एकच विधेय असते त्यास **साधें** किंवा **केवल वाक्य** म्हणतात.

उदा०—विद्यार्थी अभ्यास करतो. ईश्वर सर्वांचे रक्षण करतो. रामाने रावण मारला. आज पाऊस पडावा.

२. ज्या वाक्यांत एक मुख्य उद्देश्य व एकच मुख्य विधेय असून त्यावर अवलंबून असणारीं एक किंवा अधिक विधेयें असतात, त्या वाक्यास **मिश्र वाक्य** म्हणतात.

उदा०—१ जो विद्यार्थी गरीब आहे तो अभ्यास करतो.
२ ज्यानें सर्व सृष्टि उत्पन्न केली तो ईश्वर सर्वांचे रक्षण करतो.
३ पृथ्वीला जो भार झाला होता असा रावण रामाने मारला.

'तो अभ्यास करतो', 'ईश्वर सर्वांचे रक्षण करतो', 'रामाने रावण मारला' हीं मुख्य वाक्यें आहेत.

'जो गरीब आहे', 'ज्यानें सृष्टि उत्पन्न केली', 'जो पृथ्वीला भार झाला' हीं गौणवाक्यें आहेत.

**मिश्र वाक्यांत** एक मुख्य वाक्य आणि बाकीचीं इतर त्याच्यावर अवलंबून असणारीं गौणवाक्ये असतात.

३. ज्या वाक्यात एकापेक्षां अधिक मुख्य विधेयें असतात त्या वाक्यास **संयुक्त वाक्य** म्हणतात. संयुक्त वाक्यांत एकापेक्षां अधिक मुख्य वाक्यें व त्या प्रत्येकावर अवलंबून असणारीं गौणवाक्येंहि असूं शकतात.

उदा०—वारा आला आणि पाऊस गेला; चणे आहेत तेथें दांत नाहींत आणि दांत आहेत तेथें चणे नाहींत.

**केवल वाक्यांत** एक उद्देश्य व एक विधेय असते हे मागें सांगितलें. उद्देश्य हे नामच असल्यामुळें नामाप्रमाणें वापरलेले सर्व शब्द उद्देश्य होऊं शकतात हे उघड आहे. नाम, सर्वनाम, नामाप्रमाणें वापरलेलें विशेषण, वाक्यांग व वाक्य ह्यांपैकीं सर्व उद्देश्य म्हणून वापरतां येतील. उदा०—

१. **नाम**—घोडा धावतो.

२. **सर्वनाम**—तो धावतो.

३. **विशेषण**—गरीब भिक्षा मागणारच.

४. **वाक्यांग**—त्याचें उशीरां येणे मोठे त्रासदायक आहे.

५. **वाक्य**—अपकाराची फेड उपकाराने करावी हे त्याला पूर्ण पटलें होतें.

सकर्मक क्रियापदाच्या बाबतींत कर्माच्या ठिकाणीं वरील सर्व पांची बाबी वापरतां येतील हें उघड आहे.

मिश्र वाक्यात **मुख्य** व **गौण** अशीं दोन प्रकारचीं वाक्यें असतात. गौणवाक्याचे तीन प्रकार आहेत :—

१. **नाम वाक्य**—जें वाक्य कर्ता किंवा कर्म असते ( म्हणजे नामाप्रमाणे वापरले जाते ) त्यास **नाम वाक्य** म्हणतात.

उदा०—**कर्ता**—ईश्वर सर्वांना रक्षतो हें मत मला मान्य आहे.
**कर्म**— ईश्वर सर्वांना रक्षतो हे मीं कबूल केले.
कोणाला वाटलं असेल कीं हा पुढे राजा होईल ?

२. **विशेषण वाक्य**—ज्या वाक्याचा उपयोग नामाचा अर्थ मर्यादित करण्याकडे करतात तें **विशेषण वाक्य** होय.

उदा०—ज्याने सर्वांना उत्पन्न केले तो ईश्वर सर्वांचे रक्षण करतो.
असेंच काम करावें कीं जें सर्वांस पसंत पडावें.

३. **क्रियाविशेषण वाक्य**—ज्या वाक्याचा उपयोग क्रियापदाचा अर्थ मर्यादित करण्याकडे करतात ते वाक्य **क्रियाविशेषण** वाक्य होय.

उदा०—सेनापतीचें सैन्य जर ठराविक वेळेस आले असते तर नेपोलियनास जय मिळाला असता. जेव्हां राम वनवासास निघाला तेव्हां सीता व लक्ष्मण हेहि त्याच्या मागून निघाले,

**८८.** वाक्यपृथक्करण हें एका विशिष्ट तख्त्यांत करावयाचें असते. त्या तख्त्यात पुढीलप्रमाणें सदरें पडतात :--

१ **वाक्याचा क्रम.**

२ **वाक्य.**

३ **वाक्याचा प्रकार.**

४ **उद्देश्य-पोटसदरें**--१ कर्तृपद, २ त्याचा विस्तार.

५ **विधेय-पोटसदरें**--१ कर्मपद, २ कर्मविस्तार, ३ क्रियापद, ४ विधेयपूरकें.

६ **विधेय विस्तार** :—येथें क्रियाविशेषणें घालावींत.

७ **शेरा**--ह्यातच उभयान्वयी अव्ययें, संबोधनें, मुख्य वाक्याचा प्रकार व त्याचा इतर वाक्याशीं संबंध इत्यादींचा निर्देश करावा.

खालीं केवल वाक्यांचें पृथक्करण केलें आहे :—

१ हा हुशार मुलगा काल विकत घेतलेलें पुस्तक फार मोठ्यानें वाचतो.

२ या कामी आमच्याकडून तुम्हांस कोणत्याहि प्रकारचा अडथळा केला जाणार नाही.

३ त्या घोड्यास वठणीवर आणण्याकरतां जिवबादादानें त्याला खूप मारिलें.

| वाक्य-क्रम | वाक्य | जात | उद्देश्य | | विधेय | | | | विधेय-विस्तार |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | कर्ता | कर्त्याचा विस्तार | कर्म | कर्मविस्तार | क्रियापद | विधेयपूरक | |
| (१) | हुशार...... .......वाचतो. | केवल | मुलगा | हुशार हा. | पुस्तक | काल विकत घेतलेलें | वाचतो | — | फार मोठ्यानें |
| (२) | या कामीं... ......नाहीं. | केवल | अडथळा | कोणत्याहि प्रकारचा | तुम्हांस | — | केला जाणार नाहीं | — | या कामीं आमच्याकडून |
| (३) | त्या घोड्यास .......मारलें. | केवल | जिवबा-दादानें | — | त्याला | — | मारलें | — | त्या घोड्यास वठणीवर आणण्याकरतां खूप |

खालीं तीन मिश्र वाक्यांचें पृथक्करण केलें आहे :—

१ असा कोण मायेचा पूत आहे कीं तो अशा धूमधडाक्याच्या वेळीं आपली सर्व पूर्वकृति विसरून शत्रूच्या हवालीं करील.

२ आज जी संपत्ति त्याजपाशीं आहे ती त्यानें स्वतांच्या पराक्रमावर मिळविली.

३ विद्यार्जन करावें म्हणून तो परदेशास जाणार आहे.

| वाक्य-क्रम | वाक्य | जात प्रकार | उद्देश्य | | विधेय | | | | विधेय-विस्तार | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | कर्ता | कर्त्याचा विस्तार | कर्म | कर्म-विस्तार | क्रियापद | विधेय-पूरक | | |
| १ (अ) | असा...... आहे. | मुख्य | पूत | असा कोण मायेचा | — | — | आहे | वाक्य (ब) | — | वाक्य मिश्र — |
| (ब) | कीं तो... करील. | गौण नाम | तो | — | सर्व | — | हवालीं करील | — | आपली सर्व... कृति विसरून... अशा......वेळीं | हें वाक्य 'आहे' ह्याचें विधेय-पूरक आहे. |

| वाक्य-क्रम | वाक्य | जात प्रकार | उद्देश्य | | विधेय | | | | विधेय-विस्तार | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | कर्ता | कर्त्याचा विस्तार | कर्म | कर्म-विस्तार | क्रियापद | विधेय-पूरक | | |
| २ (अ) | ती…… मिळवली. | मुख्य | त्यानें | — | ती | वाक्य (ब) | मिळविली | — | स्वतांच्या पराक्रमावर | |
| (ब) | आज जी …आहे. | गौण विशेषण | संपत्ति | जी | — | — | आहे | — | त्याजपाशीं आज | ‘ ती ’ चें विशेषण वाक्य |
| ३ (अ) | तो…… जाणार आहे. | मुख्य | तो | — | — | — | जाणार आहे | — | परदेशास वाक्य (ब) | |
| (ब) | विद्यार्जन म्हणून | गौण क्रिया-विशेषण | (आपण) | — | विद्या-र्जन | — | करावें | — | म्हणून | हें क्रियाविशे-षण वाक्य विधेय विशेषण |

खालीं तीन संयुक्त वाक्यांचें पृथक्करण केलें आहे :—

१ तुम्ही स्वतां या अथवा तुमचा भाऊ आला तरी चालेल.

२ प्रत्येक ग्रंथाचा कांहीं विशिष्ट उद्देश असतो व तो सिद्ध झाला म्हणजे त्याची परिसमाप्ति होते.

३ विंचु इतरांना नांगी मारतो पण पालीपुढें तो नांगी टाकतो.

| वाक्य-क्रम | वाक्य | वाक्याची जाती | उद्देश | | विधेय | | | | विधेय-विस्तार | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | कर्तृपद | कर्त्याचा विस्तार | कर्म | कर्माचा विस्तार | क्रियापद | विधेय-पूरक | | |
| १ (अ) | तुम्ही... या | मुख्य | तुम्ही | स्वतां | — | — | या | — | — | |
| (ब) | अथवा.... आला | गौण नाम | भाऊ | तुमचा | — | — | आला | — | — | अथवा हें अव्यय |
| (क) | तरी चालेल | मुख्य | ( ते ) वाक्य (ब) | — | — | — | चालेल | — | तरी | |

| वाक्य-क्रम | वाक्य | वाक्याची जाती | उद्देश | | विधेय | | | | विधेय-विस्तार | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | कर्तृपद | कर्त्याचा विस्तार | कर्म | कर्माचा विस्तार | क्रियापद | विधेय-पूरक | | |
| २ (अ) | प्रत्येक ग्रंथाचा... असतो | मुख्य | उद्देश | प्रत्येक प्रथाचा कांहीं विशिष्ट | — | — | असतो | — | — | |
| (ब) | तो सिद्ध झाला | गौण क्रि. वि. | तो | — | — | — | सिद्ध झाला | — | — | |
| (क) | म्हणजे त्याची परिसमाप्ति होते. | मुख्य | परिसमाप्ति | त्याची | — | — | होते | — | वाक्य (ब) | म्हणजे—अव्यय |
| ३ (अ) | विंचु.... मारतो. | मुख्य | विंचु | — | इतरांना नांगी | — | मारतो | — | — | |
| (ब) | पण...... टाकतो. | मुख्य | तो | — | नांगी | — | टाकतो | — | पालीपुढें | पण—अव्यय |

# मराठी शब्दसिद्धि

**८९.** संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश इत्यादि प्राचीन आर्यभाषा ह्या मराठीच्या घटक होत. मराठी भाषेत शब्दांचा जो भरणा आहे तो ह्या भाषातून प्रत्यक्ष व त्यांच्या मार्फत आलेल्या शब्दांचा झाला आहे. त्यांतहि विशेष भरणा संस्कृत शब्दांचा आहे. संस्कृत भाषेंतील धातु घेऊन त्यांना मागे उपसर्ग किंवा पुढे प्रत्यय लावून तयार केलेले बरेच शब्द मराठींत सध्यां रूढ आहेत. त्यांपैकीं काहीं उघड उघड त्यांच्या मूळच्या संस्कृतस्वरूपांत आहेत व कांहीं अपभ्रष्ट स्वरूपात आहेत.

संस्कृत भाषेखेरीज देशी, कानडी, तेलगू, फारशी, इंग्रजी, पोर्तुगीज वगैरे अन्य भाषांतील शब्दहि मराठींत रूढ झाले आहेत. मराठी भाषेच्या जन्मापासून तों आजपर्यंत मराठी भाषा बोलणाऱ्या लोकाचा व ज्या ज्या इतर भाषेच्या लोकांशीं संबंध आला त्यांच्या भाषेंतील शब्द मराठी भाषेंत येऊन रूढ झाले आहेत. अशा रीतीनें मराठी भाषेंतील शब्दसमूह थोडाफार मिश्रस्वरूपाचा झाला आहे.

**९०.** शब्द दोन प्रकारचे असतात. एक **सिद्ध** आणि दुसरा **साधित.** सिद्ध शब्द ' हे दुसऱ्या कोणत्याहि शब्दापासून बनलेले नसतात. ते मूळचेच असतात. त्याच्या उलट साधित शब्द. भाषेतील एकंदर शब्दसमूहात सिद्ध किंवा मूळचे असे शब्द फार थोडे असतात व ते बरेचसे धातु असतात. सर्व भरणा साधित शब्दांचाच असतो. दोन किवा अधिक सिद्ध शब्द घेऊन जो शब्द तयार होतो त्यास **साधित शब्द** म्हणतात. किवा एक सिद्ध शब्द घेऊन त्याला उपसर्ग किवा प्रत्यय लावून जो शब्द तयार होतो त्यासहि **साधित शब्द** म्हणतात. पहिल्या प्रकारच्या साधित शब्दास **सामासिक शब्द** म्हणतात, व दुसऱ्या प्रकारच्या शब्दास **साधित शब्द** म्हणतात.

**९१.** साधित शब्दांत तीन प्रकार आहेत :—१ **प्राथमिक साधित,** २ **दुय्यम साधित,** ३ **द्विरुक्त.**

साधित शब्द साधण्याचे प्रकार पुढीलप्रमाणें आहेत :—

( १ ) धातूमधील स्वर अथवा व्यंजन ह्यात फरक करून **साधित शब्द** तयार करतात.

उदा०—**पडणें**—पाडणे; **फाटणें**—फाडणे.
**चरणें**—चारणें; **मरणें**—मारणे.
**सरणे**—सारणें.

( २ ) धातूमधील स्वर व व्यंजन ह्या दोहोंत फरक करून **साधित शब्द** तयार करतात.

उदा०—**सुटणें**—सोडणे; **तुटणे**—तोडणें.
**फुटणें**—फोडणे.

( ३ ) शब्दाच्या पूर्वी व पुढें अव्यये किंवा उपसर्ग व प्रत्यय लावून **साधित शब्द** तयार होतात.

उदा०—अभाव, निरुत्तर, अनिष्ट, आविर्भाव, कुकर्म, पराजय, कर्ता, कार्य, करणीय.

( ४ ) **शब्दाची द्विरुक्ति करून**—एका शब्दापुढें तोच शब्द पुनः ठेवून साधित शब्द तयार होतो. द्विरुक्ति निरनिराळ्या प्रकारानीं होते. घरघर, घरोघर, दारोदार, दाणेदुणे, दगडबिगड.

( ५ ) एका शब्दाच्यापुढें दुसरा निराळा शब्द ठेवून त्यांचा संयोग करून **साधित शब्द** तयार होतात. ह्या प्रकारास **समास** असें म्हणतात. घरदार, दगडमाती, दाणागल्ला, काळपुरुष, राजपुरुष, नीळकंठ, कमलमुख इत्यादि.

**९२. धातुसाधित शब्द** :–साधित शब्दांत धातूपासून साधलेल्या शब्दांचा भरणा विशेष असतो असें वर सांगितलें आहे. ह्या शब्दांस **धातुसाधित शब्द** म्हणतात. हे शब्द साधितांना धातूंना निरनिराळे प्रत्यय लागतात.

( अ ) **कृदन्त** : १ **कर्तृवाचक**—धातूनें दाखविलेल्या क्रियेचें कर्ते दाखविणारे शब्द.

**ता** ( ∠तृ ); **क** ( अक ); **अ ई** ( ∠इन ); **न** ( ∠अन ) हे प्रत्यय लावून तयार होतात.

( ह्या शब्दांचे संस्कृत मूळधातु कंसात दिले आहेत )

ता—दाता ( दा ); नेता ( नी ); श्रोता ( श्रु ); भर्ता ( भृ ); वक्ता ( वच् ); भोक्ता ( भुज् ); योद्धा ( युध् ); द्रष्टा ( दृश् ); द्वेष्टा ( द्विष् ); शास्ता ( शस् ); इत्यादि.

क—कारक ( कृ ); पाचक ( पच् ); घातक ( हन् ); नायक ( नी ); बाधक ( बाध् ); लेखक ( लिख् ); योजक ( युज् ); जनक ( जन् ); निंदक ( निंद् ); रक्षक ( रक्ष् ).

अ—चोर ( चुर् ); गंगाधर, वसुंधरा ( धृ ); विश्वंभर ( भृ ); भुजंग–गम ( गम् ); अनुचर ( चर् ); यशस्कर, भास्कर ( कृ ); धनंजय, शत्रुंजय ( जी ); ग्रंथकार, कुंभार, चाभार, सोनार, लोहार, ( कार—कृ ); प्रवाह, भारवाह ( वह् ); व्याध ( व्यध् ); भारहार ( हृ ).

इ—त्यागी ( त्यज् ); दोषी ( दुष् ); द्रोही ( द्रुह् ); अपराधी ( राध् ); अनुभवी ( भू ); उपकारी ( कृ ); वादी, प्रतिवादी ( वद् ); अनुयायी ( या ); क्षयी ( क्षी ).

न—नंदन ( नद् ); रमण ( रम् ); जनार्दन ( अर्द् ); मधुसूदन ( सूद् ); विचेक्षण ( चक्ष् ).

२. कर्तृवाचक शब्द तयार करणारे कांहीं प्रत्यय व त्यापासून बनलेले शब्द वर दिले. ह्याशिवाय आणखी कांहीं कर्तृवाचक प्रत्यय आहेत ते खालीं दिलेले आहेत. हे प्रत्यय सध्यांच्या मराठींत फारसे वापरांत नाहींत; बनलेले शब्द विशेषणात्मक आहेत.

**ष्णु** शील, स्वभाव असणारा; सहिष्णु, ( सहन करण्याचें शील असणारा ) वर्धिष्णु, जिष्णु, विष्णु.

| | | |
|---|---|---|
| **आलु** | °स तयार | दयालु, स्पृहयालु, शयालु. |
| **उर** | °णारा | भासुर, भंगुर, भेदुर, भिदुर. |
| **उक** | ,, | जागरुक, दंदशुक. |
| **वर** | जवळ बाळगणारा | भास्वर, स्थावर, ईश्वर, नश्वर. |

| | | |
|---|---|---|
| र | °णारा | नम्र, हिंस्र, अजस्र. |
| उ | इच्छा असणारा | भिक्षु, इच्छु. |
| उक | °णारा | भाऊक, घातुक, कामुक. |

(ब) धातुसाधित शब्दांचा दुसरा प्रकार **धातुसाधित विशेषणांचा** होय. हीं विशेषणें संस्कृतमधील विशेषणांचे प्रत्यय लागूनच बनलेलीं असतात. कधीं कधीं त्या प्रत्ययांत थोडाफार फरक केला जातो.

१. धातुसाधित विशेषणांत '**त**' प्रत्यय लावून बनलेलीं भूतकालवाचक धातुसाधित विशेषणें हीं विशेष महत्त्वाचीं आहेत. त्यांचा उपयोग पुष्कळ करावा लागतो.

उदा०—कृत (कृ + त); गत (गम्); भूत (भू); जात (जन); हत (हन्); नत (नम्); स्थित (स्था); आश्रित (श्री); हित (धा); श्रुत, च्युत, धृत, नीत.

काहीं धातूंस '**त**' ह्या प्रत्ययाऐवजीं '**इत**' हा प्रत्यय लागतो.

उदा०—रोदित, रुदित (रुद्).

ह्या '**त**' प्रत्ययाबद्दल संधीच्या नियमाप्रमाणे **न** (**ण**), **ट** (**ढ, ध**) असे आदेश योजून कांहीं धातूंचीं भूतकालवाचक धातुसाधितें साधतात.

उदा०—**न** किंवा **ण**,—क्षीण (क्षी); दीन (दी); लीन (ली); जीर्ण; (जॄ); कीर्ण, संकीर्ण (कॄ); विस्तीर्ण (स्तॄ); ऋण, ग्लान, म्लान.

**ट** किंवा **ढ** किंवा **ध**—कृष्ट, उत्कृष्ट, निकृष्ट, पुष्ट, तुष्ट, दुष्ट, गाढ, गूढ, मूढ, दग्ध, दिग्ध, मुग्ध, रूढ.

२. धातूंना '**वत्**' हा प्रत्यय लागून धातुसाधित विशेषणें तयार होतात. ह्याचें पुल्लिंगी स्वरूप '**वान्**', स्त्रीलिंगी स्वरूप '**वती**', नपूंसकलिंगी स्वरूप '**वत्**' अशीं होतात.

उदा०—विद्वान्, विदुषी, विद्वत्. धनवान् (पुरुष), धनवती (स्त्री), धनवत् (नगर) इत्यादि. लिंगाप्रमाणें प्रत्ययाचे स्वरूप पूर्वीच्या मराठी भाषेंत बदलत असते. परंतु सध्यांच्या मराठी भाषेंत तसें स्वरूप बदलत नाहींत. एकच पुल्लिंगी स्वरूप कायम ठेवितात.

उदा०—विद्वान् पुरुष किंवा विद्वान् स्त्री असें म्हणतात. धनवान् स्त्री, पुण्यवान् राणी, रूपवान् कुमारी, इत्यादि असे प्रयोग सध्यांच्या मराठींत करतात.

३. '**तव्य**' '**अनीय**' '**य**' हे प्रत्यय लागून विध्यर्थाचीं भविष्यकाळ दाखविणारीं विशेषणें तयार होतात. ह्या विशेषणांनीं ती क्रिया करण्याची शक्ति, योग्यता, आवश्यकता इत्यादि अर्थ दाखविले जातात.

उदा०—**तव्य**—कर्तव्य, भवितव्य, गन्तव्य, दातव्य, प्रष्टव्य, भोक्तव्य, वक्तव्य, हन्तव्य.

**अनीय**:—दर्शनीय, करणीय, वचनीय, हननीय, लेखनीय, वंदनीय.

**य**:—रम्य, नेय, कार्य, त्याज्य, भव्य, वध्य, वाच्य, भोज्य, भोग्य.

खालीं दिलेल्या धातुसाधितांचे अर्थ बदलले असले तरी व त्यांचा नामाप्रमाणें उपयोग केला तरी तीं मूळचीं धातुसाधित विशेषणेंच आहेत व त्यांना प्रत्यय '**य**' हाच लागला आहे.

उदा०—आचार्य ( शिक्षक ), आज्य ( तूप ), वैश्य, पूष्य, कार्य, गद्य, पद्य, भार्या, वाक्य, शिष्य, गुह्य, इत्यादि.

## मराठी कृदन्तें

**९३.** वर कृदन्ते जीं सांगितलीं तीं संस्कृतमधून सध्यांच्या मराठींत रूढ झालेलीं सांगितलीं. हीं सर्व तत्सम आहेत म्हणजे त्यांचें संस्कृतमधील रूपच मराठींत रूढ झालें आहे. आतां खालीं निव्वळ मराठी धातुसाधितें–धातूपासून बनलेलीं कृदन्तें देतों. ह्यांच्या मूळ संस्कृतरूपांत कांहींसा फरक झाल्यामुळें ह्यांना '**तद्भव**' म्हणतां येईल. हीं सर्व नामें आहेत.

प्रत्यय उदाहरणें

**अ**—कर, डर, आदळआपट, धांवपळ, उकड, जोड, जम, मोड, ओढ.
**( उपान्त्य इ, उ, दीर्घ )**—फूट, लूट, भूल, झीज, वीण, रीघ.
**( उपान्त्य इ उ–गुण ए ओ. )**—मेळ, फेर, खोट, जोड, झोक.

आ—वेढा, झगडा, घेरा, घसरा, उलगडा, निवाडा, घोंटाळा.
ठेवा, ठेचा, भरडा, कातरा.
झरा, ओढा, चोंदा, तोटा, झोका, डोला.
(उपान्त्य 'अ' वृद्धि)—पसारा, रगाडा, उकाडा, उमाळा, ओरखडा.

आई—(मजुरी)—घडाई, खोदाई, चराई, उजळाई, लिखाई, शिलाई, धुलाई.
चढाई, लढाई, कमाई, उतराई.

आट—कलकलाट, गडगडाट, चकचकाट, खडखडाट, गोंगाट.

आडा—(स्त्री–डी)—चुराडा, नासाडा, नासाडी.

आरी—पुजारी, आचारी, लोणारी, पिंजारी, रंगारी.

आव—चढाव, घिाव, पाडाव, जमाव, जडाव, उठाव, ठराव, बनाव, सराव.

आवा—वाढावा, आढावा, देखावा, मेळावा.

ई—१ उडी, चोरी, ओहटी, रडी, बोली, किंकाळी, उलटी, उचकी, उकळी.
२ थुंकी, हांतरी, वाटखर्ची, सांगी, कढी, चुणी.
३ थावी, कातरी, खुरपी, कढई.
४ गुराखी.

ऊ—१ मारू, लागू, चालू, झाडू, उतारू, भिडू, भोंदू, चाटू, खाऊ,
२ पोटभरू, मारखाऊ, पैसेखाऊ, माथेफिरू, खिसेकातरू.

ऊं—हसूं, रडूं, गळूं, बोलूं.

एं—हसे, रडे, खुरपें, वल्हे, कुडबुडे, पिटपिटें.

कटी—वळकटी.

ड—घसरड, निसरड, सुकड.

ण—पोषण, तारण, सारवण, भांडण, वळण, दळण, नेसण, चाटण, घुसळण, मिसळण, झाडण, धरण, कालवण, लागण, दडण, लवण.

णा—पाळणा, रमणा, अडाणा, जीवघेणा, भरणा, उगाणा (पापाचा).

**णावळ**—लिहिणावळ, खानावळ, दळणावळ.

**णी**—करणी, पाहणी, राहणी, वाटणी, कापणी, पेरणी, पुरवणी, ओंवाळणी, न्हाणी, चाळणी, लेखणी, अडणी, किसणी, वेळणी.

**णूक**—वर्तणूक, मिरवणूक, वागणूक, छळणूक, जाचणूक, नेमणूक, अडवणूक, करमणूक, निवडणूक, फसवणूक.

**णें**—१ बोलणें, लिहिणें, मिरवणें, खेळणें, लेणें.
२ लाटणें, कातणें, चोपणें, गाळणें, गाणें, उलथणें, बोलावणें.

**ती**—गणती, फिरती, झडती, खणती, गळती.

**ते**—गळतें, पडतें ( घेणें ), भरतें ( आलें ), दुभतें.

---

## तद्धितें

**९४.** ( १ ) क्रियापदांपासून तयार झालेलीं साधितें येथवर सांगितलीं. आतां नामांपासून तयार झालेलीं साधितें सांगतों. क्रियापदांपासून तयार झालेल्या साधितांना **कृदन्तें** म्हणतात त्याप्रमाणें ह्या नामसाधितांना **तद्धितें** म्हणतात. नामांशिवाय इतर शब्दांपासून तयार झालेलीं तद्धितेंहि आपण विचारांत घेणार आहोंत.

| प्रत्यय | उदाहरणें |
|---|---|
| **आ**— | ताठा, चिकटा, गारठा, सफेता, दुजोरा, जोडा, दाता, बाळा, विळा, भाकरा, चुला, डबा. |
| **आई** ( भाव ) | शीतळाई, धिटाई, भलाई, दांडगाई, बारकाई, शिष्टाई, चौथाई, सवाई. |
| **आईत** ( पूर्ण ) | बागाईत, जिराईत. |
| **आऊ** | कर्जाऊ, कुणबाऊ. |
| **आट, आड** | पेंचाट, भिंताड, रेंदाड, लाथाड, छाताड. |
| **आडी** | पानाडी, घिसाडी, सोंगाडी, वाटाड्या. |

आण ( स्थान )—मोंगलाण, हबसाण.

आर ( करणारा )—लोहार, कुंभार, सोनार, चांभार.

आरा ( मोठा )—पिसारा, पेटारा, भपकारा, डोलारा.

आळ—( युक्त ) दुधाळ, घायाळ, फेसाळ, खडकाळ, दगडाळ, केंसाळ, मिशाळ, तोंडाळ, वाचाळ, हाताळ, चुनाळ.

आळू—( सं ) दयाळू, मायाळू, कृपाळू, झोंपाळू.

आळें—( सं-आलय ) खगाळें, खुंटाळें, हिवाळें, कोंडाळें, गोताळें, लाथाळें, वेंटाळें, संताळें, उन्हाळें.

ई— ( वि ) लांकडी, पितळी, कोंकणी, केशरी, नाटकी, गुलाबी, ब्राह्मणी, ढोंगी, पोपटी.

( लहान ) बेडकी, आरशी, लोटी, खळगी, दोरी, घरटी.

( भाववाचक ) श्रीमंती, गरीबी, लांबी, रुंदी, सरशी.

ईण—( स्त्री ) कुंभारीण, सवाशीण, बाळंतीण, माहेरवाशीण.

इष्ट—चविष्ट, नादिष्ट, पापिष्ट, नेमिष्ट, कोपिष्ट.

एल—( तेल ) तिळेल, एरंडेल, उदेल, खोबरेल.

ओळें—भेंडोळें, थारोळें, पिंडोळें,

क—धडक, थडक, जाचक, ढाळक, इत्यादिक, अस्मादिक.

कर—खोडकर, खेळकर, कामकर, ( आडनावांत कर येतो—पाटणकर, नागपूरकर, सातारकर इ. )

करी—भाडेकरी, घेणेकरी, रिणकरी, गांवकरी, वारकरी.

की—गांवकी, माणुसकी, शेतकी, म्हारकी, मास्तरकी, शिन्नळकी, कुचाळकी, लबाडकी, शाबासकी, चांदकी, मेढकी.

खोर—भांडखोर, शंकेखोर, चुगलखोर, दिवाळखोर, थट्टेखोर.

गी—पोटगी, देणगी, परवानगी, रवानगी, खासगी.

ट—मातट, तिखट, रोगट, दणकट, वातट.

प—कांडप, दळप, वाढप, वांटप.

**पट्टी**—खरडपट्टी, तासटपट्टी, उधळपट्टी.

**या**—बश्या, रड्या, उचल्या, ओरड्या, उधळ्या, आगलाव्या.

**रा**—नाचरा, बुजरा, कापरा, लाजरा, दुखरा, साजरा.

**लें, लेलें**—पिकले-लेले, पडले-लेलें व इतर पूर्णक्रियाद्योतक विशेषण.

**ला**—खोकला, दाखला, खवला.

**वट, वटा, वटी**—भोगवट-वटा, फुगवटी.

**वड**—लागवड.

**वण**—हगवण, आंबवण, भिजवण, भरवण.

( २ ) अल्पत्वदर्शक, तुच्छतादर्शक, निंदाव्यंजक प्रत्यय खालीलप्रमाणें आहेत.

**ऊक**—काटुक, किडुक, चिंधूक, हाडूक.

**ऊरगा-ऊरडा**—भटुरगा, भटुरडा.

**ऊल**—कणगूल, करंडूल.

**ओटी**—लंगोटी, रेघोटी, चिंधोटी.

**ओळी**—मासोळी, चिरटोळी.

**इ**—चादकी, भाकरी, ओंडकी.

**कें**—बिंदुकें, पुडके, नाळकें, होडकें, ढोलकें.

**टी**—शेकटी, शेंपटी, थापटी.

**टा**—रोपटा, पोरटा, दुकटा.

**ट**—खोपट, पिसाट.

**डा**—कोनाडा, बापुडा, गधडा.

**डी**—पोतडी, चामडी, सालडी, पानडी, पलंगडी, टेकडी, चिंधडी.

**डें**—अंगडें, कुंचडें, टोपडे, रुपडें.

**रूं**—मेंढरूं, शिंगरूं, म्हसरूं, रांडरूं, लेकरूं, वासरूं, वाघरूं.

**ली**—टिकली, ताटली, दिवली, शिंपली, सुपली, जिभली.

लें—बोंडलें, खाटलें, बाजलें, तांबलें, पिठले.

ळी—मासळी, फांसळी, गुठळी, पाकळी, गठळी, वेंटाळी.

( ३ ) स्वार्थे प्रत्यय लागून तयार झालेलीं तद्धितें खालीं दिलीं आहेत. प्रत्यय स्वार्थे लागतो तेव्हां मूळ शब्दाच्या अर्थांत त्या प्रत्ययामुळें कांहीं बदल होत नाहीं. स्वार्थे प्रत्ययाचा विशेष हाच होय.

ऊं—रेडकूं, मांजरूं, बकरूं, शेरडूं, किरडूं.

क—इत्यादिक, अस्मादिक, कांहींक.

का—थेंबका, चुळका, मणका, पुंजका, मुळका, डेरका, धिंडका, मेढका, ओंडका, घोळका.

डी—पंचक—पंचकडी, दसका—कडी, छकडी.

ता—जोगता, भलता, परता, दुणता.

पें—जोडपें.

पा—टोणपा, वेडपा.

ला—शिपला, खवला, चांदला, टिकला, धुरळा.

स—टिपूस, तडस, आईस, बापूस.

ळा—मथळा, अंधळा, पांगळा, धुरळा.

( ४ ) खालीं दिलेले प्रत्यय लागून विशेषणें सिद्ध होतात.

आ—वेडा, खुळा, शेंबडा, कापशा, सस्ता, लहाना.

आऊ—कर्जाऊ, घराऊ, कुणबाऊ, पोहणाऊ.

आड—मोठाड, ओसाड, रेंदाड, रेताड, लाथाड.

आडा—लंबाडा.

आर—गर्भार, भिकार, फुलार.

ई—मापी. सुती, वजनी, पितळी.

ईल—अंडील, दोंदील, शेवटील, वरकशील, इकडील, मागील, आंतील, खालील, पुढील.

ऊ—विश्वासु, ढब्बू, चिक्कू, धरू.

**ऊस**—आंबूस, तांबूस.

**ऊळ**—पांगूळ, पिठूळ, वातूळ.

**एला**—उंचेला, काळेला, जाडगेला, गोरटेला.

**कट**—धुरकट, भुसकट, तेलकट, मेणकट, वळकट, मळकट, पोरकट.

**कर**—खोडकर, साळकर, खेळकर, पाटणकर, दाभोळकर, पुणेकर, मुंबईकर, इत्यादि.

**करी**—देणेकरी, रीणकरी, कामकरी, गांवकरी.

**कुला**—चिमुकला, सोनुकला.

**चा**—एकदांचा, केव्हांचा, आजचा, कालचा, आतांचा, इकडचा, तिकडचा, अलीकडचा, वरचा, मागचा, खालचा, मधचा.

**ट**—चरबट, मातट, आंबट, तिखट, खारट, रोगट, वांझट, वातट, दणकट, पोंचट, घामट, उबट, तेलट, तुपट, पानचट, लांबट, रुंदट, उंचट, उभट, मळकट, हिरवट.

**डा**—वावडा, कोरडा, नागडा, खरुजडा.

**री**—पुणेरी, सोनेरी, रुपेरी.

**ला**—मागला, पुढला, आंतला, बाहेरला, मधला.

**वा**—बरवा, आडवा, कडवा, नागवा.

**सा**—भलतासा, इवलासा, थोडासा, मोठासा, फारसा, लहानसा.

( ५ ) मराठी प्रत्यय लागून सिद्ध झालेलीं तद्धितें वर दिलीं. खालीं इतर भाषांतून आलेलीं तद्धितें त्यांच्या प्रत्ययांसह दिलीं आहेत:—

नामें बनविण्याचे मुख्य प्रत्यय गर, गार, दान, ई, गिरी हे होत.

**गर**—सौदागर, जिनगर, पटवेकर.

**गार**—गुन्हेगार, खिदमदगार, रोजगार, कामगार, शिकलगार.

**दान**—कमलदान, शामदान, गुजदान—तावदान, पानदान, बारदान.

**ई**—खुबी, दुरुस्ती, नेकी, खुशी, पादशाही, फकिरी, दोस्ती, सराफी, रवानगी, बंदगी, गरमी.

**ईचा**--बगीचा.

**गिरी**--गुलामगिरी, लुच्चेगिरी, भामटेगिरी.

**शाई**--निजामशाई, बेबदशाई, शिवशाई.

**मंद**--अक्कलमद, दौलतमंद.

**वार**--तपशीलवार, सादीलवार, इसमवार, सालवार, विल्हेवार, बेतवार.

**आ**--बराबर, सरासर, गरमागरम.

**गीर**--आबदागीर, जहागीर, आलमगीर.

**खोर**--हरामखोर, भांडखोर, चहाडखोर.

**दार**--भालदार, चोपदार, पोतदार, फौजदार, दुकानदार, कमानदार, सुभेदार, छानदार, अर्जदार, मोजणीदार, जबाबदार.

**निवीस-नीस**--चिटणवीस, पोतनीस, खासनीस, फडणीस, वाकनीस, मदतनीस.

**बंद**--नालबंद, पगडबंद, कमरबंद, हत्यारबंद.

**बाज**--दारूबाज, अफूबाज, कावेबाज, ऐटबाज, अक्कडबाज, दगलबाज, थट्टेबाज.

**खाना**--कारखाना, तोफखाना, हत्तीखाना, उष्ट्रखाना, दवाखाना.

**ई**--( अरबी ) हलवाई, मिठाई, मुजराई.

**ची, जी**--मशालजी, पखालजी, बबरजी, तोफची.

## उपसर्ग

९५. ( १ ) मराठीमध्ये नेहमीं जे उपसर्ग वापरण्यांत येतात ते खालीं दिले आहेत.

| उपसर्ग | त्याचा अर्थ | त्याचीं उदाहरणें |
|---|---|---|
| **अति** | अधिक, पलीकडे | अतिस्नेह, अतिशय. |
| **अधि** | अधिक, जास्त | अधिदैवत, अधिपति. |
| **अनु** | नंतर, मागें | अनुकरण, अनुरूप, अनुज. |
| **अप** | उलट, खालीं, वाईट | अपकार, अपमृत्यु, अपकर्ष. |

| उपसर्ग | त्याचा अर्थ | त्याचीं उदाहरणें |
|---|---|---|
| **अभि** | सर्वत्र, चोहोंकडे | अभिज्ञ, अभ्यास. |
| **अव** | अभाव, पासून | अवकृपा, अवमान, अवलक्षण, अवतार. |
| **आ** | पासून, पर्यंत | आजन्म. |
| | किंचित | आकंपित. |
| | उलट | दान–आदान. |
| **उत्** | वर | उत्तेजन, उत्कर्ष. |
| **उप** | जवळ | उपांग, उपनेत्र, उपकार. |
| **दुर्, दुस्** | वाईट, कठीण | दुर्गुण, दुराचार, दुर्गम, दुराराध्य. |
| **नि** | आंत, वर, मध्यें | निधान, निमग्न, निबंध. |
| **निर्, निस्** | बाहेर, शिवाय | निर्गुण, निराकार, निर्गम. निष्कारण. |
| **परा** | मागें, श्रेष्ठ | परावर्तन, पराकाष्ठा, पराक्रम. |
| **परि** | भोंवतीं | पर्यटन, परिणाम. |
| **प्र** | पुढें, बाहेर, अधिक | प्रताप, प्रदेश, प्रपिता. |
| **प्रति** | उलट, बदल, पुनः | प्रतिबिंब, प्रत्युपकार, प्रतिशब्द. |
| **वि** | निराळा, अलग, अभाव | वियोग. |
| | विशेष | विख्यात, विनाश. |
| **सम्** | बरोबर, सह | संभव, संगति, संस्कार. |
| **सु** | चांगलें, फार | सुदिन, सुकाळ. |

हे सर्व संस्कृतभाषेंतील उपसर्ग झाले. संस्कृत उपसर्गाशिवाय निव्वळ मराठी व फारशी ह्या भाषांतील उपसर्ग लावून शब्द तयार होतात. ह्यांपैकीं कांहीं उपसर्ग आहेत व कांहीं स्वतंत्र शब्दाचे अवशेष आहेत.

( २ ) मराठी उपसर्ग पूर्वी लागून तयार झालेले शब्द.

| उपसर्ग | त्याचा अर्थ | त्याचीं उदाहरणे |
|---|---|---|
| **अ—( अन )** | नसणें अभाव | अजाण, अडाणी, असडीक, अनोळखी, अनशेपोटीं, अबोला. |

| उपसर्ग | त्याचा अर्थ | त्याचीं उदाहरणें |
|---|---|---|
| **आड** | लहान, गौण | आडमुठा, आडनांव, आडकाम, आडसर, आडवस्ती. |
| **अद** ( अर्ध ) | निमा | अदपाव, अदशेर, अदकोस. |
| **अव** | हीन, कमी | अवजड, अवकळा, अवघड, अवताण. |
| **दु** | दुष्ट, वाईट | दुष्ट, दुकाळ. |
| **नि** | शिवाय, रहित, अधिक | निकामी, निजोरी, निधड्या, निलाजर, निनावी, निपणजा. |
| **निर** | ,, | निर्धास्त, निर्धोक, निष्काळजी. |
| **पड** | गौण, कमी | पडजीभ, पडछाया, पडचाकर. |

( ३ ) फारशी व अरबी उपसर्गांनें बनलेले शब्द.

| | | |
|---|---|---|
| **ऐन** | मुख्य, पूर्ण | ऐन जिन्नस, ऐन दौलत, ऐन जमा, ऐन वसूल, ऐन उन्हाळा, ऐन दोनप्रहर, ऐन रंग. |
| **कम** | कमी, अपुरा | कमजोर, कमकुवत, कमनशीब, कमजात. |
| **गैर** | वाचून, विना | गैरहजर, गैरवाजवी, गैरशिस्त, गैरमर्जी, गैरकायदा, गैरसावध, गैरसोय. |
| **दर** | प्रत्येक | दररोज,दरमहा,दरशेंकडा,दरसाल. |
| **ना** | अभाव | नाउमेद, नापसंत, नादार, नादान, नालायक, नाराज, नाकबूल. |
| **बद** | वाईट | बदमाष,बदकर्म,बदनाम,बदसल्ला. |
| **ब** | प्रमाणें | बजिन्नस, बशर्तं. |
| **बिन** | वांचून | बिनदिक्कत, बिनधोक, बिनतोड. बिनचूक, बिनपोटी, बिनभाड्याचें घर. |

| उपसर्ग | त्याचा अर्थ | त्याचीं उदाहरणें |
|---|---|---|
| **बे** | वांचून | बेअब्रू, बेइमान, बेजबाब, बेदम, बेशक, बेसुमार, बेकायदा, बेमुरवत, बेचिराख. |
| **सर** | मुख्य | सरहद्द, सरनौबत, सरसेनापति, सरपंच, सरदार. |

ह्या फारशी पूर्वशब्दासारखाच एक **'सब'** हा इंग्रजी शब्द उपसर्गाप्रमाणें वापरून तयार झालेले इंग्रजी शब्द मराठींत रूढ आहेत.

उदा०—**'सब'** हाताखालचा, सबइन्स्पेक्टर, सबओव्हरसीयर, सबपोस्ट ऑफीस.

(४) शब्दांच्या पूर्वी उपसर्ग लागून तयार झालेल्या शब्दाचीं उदाहरणें वर दिलीं. उपसर्ग हे एकेकाळीं स्वतंत्र शब्दच होते. त्या स्वतत्र शब्दांचे अवशेष सध्यां उपसर्गांच्या रूपानें आपणास दिसतात. ही क्रिया पुष्कळ काळानें होते. ज्या शब्दाचें स्वतंत्रत्व थोडेंफार शिल्लक राहिलें आहे किंवा ज्यांना अद्यापपावेतों उपसर्गत्व प्राप्त झालें नाहीं असे शब्द जोडून साधितशब्द तयार होतात. त्यांचीं उदाहरणे खालीं दिलीं आहेत :—

| शब्द | अर्थ | उदाहरण |
|---|---|---|
| **अधः** | खालीं | अधःपात, अधोगती, अधोमुख. |
| **अन्तर्** | आंत | अन्तःकरण, अन्तर्धान, अन्तर्याम, अन्तर्मुख, अन्तर्भाव. |
| **अमा** | जवळ | अमावास्या. |
| **अलम्** | पूर्ण, सुंदर | अलंकार, अलंकृति. |
| **आविर्** | बाहेर, उघड | आविर्भाव, आविष्करण. |
| **इति** | असें | इत्यर्थ, इतिहास, इतिवृत्त. |
| **कु** | वाईट | कुकर्म, कुवासना, कुरूप, कुचेष्टा, कुपथ्य, कुबुद्धि, कुचाळ. |

| शब्द | अर्थ | उदाहरण |
|---|---|---|
| **चिर** | फार | चिरकाल, चिरंजीव. |
| **धिक्** | वाईट | धिक्कार, धिग्जिणें. |
| **नाना** | पुष्कळ | नानारूप, नानाप्रकार, नानाविध. |
| **पश्चात्** | मागें | पश्चात्ताप्, पश्चाद्बुद्धि. |
| **पुनर्** | पुन्हां | पुनर्जन्म, पुनर्विवाह. |
| **प्रातः** | सकाळ | प्रातःकाळ. |
| **बहिर्** | बाहेर | बहिष्कार. |
| **स** | सहित | सजीव, सफळ, सजातीय, सशास्त्र, सगोत्र, सजोड, सढळ, सलग. |
| **सह** | बरोबर | सहज, सहवास, सहकुटुंब, सहपरिवार. |
| **स्व** | आपला | स्वदेश, स्वधर्म, स्वभाषा. |
| **स्वयम्** | स्वतः | स्वयंभू, स्वयपाक, स्वयंसेवक. |

## द्विरुक्तीनें झालेले शब्द

९६. शब्दसिद्धीच्या प्रकरणात आणखी एका प्रकारच्या साधित शब्दांचा उल्लेख केला पाहिजे. हा प्रकार पुनरुक्त किंवा द्विरुक्त शब्दाचा होय.

एकच शब्द पुनः उच्चारला गेला म्हणजे त्याला **द्विरुक्त** शब्द म्हणतात.

उदा०—दारदार, कवडीकवडी, गांवगांव, देशदेश इत्यादि.

हे पुनरुक्त शब्द कधीं अर्धेच तर कधीं सबंध पुनः उच्चारिले जातात.

**अर्धे द्विरुक्त** :—जाडजूड, खराखुरा, उदारपाधार, शेजारीपाजारी, भिकारीटाकारी, ओळखपाळख.

ह्या द्विरुक्त शब्दांत सर्व प्रकारचे शब्द—नामे, विशेषणें, धातु, अव्ययें—हे येतात.

शब्दाची अशा रीतीनें द्विरुक्ति जी करतात ती कोणत्यातरी उद्देशानें होते.

१. कधीं निरनिराळेपणा ( पृथक्त्व ) दाखविण्याकरतां करतात. उदा०—घरघर ( प्रत्येक घरीं ); कवडीकवडी, गांवगांव, झाडझाड, तुकडेतुकडे.

२. अर्थाचें अतिशयत्व दाखवितात. उदा०—हालहाल (फार हाल), घामाघाम किंवा घामाघूम (फार घाम).

३. कधीं परस्पर सबंधहि द्विरुक्तीनें दाखवितात. उदा०—बहीणबहीण, बायकाबायका, सवतीसवती.

४. कधीं अनुक्रम दाखविला जातो. उदा०—पानपान, प्रकरणप्रकरण इ०

५. कधीं अनुकरणवाचक म्हणून द्विरुक्ति करतात. उदा०—किरकिर, कळकळ, चुटचुट, चुणचुण, खटपट, तगमग, पिरपिर, बडबड, हळहळ, हुरहुर, पिळपिळीत, फुसफुशीत, भुसभुशीत, लुटलुटीत, कडकडणें, खरखरणें, गडगडणें. गयावया, घणघणघंटा, अळंटाळ, टंगळमगळ.

शब्दांची द्विरुक्ति करतांना कांहीं वेळेस दुसरे शब्दहि घालतात. उदा०—दगडगिगड, दगडबिगड, आंबटबिंबट, काळाबिळा, कड्डबिड्ड, किडुकमिडुक, चट्टामट्टा, टकमक, शेजारीपाजारी, खराखुरा, खराबिरा, भिकारीबिकारी, भिकारीटाकारी. ह्यानाच **अर्ध द्विरुक्त शब्द** असें म्हणतात.



## समास

**९७. व्याख्या:**—दोन किंवा अधिक शब्दांच्या मधील एकमेकांचा संबंध दाखविणारे शब्द अथवा प्रत्यय यांचा लोप करून जो एक त्यांचा गट करतात त्यास **समास** असें म्हणतात.

"राम आणि लक्ष्मण" ह्या दोन शब्दांमधील 'आणि' ह्या शब्दाचा लोप करून 'रामलक्ष्मण' असा शब्द होतो.

'सूर्याचा प्रकाश' ह्या शब्दांमधील 'चा' ह्या प्रत्ययाचा लोप करून सूर्यप्रकाश' असा शब्द होतो.

'कमलासारखे नेत्र' ह्यामधील 'सारखे' ह्या शब्दाचा लोप करून कमलनेत्र असा शब्द होतो.

'दश आहेत मुखें ज्याचीं' ह्या शब्दांमधील 'आहेत' व 'ज्याचीं' ह्या शब्दांचा लोप करून 'दशमुख' असा शब्द तयार केला. रामलक्ष्मण, सूर्यप्रकाश, कमलनेत्र, दशमुख इत्यादि जे शब्दांचे गट अथवा समूह तयार झाले ते **समास** होत. अशा एकत्रित शब्दांचें किंवा समासाचें अर्थाच्या दृष्टीनें एकीकरण झालेलें असतें.

**समास**—(सम्+आस्) या संस्कृत शब्दाचा अर्थ एकत्र जवळजवळ ठेवणें किंवा असणें असा आहे.

सामासिक शब्दाचा अर्थ उघड करून दाखविण्याच्या कृतीस त्या सामासिक शब्दाचा '**विग्रह**' असें म्हणतात.

'राम आणि लक्ष्मण, सूर्याचा प्रकाश, कमलासारखें नेत्र, दश आहेत मुखें ज्याचीं' वगैरे अनुक्रमें रामलक्ष्मण, सूर्यप्रकाश, कमलनेत्र, दशमुख वगैरे समासांचे अर्थ स्पष्ट करून उलगडून दाखवितात म्हणून ते त्यांचे '**विग्रह**' होत.

## समासाचे प्रकार

**९८.** समासामध्यें जे दोन किंवा अधिक शब्द येतात त्यांपैकीं प्रधान म्हणजे मुख्य शब्द कोणता व गौण म्हणजे दुय्यम कोणता ह्यावरून समासाचे चार प्रकार होतात.

समासांतील ज्या शब्दाचा वाक्यांत संबंध येतो त्या शब्दास **प्रधान** शब्द म्हणतात. आणि ज्या शब्दाचा समासांतील इतर शब्दांशीं संबंध येतो त्याला **गौण** शब्द म्हणतात. समासाचे चार प्रकार पुढीलप्रमाणे होतात:—

१. समासांतील दोन्ही (किंवा सर्व) शब्द महत्त्वाचे असतील तर **द्वंद्व समास** होतो.

'रामलक्ष्मण' ह्या समासांतील राम आणि लक्ष्मण हे दोन्ही शब्द मुख्य आहेत. तसेच रामकृष्णवासुदेव इत्यादि.

२. समासांतील दोन्ही शब्दांपैकीं पहिला गौण असून दुसरा प्रधान असला तर तो समास **तत्पुरुष** होतो.

सूर्यप्रकाश ह्यांत प्रकाश हा शब्द मुख्य आहे व सूर्य हा शब्द गौण आहे.

३. समासांतील दोन्ही शब्द ज्या वेळेस गौण असून त्या दोहोंच्या अर्थावरून तिसराच पदार्थ मुख्य असतो त्यास **बहुव्रीहि** समास म्हणतात. ‘दशमुख’ ह्यांतील दश किंवा मुख ह्यापैकीं कोणताहि शब्द मुख्य नसून ‘दहा तोंडें आहेत ज्याला’ असा ‘**रावण**’ हा शब्द मुख्य आहे.

४. ज्या समासांतील शब्दापैकीं पहिला शब्द मुख्य असतो व सर्व समास क्रियाविशेषण असतो त्या समासास ‘**अव्ययीभाव**’ समास असें म्हणतात.

ह्यावरून हे जे चार प्रकार सांगितले त्यांना अनुक्रमें **सर्वपदप्रधान, द्वितीय पदप्रधान, अन्यपदप्रधान, प्रथमपदप्रधान** अशीं नांवे आहेत.

## द्वंद्व समास

९९. द्वंद्व समासाचे तीन प्रकार आहेत:—१ **समुच्चय द्वंद्व**, २ **वैकल्पिक द्वंद्व**, ३ **समाहार द्वंद्व.**

(१) **समुच्चय द्वंद्व**:—ज्या समासांत सर्व पदांचा समुच्चय (बेरीज, एकत्रितपणा) केला जातो व क्रियापद सर्व पदांच्या समुच्चयाप्रमाणें चालतें त्या द्वंद्व समासास **समुच्चय द्वंद्व** समास म्हणतात.

उदा०—रामकृष्ण, कृष्णार्जुन, लढाई करतात.

ह्या समासाचा दुसरा एक प्रकार आहे त्याला **इतरेतर द्वंद्व** म्हणतात. ज्यावेळेस क्रियापद समासांतील शेवटच्या पदाप्रमाणें चालतें त्या वेळेस **इतरेतर द्वंद्व** म्हणतात.

उदा०—मायलेकरें, आईबाप, बहीणभाऊ—तीं मायलेकरें घरात आलीं.

**वैकल्पिक द्वंद्व**:—ज्या द्वंद्व समासांत निरनिराळ्या पदाचा विकल्प केला जातो त्यास **वैकल्पिक द्वंद्व** समास म्हणतात. ह्या समासाचा विग्रह करताना किंवा, अथवा, असे शब्द घालावे लागतात.

उदा०—तीनचार, (तीन किंवा चार) बरेंवाईट, अधिकउणा, कमीअधिक, सुखदुःख, सत्यासत्य, पापपुण्य, भक्ष्याभक्ष्य

( ३ ) **समाहार द्वंद्व** :—ज्या द्वंद्व समासात त्यांतील पदांनीं दाखविलेला तेवढाच अर्थ न घेतां त्याशिवाय इतर आनुषंगिक अर्थांचा समाहार करतात त्या समासास **समाहार द्वंद्व** म्हणतात.

घरदार म्हणजे घर आणि दार एवढाच अर्थ न घेतां त्याच्या आनुषंगिक इतर सामान, इस्टेट, जमीन, भांडींकुंडीं, डागडागिने इतक्या गोष्टींचा अंतर्भाव केला जातो.

उदा०—भाजीपाला, मीठभाकर, जमीनवाडी, शेतमळा, मीठमिरची शेटसावकार इ०

पुनरुक्तीनें झालेले समासहि एकप्रकारचे समाहार द्वंद्व होत.

( ४ ) **एकशेष द्वंद्व** म्हणून आणखीहि एक द्वंद्व समासाचा प्रकार आहे. ह्या समासांत पहिल्या शब्दाचा लोप होऊन दुसरा शब्द कायम राहतो.

उदा०—पितर, भावंडे.

द्वंद्वसमास तयार करतांना खालील सूचना ध्यानांत ठेवाव्या—

( १ ) भावाभावाच्या नावांचा समास करतांना समासांत त्यांच्या वयाप्रमाणे त्या नांवाचा क्रम ठेवावा.

उदा०—कुशलव, भीमार्जुन, रामलक्ष्मण.

( २ ) कमी अक्षरें असलेला शब्द प्रथम घालावा नंतर जास्त अक्षरांचा घालावा.

उदा०—अर्जुनभीमसेन.

( ३ ) शब्दांचा क्रम त्याच्या लिंगभेदाप्रमाणे ठेवावा. प्रथम पुल्लिंग, नंतर स्त्रीलिंग, शेवटीं नपुंसकलिंग.

उदा०—शेलापागोटें, नवराबायको, साखरपाणी, कागदशाई.

( ४ ) नात्याच्या शब्दात जवळच्या नात्याचा शब्द प्रथम घालावा.

उदा०—मातापिता, बापलेक, बहीणभाऊ.

( ५ ) अधिक महत्त्वाचा शब्द प्रथम घालावा. उदा०—देवदैत्य.

## तत्पुरुष समास

**१००.** ज्या सामासिक शब्दांत दुसरा शब्द प्रधान असून पहिला शब्द गौण असतो व तो गौण शब्द दुसऱ्या शब्दाचा अर्थ नियमित करणारा किंवा त्याचा विशेषण असतो त्या सामासिक शब्दास '**तत्पुरुष**' समास म्हणतात.

उदा०—सूर्यप्रकाश, स्वप्रकार, ब्राह्मणभोजन, राजपुरुष.

ह्या समासाचे पोटभेद खालीलप्रमाणे आहेत:—

(१) **विभक्ति तत्पुरुष**—ह्या समासाचा विग्रह करतांना पहिल्या गौण शब्दाचा दुसऱ्या प्रधान शब्दाशीं असलेला संबंध विभक्तीचे प्रत्यय लावून सांगावा लागतो. ह्या विभक्ति तत्पुरुष समासाचे द्वितीयापासून सप्तमीपर्यंत सहा प्रकार आहेत. प्रथमा आणि संबोधन ह्या दोन विभक्ति तेवढ्या वर्ज्य आहेत.

(अ) **द्वितीया तत्पुरुष**—उदा०—राजाश्रित, द्विजदण्ड, वंशागत, राजाला—आश्रित, द्विजाप्रत दण्ड इ०

(आ) **तृतीया तत्पुरुष**—उदा०—दयार्द्र, ईश्वरनिर्मित, गजमोजणी, तोंडपाठ, उपासमार, कपाळकरंटा, दुप्पट, पांचपट.

(इ) **चतुर्थी तत्पुरुष**—उदा०—यज्ञस्तंभ, पोळपाट, बाजारवाडा, भोजनगृह, कृष्णार्पण, क्रीडाभुवन, नाटकगृह, गायरान, वाटखर्च, कमरपट्टा, डोईजड.

(ई) **पंचमी तत्पुरुष**—उदा०—चोरभय, संसारतरण, जातिभ्रष्ट, पदच्युत, रोगमुक्त, वडिलोपार्जित, गर्भगळित, लंगोटीयार.

(उ) **षष्ठी तत्पुरुष**—उदा०—देवालय, केळफूल, देवपूजा, भूपती, विद्याभ्यास, गणपती, राजवाडा, धर्मवेड, मद्गुण, त्वद्रूप, त्वल्लीला, अस्मद्भाग्य, स्वजाती, स्वधर्म, निजधाम, आपमतलब, आपलपोट्या.

(ऊ) **सप्तमी तत्पुरुष**—उदा०—स्वर्गवास, शास्त्रनिपुण, कर्मकुशल, रानडुक्कर, घरजांवई, वनगाय, अवसानघातकी.

(२) **अलुक्समास**—ज्या तत्पुरुषसमासांत विभक्तीचे प्रत्यय कायम ठेविले जातात त्या समासास **अलुक्समास** म्हणतात.

( लुक्=लोप. अलुक्=लोप न झालेले ).

उदा०—दिवस्पति, वाचस्पति, युधिष्ठिर, तोंडींलावणे.

( ३ ) ज्या तत्पुरुषसमासांत दुसरा शब्द कृदन्त असतो त्या समासाला **उपपद तत्पुरुष** म्हणतात.

उदा०—ग्रंथकार, गृहस्थ, शेषशायी, मार्गस्थ, मांसखाऊ, लांचखाऊ, शेतकरी, कामकरी, आगलाव्या, कानफाट्या.

( ४ ) ज्या तत्पुरुषसमासात पहिला शब्द **अ**, **अन्** किंवा **न्** असतो त्या समासाला **नञ्तत्पुरुष** म्हणतात.

उदा०—अज्ञान, नक्षत्र, नपुंसक, अनवाणा, अनहित.

( ५ ) **कर्मधारय**—तत्पुरुषसमासाचाच कर्मधारय म्हणून एक पोटभेद आहे. ज्या तत्पुरुषसमासांत पहिलें पद विशेषण किंवा विशेषणस्वरूप नाम असतें त्या समासास **कर्मधारय** समास म्हणतात.

तत्पुरुषसमासाचा हा एक महत्त्वाचा पोटभेद आहे. ह्या सामासिक शब्दाचा विग्रह करताना समासांतील दोन्ही शब्द एकाच विभक्तींत प्रथमेत घालतात.

उदा०—शुक्लपक्ष, तांबडमाती, काळमांजर.

कर्मधारय समासांत विशेषणपद बहुतेक नेहमीं पहिलें असते; परंतु कधीं दुसरें पद विशेषण असून पहिले नाम असतें; कधीं कधीं दोन्ही पदें विशेषणें असतात.

ह्यावरून कर्मधारय समासाचे तीन प्रकार पडतात :—

( १ ) **विशेषणपूर्वपद कर्मधारय**—पहिले पद विशेषण व दुसरें पद विशेष्य असते.

उदा०—रक्तचंदन, पूर्वरात्र, पितांबर, महादेव, काळमांजर, तांबडमाती, खडीसाखर, साडेतीन, एकोणतीस.

**विग्रह** :—रक्त असें चन्दन; पूर्वींची रात्र.

( २ ) **विशेषणउत्तरपद कर्मधारय**—पहिलें पद विशेष्य व दुसरें पद विशेषण असतें.

उदा०—देशांतर, भाषांतर, दालचिनी. प्रसंगविशेष, ( विशेष असा प्रसंग ) ( दुसरा देश देशांतर. )

( ३ ) **उभयपदविशेषण कर्मधारय**—दोन्ही पदें विशेषणं असतात.

उदा०—कृताकृत, दृष्टादृष्ट, शुक्लकृष्ण, उपजतश्रीमंत.

( विग्रह :—कृत आणि अकृत, दृष्ट आणि अदृष्ट ).

कर्मधारय समासाचे **द्विगु** आणि **मध्यमपदलोपी** असे दोन मुख्य पोटभेद आहेत.

( अ ) **द्विगु**—ज्या कर्मधारय समासांत पहिलें पद संख्यावाचक विशेषण असतें त्या समासाला **द्विगु** समास म्हणतात.

उदा०—त्रिभुवन, पंचपाळें, अष्टाध्यायी, बारभाई, अठरापगड, पांचशेरी.

(आ) **मध्यमपदलोपी**—ज्या कर्मधारय समासांत समास करताना मधील शब्द गाळावे लागतात त्या समासाला **मध्यमपदलोपी** समास म्हणतात.

उदा०—साखरभात ( साखरेनें युक्त असा भात ), गुडदाणी, गुळांबा, पुरणपोळी, पंक्तिपठाण, बाळमित्र, डाळवांगें, बटाटावडा.

समास तयार करतांना पुढील सूचना ध्यानात धराव्या :—

(१) ज्या शब्दांचा समास करावयाचा असतो ते एकमेकाजवळ ठेविले म्हणजे ते संधीच्या नियमाप्रमाणें जोडले पाहिजेत.

उदा०—जोड+अक्षर = जोडाक्षर हरि+इच्छा = हरीच्छा.
वर+ईप्सित = वरेप्सित. तनु+अंगी = तन्वंगी इत्यादि.

(२) ज्या शब्दांचा समास करावयाचा ते शब्द होतांहोईलतों एकाच भाषेतील असावेत. दोन्ही शब्द दोन निरनिराळ्या भिन्न भाषातील असूं नयेत.

उदा०—गावफौजदार, शाळामास्तर.

विद्यार्थ्यांनीं असले समास करूं नयेत. मोठ्या लेखकांनीं आपल्या लेखनांत जर असले समास तयार करून भाषेत रूढ केले असतील तर ते मान्य केले पाहिजेत.

## बहुव्रीहि

१०१. खालील उदाहरणें पहा :—

**चक्रपाणी**—चक्र आहे पाणीच्या (हाताच्या) ठायीं ज्याच्या—असा विष्णु.

**दशमुख**—दश आहेत मुखें ज्याला—असा रावण.

**त्रिकोण**—तीन आहेत कोण ज्याला—अशी आकृति.

ह्या समासातील दोन्ही शब्द अर्थाच्या दृष्टीने गौण आहेत. ह्या दोन्ही शब्दांच्या अर्थापेक्षां तिसराच अर्थ ह्या समासात आपणास घ्यावा लागला. ह्या समासाला **बहुव्रीहि समास** म्हणतात. हा समास **अन्यपदप्रधान** आहे.

तत्पुरुष समासाचा विग्रह करताना पहिल्या शब्दाचा दुसऱ्या शब्दाशीं संबंध विभक्तिप्रत्ययाच्या साहाय्यानें आपणास दाखवावा लागला व त्याप्रमाणें तत्पुरुष समासाचे विभक्ति तत्पुरुष असे पोटभेद झाले. तसेच बहुव्रीहि समासातहि विग्रह करतांना समासातील शब्दाचा तिसरा जो मुख्य शब्द त्याच्याशीं असलेला संबंध विभक्तिप्रत्ययांच्या साहाय्याने दाखवावा लागतो, व त्यावरून त्याचे विभक्तीचे पोटभेद होतात.

| | | |
|---|---|---|
| कृत आहे प्रमाण ज्याला | कृतप्रमाण | **द्वितीया** किंवा **चतुर्थी बहुव्रीहि** |
| दत्त आहे पशु ज्याला | दत्तपशु | |
| दोन आहेत तोंड ज्याला | दुतोंडे | |
| लब्ध आहे प्रतिष्ठा ज्यानें | लब्धप्रतिष्ठ | **तृतीया बहुव्रीहि** |
| जित आहे काम ज्याने | जितकाम | |
| हत आहे धन ज्यापासून | हतधन | **पंचमी बहुव्रीहि** |
| गलित आहे पर्ण ज्यापासून | गलितपर्ण | |
| लक्ष्मी आहे भार्या ज्याची | लक्ष्मीभार्याक | **षष्ठी बहुव्रीहि** |
| एक आहे पत्नी ज्याची | एकपत्नी | |
| पीत आहे अंबर ज्याचे | पीतांबर | |

ह्या विभक्तिबहुव्रीहींत पुन्हां दोन प्रकार पडतात. विग्रहामध्यें दोन्ही शब्दांची एकच्च विभक्ति असेल तर तो **समानाधिकरण बहुव्रीहि** समास होतो. आणि विभक्ति भिन्न असतील तर तो **व्यधिकरण बहुव्रीहि** समास होतो.

'शुभ्र आहे वस्त्र जीचें अशी जी ती शुभ्रवस्त्रा;' ह्या समासांत 'शुभ्र' आणि 'वस्त्र' या शब्दांची विभक्ति एकच आहे. तेव्हां हा **समानाधिकरण बहुव्रीहि** समास आहे.

परतु 'चक्र आहे पाणीच्या टायीं ज्याच्या' ह्या समासात 'चक्र' आणि 'पाणी' या शब्दांच्या विभक्ति भिन्न आहेत तेव्हां हा **व्यधिकरण बहुव्रीहि** समास आहे.

**अनंत**—नाहीं अन्त ज्याला, **अज्ञान**—नाहीं ज्ञान ज्याला, वगैरे उदाहरणांत नकाराचा अर्थ असतो म्हणून ह्याला **नञ् बहुव्रीहि** म्हणतात.

**सांब**—अंबेसहित जो तो, **सोदर**—समान उदर ज्याचें असे ते, वगैरे उदाहरणांत 'सह' किंवा 'समान' हे शब्द आहेत म्हणून त्यांना **सहार्थी बहुव्रीहि** म्हणतात.

कर्मधारय समासात ज्याप्रमाणें कधीं पहिलें पद विशेषण असतें तर कधीं दुसरे पद विशेषण असते, तसेंच कधीं पहिले पद उपमान असतें तर कधीं दुसरें पद उपमान असते व त्याप्रमाणें त्याचे पोटभेद होतात, त्याप्रमाणें बहुव्रीहि समासांतहि निरनिराळे पोटभेद होतात.

## अव्ययीभाव

१०२. **यथाशक्ति**—शक्तिप्रमाणें — **हरघडी**—प्रत्येक घडीला

**आमरण**—मरणापर्यंत — **यावज्जीव**—जीव असे तोंपर्यंत

**प्रतिक्षण**—प्रत्येक क्षणीं — **बेलाशक**—शकाशिवाय

ह्या सामासिक शब्दांत पहिला शब्द अव्यय असून दोन्ही शब्दांपैकीं तोच शब्द प्रधान आहे. ह्या समासाला **अव्ययीभाव समास** म्हणतात.

हा समास व्याकरणदृष्ट्या क्रियाविशेषण असतो. परंतु कधीं कधीं त्याला नाम असे समजून त्याला तृतीया व सप्तमी या विभक्तींचे प्रत्यय लावतात.

अव्ययीभाव समासांत खालील घटक असतात.

**दोन्ही शब्द अव्ययें**—समोरासमोर, मधोमध, खालोखाल.

**एक अव्यय व एक नाम**—दरदिवस, हरघडी, यथाक्रम.

**दोन्ही नामें**—गांवोगांव, रातोरात, जागोजाग, घरोघर.

**एक अव्यय व एक विशेषण**—यथायोग्य.

**एक अव्यय व एक कृदन्त**—यथायुक्त.

## अभ्यास

लंबोदर, बहुग्रीव, नीलकंठ या बहुव्रीहि समासांना काय नांव मिळेल ?

चतुरानन, चतुर्भुज, षडानन, एकदंत, या समासांत पहिला शब्द संख्याविशेषण आहे; तेव्हां याला काय म्हणाल ?

हरिणाक्षी, सिहकटी, मुद्राराक्षस, यांचे विग्रह करतांना, अधिक शब्द घालावे लागतात व त्यांचा समासांत लोप होतो. या समासांना काय नांव द्याल ?

बहुव्रीहि समासाचीं महत्त्वाचीं खालील उदाहरणें ध्यानांत ठेवा.

१ तिमजली, आखुडशिंगी, एकडोळया, वाकडमान्या, रडतोंड्या, उंचमान्या.

२ दुप्पट, तिप्पट, पांचपट.

३ केशाकेशी, मारामारी, मुसळामुसळी, तोंडातोंडी, लाथालाथी, खेटराखेटरी.

# अर्वाचीन मराठी

## भाग २

# लेखन

## ग द्य र च ना

—०—

१. लेखनाचे दोन मुख्य प्रकार आहेत: एक **गद्य** व दुसरा **पद्य.** आपण नेहमीं जें बोलतों तेंच जर लिहिलें तर ते 'गद्य' स्वरूपाचें लेखन होय. ह्याच गद्यांत जर ताल आला, किंवा जर ते सुरावर म्हटले तर तें 'पद्य' होय. ह्या दोहोंपैकीं गद्यलेखनाचा विचार ह्या प्रकरणांत केला आहे.

२. गद्यलेखनांत गोष्टी, निबंध, लघुकथा, कादंबरी, नाटके इत्यादि प्रकार येतात. ह्या एकापुढील एक पायऱ्या आहेत. ह्यापैकीं विद्यार्थ्यांच्या दृष्टीनें गोष्टी व निबंध हे दोनच प्रकार महत्त्वाचे ठरतात. 'गोष्टी' हा प्रकार लहान मुलांसाठीं आहे. ह्यांत जनावरांच्या वागणुकीचीं व त्यांच्या स्वभावाचीं वर्णनें करून त्यांवरून त्यांना उपयोगी असा उपदेश केलेला असतो. त्याच्यापुढची पायरी निबंधलेखन हें होय.

निबंधलेखनांत लेखनखंड किंवा पॅरिग्राफ हा एक महत्त्वाचा घटक आहे. ह्याच्या रचनेवर सर्व निबंधाची रचना अवलंबून असते. पॅरिग्राफ जर चांगला रचला गेला तरच निबंध चांगला दिसतो. पॅरिग्राफ लिहितांना कोणत्या गोष्टींकडे विद्यार्थ्यांनीं लक्ष देणे जरूर आहे हें खालीं स्वतंत्र प्रकरणांत दिलें आहे. पॅरिग्राफरचनेचींच कल्पनाविस्तार व कल्पनासंकोच हीं दोन अंगें आहेत. तीं क्रमानें पुढें दिलीं आहेत.

पॅरिग्राफ लिहितांना सुद्धां विद्यार्थ्यानें आपल्या भाषेकडे लक्ष दिलें पाहिजे. आपली भाषा साधी सरळ आहे कीं नाहीं, ती भारदस्त व गंभीर आहे कीं नाहीं, आपला अर्थ स्पष्ट उघड होतो किंवा नाहीं हे पाहिलें पाहिजे. त्यामध्ये ग्राम्य,

कानाला वाईट लागणारे शब्द नाहींत, त्यामध्यें जरूरीपेक्षां अधिक व कधीं उपयोगात नसलेले असे शब्द नाहींत, ह्यासंबंधीं काळजी घेतली पाहिजे. शब्दांची निवड नीट असून त्यांचा योग्य क्रमहि पाहिला पाहिजे. वाक्यरचने-संबंधीं जे नियम मागे सांगितले आहेत ते ध्यानांत ठेवून वाक्यें रचावींत. ह्या नियमांकडे लक्ष देऊन जर लेखन केले तर आपोआपच भाषा चांगली वठेल, आपोआपच लेखनशैली चांगली साधेल. लेखनाचा पहिला जो घटक लेखन-खंड किंवा पॅरिग्राफ त्याचा विचार खालीं केला आहे.

## १ लेखनखंड (पॅरिग्राफ)–विचार

२. **व्याख्या**—पॅरिग्राफ म्हणजे वाक्यांचा समूह. वाक्याचे घटक जसे शब्द तसे पॅरिग्राफचे घटक वाक्यें होत.

**जरूरी**—वाचणारांची लवकर समजूत पडावी म्हणून निबंधांतील विषयाची मुद्यांप्रमाणें विभागणी करावी लागते. पॅरिग्राफमध्यें एकच मुद्दा असावा, जास्त असूं नयेत, व त्या मुद्द्यासंबंधीं किती मजकूर घातला तर कंटाळवाणें होणार नाहीं हें पहावें. पॅरिग्राफमध्यें लिहिलेलें मुद्द्यासंबंधीं विवेचन सहजगत्या बुद्धीच्या आटोक्यांत यावें इतकी त्याची लांबी असावी.

**वाक्यक्रम**—केवळ एकापुढें एक वाक्य ठेवून पॅरिग्राफ तयार होत नाहीं. त्या वाक्यांत एक कोणता तरी क्रम पाहिजे. प्रत्येक गोष्टींत कार्यकारण संबंध असतो. तद्वत् विचारांत एकापासून दुसरा, दुसऱ्यापासून तिसरा असा क्रम साधावा व त्याप्रमाणे वाक्ये घालावीं. किंवा ज्या कालाप्रमाणें व स्थलाप्रमाणें क्रिया घडल्या असतील त्या क्रमानें पॅरिग्राफमध्यें त्यांचा उल्लेख यावा. किंवा अगोदर सामान्य नियम घालून त्यावर दृष्टांत द्यावे. किंवा उलट अगोदर दृष्टांत देऊन त्यांपासून सामान्य सिद्धांत द्यावा.

**३. पॅरिग्राफचें पहिलें वाक्य**:—पॅरिग्राफच्या पहिल्या वाक्यासंबंधीं विशेष काळजी घ्यावी. त्यांत—

(१) व्याख्या द्यावी. उदा०—इतिहास म्हणजे काय—

इति+ह+आस=असें झालें.

( २ ) सामान्य सिद्धांताला पोषक असा दृष्टांत असावा--

उदा०-सेव्हिंग बॅंकवरील निबंधांत मुंगीच्या संग्रही स्वभावाचें उदाहरण द्यावें.

( ३ ) किंवा सामान्य स्वरूपाचें विधान करावें--

उदा०-पोषाखावरील निबधांत "पोषाखाने सौंदर्य वाढते" हे वाक्य द्यावें व खालीं त्याचें स्पष्टीकरण करावें.

**बाह्यसंबंध**--पहिला पॅरिग्राफ तयार झाल्यावर पुढें त्या त्या मुद्द्याप्रमाणें निरनिराळे पॅरिग्राफ करावे, आणि ते एकमेकाशीं योग्य रीतीनें जोडावे. प्रत्येक पॅरिग्राफ स्वतंत्र असावा हे जरी खरें असले तरी तो सर्व निबंधाचा एक घटक आहे हे विसरतां कामा नये. सर्व निबधात तो कसा दिसेल हे पहावें. पॅरिग्राफचा निबंधाशीं योग्य संबंध जोडण्याचे दोन उपाय खालीं दिले आहेत.

( १ ) जें विवेचन करावयाचे त्याची रूपरेखा अगोदर पुढें मांडून ठेवावी. त्यांत आलेले मुद्दे एकेक पॅरिग्राफमध्ये घालावे.

( २ ) मुद्द्यांचा आराखडा तयार झाल्यानंतर प्रत्येक मुद्द्याचे स्थान ठरवावें. एका पॅरिग्राफमधून दुसरा निघावा. एक संपतो तोंच शेवटीं असें एकादें सूचक वाक्य घालावें कीं त्याच्यायोगानें पुढील पॅरिग्राफसंबंधीं कल्पना यावी.

**शेवट**:—शेवटीं एक सारांशाचा पॅरिग्राफ जोडावा. त्यामध्यें नवीन मुद्दा असू नये. ज्या ज्या मुद्द्यांचे विवेचन झालें असेल त्यांचा फक्त गोषवारा द्यावा.

**( १ ) पॅरिग्राफसंबंधीं सूचना**:—

१. पॅरिग्राफमध्ये विचारांचें ऐक्य साधावें. ते साधण्याचे प्रकार:—

( अ ) एकापेक्षां जास्त मुद्दे एका पॅरिग्राफमध्ये घालूं नयेत.
( ब ) उलट एकच मुद्दा अनेक पॅरिग्राफमध्ये घालूं नये.
( क ) असबद्ध माहिती घालूं नये.

(२) **पॅरिग्राफमधील वाक्यें** परस्पर जोडण्याचे मार्ग :—

(अ) ज्या स्वरूपाचे वाक्य असेल त्या स्वरूपाचें उभयान्वयी अव्यय घालावें. उदाहरणार्थ :—म्हणून, अतएव, ज्यापक्षीं, ज्याअर्थीं जेणेंकरून, यद्यपि, जर इत्यादि.

(ब) पुनरुक्ति करून संबंध दाखवावा. ही पुनरुक्ति निरनिराळ्या प्रकारची असावी. वरचेवर वाचकांना आपण काय लिहितों ह्याची आठवण द्यावी. संबध त्यांचेसमोर ठेवावा.

(क) मुद्द्याचा उल्लेख प्रथम यावा व नंतर त्याचें विवरण, उदाहरण एकापुढें एक देऊन विस्तार करावा.

नमुन्यासाठीं कांहीं पॅरिग्राफ खालीं लिहून दाखविले आहेत. त्यांशिवाय कल्पनासंकोच ह्या पाठांत कांहीं प्रसिद्ध लेखकांचे पॅरिग्राफ दिले आहेत ते उदाहरणांदाखल पहावे.

**(१) गहूं**

आपल्या इकडील लोकांचें तांदूळ किंवा ज्वारी हें जसें मुख्य धान्य—रोजचें अन्न आहे, तसें तिकडील पाश्चात्य राष्ट्रांचें मुख्य धान्य गहू हें आहे. गहूं हा त्या लोकांचा धान्यांचा राजा आहे. आपल्या इकडेहि कांहीं श्रीमंत लोक गहूं खातात, नाहीं असें नाहीं. गव्हास साधारणपणें थंड हवा लागते. दमसर जमीन गव्हाला चालत नाहीं. फार पाऊस तर गव्हाचा शत्रु म्हटला तरी चालेल. पावसाळ्यानंतर हें पीक पेरतात व हिवाळ्यानंतर काढून घेतात. पीक काढल्यानंतर कांडून त्याचें धान्य एकीकडे व भुसा एकीकडे करतात. भुसा फारसा उपयोगी पडत नाहीं. कांहीं जिनसा भरण्याचे कामीं भुसा उपयोगी पडतो. धान्य मात्र दळून त्याच्या पिठाची पोळी करतात. इतर धान्यांपेक्षां गव्हांत सत्व जास्त असतें. रशिया, अमेरिका, पंजाब वगैरे प्रांतांत गहूं बराच पिकतो.

**(२) गाडीच्या वेळीं स्टेशनवरील देखावा**

गाडी स्टेशनवर येण्याचे वेळीं स्टेशनवर लोकांचा किती गोंधळ उडून जातो ! उतारू लोक तिकिटें काढण्याकरितां सारखें एकमेकांपुढें जाण्याची खटपट करतात. तिकिटें देणारा मनुष्य तर एकटाच. ज्या खिडकींतून तिकिटें घ्यावयाचीं ती खिडकीही अगदीं लहान असते. त्यांतून पैसे देऊन तिकीट घेऊन बाकीचे पैसे बरोबर

परत मिळाले म्हणजे प्रत्येकास धन्यता वाटते. कारण प्रत्येकजण अगोदर तिकीट मिळविण्याच्या इच्छेनें दुसऱ्यास रेटीत असतो. कोणाचे पैसे पडतात तर कोणाचीं तिकिटें नाहींशीं होतात, तर कोणाचें डोक्याचें खालीं पडतें. तिकीट मिळाल्याबरोबर आपआपलें सामान घेऊन मुलें माणसें बरोबर घेऊन जो तो धक्क्याकडे धांव घेतो. मास्तर, पोर्टर, हमाल, उतारू ह्या सर्वांची एकच गडबड उडून जाते. गाडी थोडा वेळ थांबत असल्यामुळें जो तो आपलें काम झटपट करण्याच्या घाईत असतो. सामान टाकून माणसें बसलीं म्हणजे जिवांत जीव येतो. चढणाऱ्या व उतरणाऱ्यांची एकच धांदल उडते. निरोप देण्यासाठीं जे लोक येतात त्यांना विषण्ण मनानें परत जावें लागतें. गाडी एकदांची गेल्यानंतर स्टेशनवर फार शांतता असते.

## ( ३ ) शिवाजीची आग्र्याहून सुटका

शिवाजीचा सारखा अव्याहत व अखंड रीतीनें चाललेला अभ्युदय सहन न होऊन औरंगजेबानें त्याचा कायमचा बीमोड करण्याच्या उद्देशानें जयसिंग व दिलीरखान यांना बरोबर मोठें सैन्य देऊन पाठविलें. मोंगल सैन्याच्या ह्या अफाट समुद्रापुढें आपल्या मावळी बारगिरांचा कांहीं टिकाव लागणार नाहीं हें जाणून मुकाट्यानें मोंगलांच्या हवालीं होणें हाच शहाणपणाचा मार्ग हें शिवाजीनें पूर्णपणें ओळखलें, व जयसिंगाच्या वचनावर भिस्त ठेवून तो मोंगलांच्या स्वाधीन झाला. स्वाधीन होतांना मात्र एक दोन अटी घालण्यांत आल्या होत्या. एक अट जिंकलेल्या प्रदेशापैकीं कांहीं भाग त्याच्या ताब्यांत ठेवणें ही व दुसरी अट त्याला मोंगल सैन्यांत सेनापतीचा मोठा हुद्दा देणें ही होय. परंतु तो दिल्लीस जातो तों त्याचा बादशहानें मोठा अपमान करून त्याला कैदेंत टाकिलें. कैदेंत असतांना आपण आजारी असल्याचा बहाणा करून त्यानें आपला वाडा सोडून जाण्याचें बंद केलें. त्या वाड्यावर मोंगल शिपायांचा कडक पहारा होता. परंतु कांहीं लोकांनीं शिवाजीस एका पेटाऱ्यांत सुरक्षित बसवून त्यांत मेवामिठाई आहे अशी पहारेकऱ्यांची समजूत करून देऊन एका ठिकाणीं पळविलें. नंतर आपणास कोणी ओळखूं नये म्हणून बैराग्याचा वेष घेऊन त्यानें अंगास राख फासिली व अशा रीतीनें सुटका करून घेतली.

## ( ४ ) एक प्रसादयुक्त पॅरिग्राफ

ज्या लढाईचें वर्णन पुढल्या चौकांत गोंधळी एकतारीवर गात असेल, अंगेजणीनें चढाई करून चढविलेल्या हल्ल्याचें वर्णन शाहीर अंगणांत म्हणत असेल, त्या लढाईत

माझा भाऊ होता, ही कल्पना कोणत्या बहिणीस मोहून टाकणार नाहीं ? त्या स्वारींत माझा बाप होता हा अभिमान कोणत्या मुलाला वाटणार नाहीं ? त्याच लढाईतील लुटींत आणिलेल्या मोत्याचा कंठा आज माझ्या गळ्यांत आहे, तेथेंच मिळालेल्या बक्षिशींची तरवार माझ्या समोर खुटीवर ठेवलेली आहे, हें मनांत येतांच कोणती बायको द्रव्यलोभ पार विसरून जाऊन अंगावरचा शालू माडीवरून त्या शाहीराच्या अंगावर फेकणार नाहीं ? आणि हें पाहून गळ्यांतील शेरभर सोन्याचा गोफ कोणता धनी त्या शाहीराच्या गळ्यांत घालणार नाहीं ?

—— ( भावे—महाराष्ट्रसारस्वत )

## अभ्यास

१. खालील निबंधांतील प्रत्येक मुद्दा एकेका पॅरिग्राफमध्यें लिहा :—

( १ ) लोखंड :—धातु–कोठें सांपडते–शुद्ध अशुद्ध–शोधण्याचा प्रकार–उपयोग–वर्तमानकालांत महत्त्व.

( २ ) सोनें :—धातु–सांपडण्याचीं स्थळें–शोधण्याचा प्रकार–जातीप्रकार–उपयोग–महत्त्व.

( ३ ) भात :—मनुष्याच्या उपजीविकेचें मुख्य धान्य–उपकारी हवामान, जाती, प्रकार–बंगाल, ब्रह्मदेश, कोंकण–पीक, उत्पन्न करण्याची तऱ्हा–उपयोग.

२. खालील प्रसंगांवर एकेक पॅरिग्राफ लिहा :—

( १ ) गलबत बंदरांत आल्यावर लोकांचा उडालेला गोंधळ. ( २ ) आगीचें वर्णन. ( ३ ) दसऱ्याचें सीमोल्लंघन.

३. पुढें दिलेल्या म्हणींवर अर्थविस्तारक एकेक पॅरिग्राफ लिहा :—

दृष्टीबाहेर तें मनाबाहेर. आपत्कालीं जो मित्र तो खरा मित्र. उथळ पाण्यास खळखळ फार. समानशीलव्यसनेषु सख्यम्.

४. " जलप्रवास " यावरील निबंधाच्या आरंभींच्या पॅरिग्राफचें वाक्य पुढील प्रमाणें आहे. " आपल्या धर्मग्रंथांमध्यें जलप्रवास निषिद्ध मानला आहे; परंतु सध्यांच्या सुधारणेच्या काळांत त्याच्या निषिद्धतेकडे कोणी विशेषसें लक्ष देत नाहीं. " हा पॅरिग्राफ पूर्ण करा.

"जन्मभूमि" वरील निबंधामधील एका पॅरिग्राफचें पहिलें वाक्य पुढील प्रमाणें आहे :—"जन्मभूमीमध्यें रहात असतांना नाना प्रकारचीं संकटें जरी आलीं, नाना प्रकारच्या यातना जरी भोगाव्या लागल्या तरी त्या संकटांनीं व त्या यातनांनीं न डगमगतां मनुष्याचें तिजविषयींचें प्रेम, अभिमान व भक्ति द्विगुणितच होते." हा पॅरिग्राफ पूर्ण करा.

५. वसंत ऋतूंतील सकाळ व संध्याकाळ ह्यांची गुणदोष-तुलना एका पॅरिग्राफांत करा.

६. काव्याच्या निरनिराळ्या व्याख्या खालीं दिल्या आहेत. प्रत्येकीवर एक एक रकाना लिहा.

(१) छन्दोबद्ध पद्यरचना म्हणजे कविता. (२) ज्या पद्यांत यमक, प्रास पुष्कळ असतात ती कविता. (३) रस ज्या वाक्यांत असतो तें वाक्य काव्य. (४) जें वाचून अथवा ऐकून मन प्रसन्न होतें तें खरें काव्य.

—

## २ कल्पना-विस्तार

**४.** पॅरिग्राफरचनेचा आणखी एक प्रकार ह्या पाठांत सांगितला आहे. पॅरिग्राफमध्यें आपण एका मुद्द्याचा विस्तार करतों. तो मुद्दा व त्याच्या अंगभूत व त्याला पोषक असणारी माहिती आपण त्या पॅरिग्राफमध्यें घालतों. तो पॅरिग्राफ म्हणजे त्या मुद्द्याचा विस्तार असतो. त्याचप्रमाणें एका वाक्यांत जर एखादी सुंदर कल्पना अथवा एकादा सुंदर विचार असला, तर त्याचाही विस्तार करतांना पॅरिग्राफच्या बाबतींत ज्या सूचना केल्या आहेत त्या पाळाव्या. विस्तारास उपयोगीं पडणाऱ्या सूचना खालीलप्रमाणें :—

१. दिलेलें वाक्य वाचून त्याचा अर्थ पूर्णपणें लक्षांत घ्या. नंतर त्याच्या अर्थाचा विस्तार करा. विस्तार करतांना अवास्तव मजकूर येऊं देऊं नका, व जरूरीचा मजकूर कमी होऊं देऊं नका.

२. अर्थविस्तारक असा एकच पॅरिग्राफ लिहा. तो लिहितांना त्याचा आरंभ, मध्य, शेवट, योग्य साधण्यासंबंधीं दिलेल्या सूचना पाळा. पॅरिग्राफमधील वाक्ये योग्य रीतीनें जोडा.

३. विस्तार जो करावयाचा तो त्या वाक्यावरील एक लहानसा निबंधच असावा. मात्र त्याची मर्यादा एका पॅरिग्राफपुरती असावी.

५. कल्पनाविस्ताराचीं कांहीं उदाहरणे खालीं देतों.

१. जे का ज्ञाने लाधले सद्विचारा। सपत्तीचा त्यांपुढें काय तोरा।

जगाच्या व्यवहारांत आपण नेहमीं पाहतों कीं जेथें तेथें संपत्तीला मान मिळतो. 'द्रव्येण सर्वे वशाः' अशा प्रकारचें सर्वांना वश करून घेण्याचें सामर्थ्य द्रव्यांत आहे. परंतु द्रव्यांत मोठेपणा आहे असे समजण्याची दृष्टि कोणाची ? सर्वांची दृष्टि द्रव्यमय खास नसते. क्षुद्रवृत्ति लोकच द्रव्यासाठीं हपापलेले असतात. ज्यांच्या बुद्धीचा क्षुद्रपणा ज्ञानाच्या योगानें नाहींसा झाला आहे व ज्यांच्या बुद्धीला सद्विचारानें वळण लागलें आहे त्यांच्यापुढें संपत्तीचा तोरा थोडासुद्धां नसतो. सुविचारी मनुष्य संपत्तीला फारसे महत्त्व देत नाहीं.

२. " नशिबावर हवाला ठेवणे हें वाईट, उद्योगावर विश्वास ठेवून सतत उद्योग करीत रहावे हे चांगले."

ज्याला उद्योग करावयाची इच्छा नसते तोच मनुष्य नशिबावर विसंबतो. उद्योगच करावयाचा नाहीं आणि कार्य साधलें नाही तर त्याचा दोष नशिबावर टाकावयाचा; त्याला बिचारें नशीब काय करणार ? प्रयत्न जर केला तर अपयश सहसा येत नाहीं; आणि यदाकदाचित् जर आलें तर त्याचा मनुष्याकडे दोष येत नाही. आपण प्रयत्न केला एवढें तरी त्यास समाधान असतेंच असतें. नशीब नाही असें आमचें म्हणणें नाहीं. त्याच्यावर विसंबून प्रयत्न सोडणें हें बरें नाहीं. विश्वास नशिबावर न ठेवितां उद्योगावर ठेविला पाहिजे. सतत उद्योग करीत राहणें हेंच यशःप्राप्तीचें साधन आहे. उद्योगप्रिय मनुष्याकडे लक्ष्मी आपण होऊन येते. नशिबावर हवाला ठेवून आळसांत काळ कंठणाऱ्या माणसापासून लक्ष्मी पराङ्मुख झाली तर त्यांत काय नवल ?

३. गुरूनें दिलेला मार पित्याच्या लाडापेक्षां जास्त हितकर असतो.

आपल्या मुलांवर आईबापांचें प्रेम असणारच. त्या प्रेमामुळेंच मुलाच्या ज्या इच्छा असतात त्या आईबापांकडून भागविल्या जातात. अशा तऱ्हेनें हळूहळू मुलें हट्टी होत जातात व त्यांचे हट्ट पुरविले जातात. त्यांना शिक्षा करून मार्गावर आणण्याचें काम एखादाच पिता करूं शकतो. त्या वेळेस तें कडू वाटतें पण परिणामीं

त्यापासूनच हित होतें. गुरूला मुलास एकाद्या वेळेस जी शिक्षा करावी लागते ती तो त्याचें वैर म्हणून करीत नाहीं. त्या मुलाचें कल्याण व्हावें, त्याला कांही विद्येचे दोन शब्द यावेत व ते त्याच्या पुढील आयुष्यक्रमांत उपयोगी पडावे ह्या इच्छेनेंच त्याला कधीं कधीं निर्दय बनावें लागतें. आईबापांच्या लाडापासून बिघडलेलीं मुलें लाखों सांपडतील. सध्यां जे जे विद्येत पुढें आहेत त्यांना जर विचारलें तर ते असेच सांगतील कीं योग्य वेळी आम्हांस शासन करून योग्य मार्ग दाखविला त्यामुळेंच आम्हांला विद्या प्राप्त झाली.

## अभ्यास

खालीं दिलेल्या वाक्यांतील कल्पनांचा विस्तार करा.

१. अति तेथें माती, २. कर्मणो गहना गतिः, ३. द्रव्येण सर्वे वशाः, ४. धर्मस्य त्वरिता गतिः, ५. परोपदेशे पाण्डित्यम्, ६. पुराणमित्येव न साधु सर्वम्, ७. पांचा मुखीं परमेश्वर, ८. पिंडी तें ब्रह्मांडीं, ९. मूर्ति तितक्या प्रकृति, १०. व्याप तितका संताप, ११. साखरेचें खाणार त्याला देव देणार, १२. स्वतोक पितरां रुचे जरिहि कर्दमीं रांगलें, १३. चपलपण मनाचे मोडितां मोडवेना, १४, असे हो जया अतरीं भाव जैसा। वसे हो तया अतरी देव तैसा, १५. आतां दया ने ऐसी । पूर्ण चंद्रिमा जैसी। निववितां न कडसी। सान थोर, १६. आशा नाही ज्याला। देव कां मारी तयाला, १७. पीक पिकलें प्रेमाचें । सांठविलें गगन टांचे, १८. माता कापी गळा। तेथें कोण राखी बाळा, १९. जे कां रंजले गांजले। त्यांसी म्हणे जो आपुले। तोचि साधु ओळखावा, २०. कावळ्याचा गळा। मुक्ताफळमाळा। तरी काय त्याला। भूषण शोभे, २१. सुख पाहतां जवा पाडें। दुःख पर्वता एवढें, २२. बसोनि थिल्लरी। बेडूक सागरा धिक्कारी। नाहीं देखिला ना ठावा। तोंड पिटी करी हावा, २३. मोलें घातलें रडाया। नाही असूं माया, २४. कठिण समय येतां कोण कामास येतो.

नेमितों, वकील देतों, कोर्टात जातों व न्याय करून घेतों; परंतु मारामारी करीत नाहीं, किंवा खूनहि करीत नाहीं. मग हीच वृत्ति राष्ट्राराष्ट्रांतील वितुष्ट तोडण्यांत कां अवलंबूं नये ? थोडीशी देवाणघेवाण वृत्ति स्वीकारली पाहिजे.

अलीकडे ही वृत्ति कांहीं राष्ट्रांत दिसूं लागली आहे. लीग ऑफ नेशन्स म्हणून एक सर्व राष्ट्रांच्या प्रतिनिधींचें मंडळ काढिलें आहे. त्यांच्यामार्फत युरोपांतील बरेचसे आंतरराष्ट्रीय प्रश्न निकालांत काढितात. युद्धप्रवृत्तीचें समूल उच्चाटण ह्या मंडळामार्फत करण्याचा सर्व राष्ट्रांचा इरादा आहे, आणि त्याला यश आल्यावांचून राहाणार नाहीं.

## अभ्यास

### चर्चात्मक निबंध

१. तुलनात्मक निबंध लिहा :—

(अ) वनांतील फूल व बागेंतील फूल. (आ) प्रवास व एकस्थायित्व.

(इ) कुत्रें व मांजर, घरांतील पाळीव जनावर म्हणून.

२. खालील मुद्यांवर साधकबाधक प्रमाणें देऊन लिहा :—

लेखनस्वातंत्र्य; लोकसत्ताक राज्यपद्धति; सक्तीचें लष्करी शिक्षण; कादंबरीवाचन; वसतिगृहें; फिरतीं वाचनालयें.

३. खालील मुद्यांवर अस्तिनास्तिपर लिहा :—

१. उपकाराची फेड करण्यांत घाई करणें म्हणजे एक प्रकारचा कृतघ्नपणाच आहे.

२. राष्ट्रगीतें करण्याची सत्ता मला द्या, मग कायदे कोणी कां करीनात ?

३. संभाषणावर जसा अभिजातत्वाचा परिणाम होतो तसा काटकसरीचा समृद्धीवर होतो.

४. खालील विधानांची साधकबाधक छाननी करा :—

१. मनुष्य हा साहित्य वापरणारा ( हंसणारा, बोलणारा, विचार करणारा ) प्राणी आहे.

२. ब्रह्मर्षींनीं ब्रह्माची व्याख्या ‘ नेति नेति ’ अशी केली आहे.

३. सूड घेणें म्हणजे एक प्रकारची कठोर न्यायप्रियता दाखविणें आहे.

५. खालील विषयांची चर्चा करा :—

वर्तमानपत्रें विद्यार्थ्यांनीं कोठवर वाचावीं ? वाचन चांगलें का निरीक्षण चांगलें ? फांशीची शिक्षा असावी कीं नाहीं ? सक्तीचें मोफत शिक्षण असावें की नाहीं ? नफाबाजी करणें न्याय्य आहे कीं नाहीं ? शिक्षणांत धंदेशिक्षण हा विषय असावा काय ?

# ९. कल्पनाविषयक निबंध

## १. निबंध

वर सांगितलेल्या कथनविषयक, वर्णनविषयक, चिन्तनविषयक ह्या निबंधांच्या कोणत्याहि प्रकारच्या निबधाचा अन्तर्भाव ह्या कल्पनाविषयक निबंधांत होतो. चिन्तनविषयक निबंधात बुद्धीला वाव मिळतो. कल्पनाविषयक निबंधांत कल्पनाशक्तीला वाव मिळतो. वर्णनविषयक व कथनविपयक निबंधांत वर्ण्य विषय समोर असतो; कल्पनाशक्तीचें कांहीं काम लागत नाहीं. ह्या निबंधांत कल्पनाशक्तीला जो अवसर द्यावयाचा तो सत्याच्या भरींव पायावर द्यावा लागतो वर्णनाच्या मुळाशीं जर सत्यता असेल तर त्या विपयाची व त्याच्या वर्णनाची वाचकांस खात्री पटेल. नाहीं तर येथूनतेथून असंभाव्य कथाच होईल.

कल्पनाविषयक निबंधांत जें साहित्य घ्यावयाचें तें आपल्या भोंवतालच्या परिस्थितींतून घ्यावें लागतें. कल्पनाशक्तीस वाव द्यावयाची ती साहित्य उत्पन्न करण्याच्या बाबतींत न देतां साहित्याच्या मांडणींत द्यावयाची हें लेखकानें ध्यानात ठेवावें. कधींकधीं लेखकास सामग्रीचा तुटवडा पडलासा वाटतो म्हणून तो आपल्या कल्पनेनें काल्पनिक सामग्री तयार करितो. कल्पनाशक्तींत चांगलें सामर्थ्य नसल्यामुळे भोंवतालच्या परिस्थितींत त्याला कांहीं नवीनपणा दिसत नाहीं, म्हणून तो असंभाव्य सृष्टीकडे धांव घेतो. निसर्गामध्ये एवढे अमर्याद ऐश्वर्य आहे कीं, जिकडे पहावे तिकडे त्यास नवीन पदार्थ, किंवा जुन्या पदार्थांतहि कांहीं नवीन दिसल्याखेरीज रहाणार नाहीं. येथें योग्य निरीक्षणशक्तीची जरूरी लागते.

कल्पनाविषयक लिखाणाचे दोन प्रकार खालीं दिले आहेत.

१. कल्पनाप्रचुर निबंध.

२. काल्पनिक व्यक्तीचें किंवा प्राण्याचे आत्मचरित्र.

खालीं कल्पनाविषयक निबधाचे नमुने दिले आहेत.

## समुद्र

हे सागरा ! तुझ्या अफाट विस्ताराकडे पाहून जों जों विचार करूं लागावें, तों तों नव्या नव्या कल्पना मनांत येऊं लागून बुद्धीस अधिकाधिक चमत्कार भासतात, आणि आश्चर्यभरांत चित्त अगदीं थक्क होऊन जातें ! ज्याप्रमाणें मनुष्यांच्या पिढ्यान्पिढ्या एकामागून एक जन्मास येऊन कांहीं काळानें लागलीच विलयास जातात, त्याप्रमाणें तुजवर हजारों लाटा एकावर एक येऊन भराभर बुजून नाहींतशा होतात, आणि त्यांच्याप्रमाणेंच यांच्या वास्तव्याची मागें खूण देखील रहात नाहीं ! तुझ्या लाटा सर्व पृथ्वीच्या किनाऱ्यांवर आदळत आहेत, आणि ज्यांचें निकट सान्निध्य त्यांच्या अक्षय्य वैरास मात्र कारणीभूत होतें, अशा देशांची तोडातोड करून तूं त्यांचें कलाकौशल्य व संपत्ति हीं परस्परांस देववितोस व येणेंकरून सर्व जगास तुझ्यामुळें सुखाचा व समृद्धीचा लाभ होत आहे.

तुझे देखावे तरी निरनिराळ्या समयीं किती विचित्र असतात ! त्यांची शोभा व भव्यपणा हीं कोठवर वर्णावीं ! कधीं वाऱ्याची हालचाल अगदीं बंद होऊन तुझा सर्व विस्तार अगदी निश्चल दिसतो—कधी नुकताच सूर्योदय झाला असल्यामुळें क्षितिजाची कड रुप्यानें जणूं काय मढविलीच आहे अशी भासते—कधीं तोच सूर्य अस्तास जाऊं लागून संध्याकाळचें आकाश त्याच्या सोनेरी किरणांनीं देदीप्यमान झालें असतें, व अशा वेळेस आरशाप्रमाणें स्थिर अशा तुझ्या पाण्यावर जेव्हां आकाशाची कमानची कमान शाबूत उठलेली असते, तेव्हां ती तर काय शोभा सांगावी ! पण हीं सर्व सौम्य रूपें टाकून जेव्हां तूं आपलें उग्र स्वरूप धारण करतोस—जेव्हां काळ्या दाट ढगांनीं आकाशांत गाढ अंधार होऊन तुफानाच्या वाऱ्याच्या सोसाट्यांनीं तूं अगदीं खवळून जातोस, व तुझ्या प्रचंड लाटा उसळून मेघमंडळाशीं एकवट होऊं पाहातात—जेव्हां मृत्यु आपलें भयंकर आधिपत्य तुजवर चोहोंकडे चालवीत असतो—जेव्हां अशा तडाक्यांत सांपडलेला बिचारा खलाशी भयानें गर्भगळीत होऊन त्याचे सर्व प्रयत्न निष्फळ होतात, व त्याचे इष्टमित्र त्याज-

करितां जागच्या जागीं हळहळत असतात,–अशा भयंकर प्रसंगीं तुजकडे पाहण्याची कोणाची छाती आहे !

हे रत्नाकरा ! इतकें झालें तरी हे सर्व खेळ केवळ तुझ्या पृष्ठभागावरचे ! तुझें आंत जें विस्तीर्ण राज्य आहे त्यांत तर काय काय चमत्कार असतील याची कल्पना तरी कोणी करावी ! तेथें जे मोठमोठाले खडपे व विशाल दऱ्या असतील, त्यांत जे नानाप्रकारचे हजारों प्राणी व वनस्पति असतील, तीं पाहिलेला कोण मनुष्य आहे ? व तसेंच रत्नें वगैरे ज्या कोट्यवधि सुदर वस्तु तुझ्या तळीं लोळत असतील, त्यांचा तरी कोणास पत्ता लागेल काय ?

—कृष्णशास्त्री चिपळूणकर

## काळाची विशालता

पूर्वी, पुढें, हल्लीं इत्यादि व्यवहार जे आपण नेहमीं करितों त्या सर्वाला आधारभूत जी कांहीं कल्पना तिलाच आपण काळ असें म्हणतों. काळ हा पदार्थ डोळ्यानें दिसण्यासारखा नाही; किंवा स्पर्शानें जाणतां येण्यासारखा नाहीं; तरी पण तो डोळ्यांना दिसत नाही किंवा हाताला लागत नाहीं म्हणून त्याचें अस्तित्वच नाहीं असें मात्र म्हणतां येणार नाहीं. कारण ज्ञानाचीं द्वारें अनेक आहेत. जें प्रत्यक्ष दिसत नाहीं तें कदाचित् अनुमानानें सिद्ध होत असतें. प्रस्तुत विषयाची स्थिति अशीच आहे. काल, आज, उद्यां, पूर्वी, हल्लीं, पुढें इत्यादि व्यवहार काळ म्हणून कांहीं पदार्थ नसता तर आपणाला करतांच आला नसता. आंब्याचें झाड नसलें तर त्याजवरील फळ खावयाला मिळणें जसें अशक्य, तसेच काळ हा पदार्थ अस्तित्वांत नसता तर पूर्वीचा काळ, पुढचा काळ असले जे प्रयोग आपण पावलोपावलीं करतों ते करतां आले नसते. पण ज्याअर्थी ते करतां येतात त्याअर्थी काळाचें अस्तित्व कबूल करणें भाग आहे. ह्या काळाला आदि आणि अंत हे मुळींच नाहीत. ज्याप्रमाणें सूर्य पूर्वेकडील क्षितिजावर आल्यापासून पश्चिमेकडील क्षितिजाच्या खालीं जाईपर्यंतच काय तो आपल्याला दिसतो, त्याच्या आधींच्या आणि नंतरच्या स्थितीबद्दल आपल्याला कांहींच कळत नाहीं, त्याप्रमाणें काळाचा देखील कांहीं भाग मात्र जाणतां येतो. आणि त्याच्या आधींचा भाग आणि नंतरचा भाग ह्यांविषयीं इतिहासाच्या साधनानें काळाच्या उगमाकडे जाण्याविषयीं मनुष्याचे सतत प्रयत्न चालले आहेत. पण त्यांना कितीसे यश आलें आहे ? उपलब्ध साधनांपैकी अतिशय प्राचीन

असे जे वेद त्यांच्या कालमानाविषयींच्या वादाच्या भानगडींत न पडतां स्थूलमानानें वेद सहा हजार वर्षांचे जुने आहेत असें कांहींच्या मताप्रमाणें घटकाभर मानलें तरी काय? सहा हजार वर्षांपासूनच काळाला सुरवात झाली असें त्यावरून कोणाला म्हणतां येणार आहे? किंवा आजपासून पुढें सहा हजार वर्षांनीं ग्रहांची स्थिति अमुक अमुक होईल, त्यांचीं अमुक अमुक फलें येतील हें जरी कळलें तरी काय? त्या मुदतीच्या पुढें काळाची गति खुटणार असे कोणा ज्योतिषाला सांगतां येणार आहे? सारांश, परमेश्वराप्रमाणेंच काळ हाहि आद्यंतरहित आहे; आणि आदि व अंत ह्यांनीं विरहित हा काळ असल्यामुळें परंपरेनें ह्याच्याही अगांत पुष्कळ शक्तींचा समावेश झालेला आहे. काळ हा जसा अनादि आणि अनंत आहे तसाच तो सर्व ठिकाणीं आणि सर्व वेळीं असतो. म्हणून जगांत आजपर्यंत ज्या ज्या गोष्टी घडून आल्या त्या सर्व काळानें पाहिलेल्या आहेत, व यापुढें ज्या ज्या गोष्टी घडून येणार असतील त्याही सर्व काळाला पहावयास सांपडतील. मध्य आफ्रिकेंत आणि राजपुतान्यांत हत्तीच्या अंगाएवढ्याल्या समुद्राच्या लाटा उसळतांना आणि त्यांवरून हत्तीच्यापेक्षां दसपटीनें मोठीं अशीं गलबतें फिरतांना यानें पाहिलीं असलीं पाहिजेत. हिमालय पर्वताच्या जागीं डोळे फिरून जातील इतके खोल खळगे आणि अटलांटिक महासागराच्या जागीं मेघमंडळांत घुसणारीं पर्वतशिखरें कदाचित् यानें पाहिली असतील. निनेव्ही, केरो, सीरिया, पॅलेस्टाइन इत्यादि शहरांचा आणि देशांचा उत्कर्ष आणि अपकर्ष दोन्ही यानें पाहिलेले आहेत. यानें घोड्यांना आणि पर्वतांना पंख असलेले पाहिले आहेत. यानें समुद्राचें गोडें पाणी प्राशन केलेलें आहे. अर्जुनाच्या एका बाणापासून हजारों बाण उत्पन्न होत आणि रावणाला दहा तोंडें होतीं ह्या गोष्टी याला थोतांड वाटत नाहीत. ह्यानें ऋषींना ऋग्वेदांतील सूक्तें रचीत बसलेले असतांना पाहिलें आहे. यानें विश्वामित्र आणि वसिष्ठ यांच्या भांडणाला काय काय कारणें झालीं तीं लक्षांत ठेविलीं आहेत. यानें आजपर्यंत कैक राजांचीं राज्यें, गर्विष्ठांचा गर्व, धनाढ्यांचें धन, बलाढ्यांचें बल, आणि मस्तवाल्यांची मस्ती हीं लयाला गेलेलीं पाहिलीं आहेत; एजिस्, टार्किनस, नीरो यांनी गरिबांवर पुष्कळ जुलूम केला, पण अखेरीस याच्या पुढें त्यांचा जुलूम चालेनासा झाला. अलेक्झांडर आणि जूलिअस् सीझर यांनीं आपल्या सैन्यानें साऱ्या शत्रूंना जेरीस आणलें, पण जेव्हां याच्याशी लढाई करण्याचा प्रसंग आला तेव्हां तेच उलटे जेरीस आले. सालोमन आणि मार्कस ऑरेलिअस हे राजे मोठे शहाणे होऊन गेले, पण ह्याच्यापुढें त्यांचें शहाणपण चालेना. गरीब लोक

जुलमानें गांजून भुकेनें व्याकूळ होऊन, उन्हानें करपून, किंवा थंडीनें गारठून गुडघ्यांत डोकें घालून डोळ्यांतून टिपें टाकीत बसत, तेव्हां खऱ्या मित्राप्रमाणें चार युक्तीच्या गोष्टी सांगून हाच त्यांच्या मनाला धीर देत असे. लढाईत पराभव होऊन जिवंत शत्रूच्या हाती सांपडलेल्या राजांकडून रोमन बादशहा रोम शहरांतून आपले विजयरथ ओढवीत असत, त्यावेळीं त्या गुलाम राजांना शत्रूंचें वैभव आणि आपली विपत्ति सहन करण्याचें सामर्थ्य खऱ्या शूराप्रमाणें हाच त्यांच्या डोळयांपुढें येऊन देत असे. ल्युक्रेशिआवर टार्क्विनसनें जुलूम केला, रावणानें सीतेला चोरून नेलें, आणि दुःशासनानें द्रौपदीची भर सभेंत विटंबना करण्याचा प्रयत्न केला त्यावेळी ब्रूटसच्या, रामाच्या आणि भीमाच्याही आधीं मोठ्यानें गर्जना करून ‘ सूड सूड ! ’ हे शब्द हाच ओरडला. दैत्यांनीं रसातळाला पोंचविलेल्या वेदांचा प्रचार यानेंच फिरून सुरू केला, हिरण्यकशिपूचें पोट यानेंच फाडिलें, बळीचें डोकें यानेंच ठेंचलें, आणि रावणाचे गळेही यानेंच कापिले. जेव्हां जगांत अनाचार अतिशय वाढला तेव्हां लोकानुग्रहासाठी शुक्राचार्य, नारदमुनि, सॉक्रेतीस, गौतमबुद्ध, जीजस् ख्राईस्ट इत्यादि महात्म्यांना यानेंच लोकांपुढें आणून ठेविलें. असे मोठमोठे उपकार यानें जगावर केले आहेत व पुढेंही याचे हातून होतील. वास्तविक पाहतां उत्पत्ति, स्थिति आणि लय ह्या तिहींला हाच कारणीभूत आहे. अशा दृष्टीनें पाहिलें असतां ब्रह्मा, विष्णु आणि शिव ह्या तिन्ही देवतांचा हा एकवटलेला अवतार आहे. वास्तविक हा त्रिमूर्तिमय असून कधी फक्त शिवाची आणि ह्याची एकरूपता आहे असें वर्णन करण्यांत येतें; पण हें भ्रममूलक आहे. दूरदर्शी राजकरणी पुरुषाप्रमाणें यानें पुढें काय गोष्टी करावयाच्या तें सुद्धां सर्व ठरवून टाकिलें आहे. कोणते किल्ले निरुपयोगी म्हणून पाडून टाकावयाचे आणि कोणते नवीन बांधावयाचे, कोणत्या भरभराट संपलेल्या शहरांची जागा रानें लावण्यासाठीं मोकळी करून द्यावयाची आणि कोणत्या रानांतली जागा साफ करवून नवीन शहरें वसवायाचीं, कोणत्या राजांना तक्तावरून खालीं ओढायाचें आणि कोणाला नेऊन तेथें बसवायाचें, कोणत्या लोकांच्या गळ्यांत विजयश्रीकडून माळा घालावयाच्या आणि कोणाच्या पायांत गुलामगिरीच्या बिड्या अडकवायाच्या, हें सर्व यानें कायम करून ठेविलें आहे. आणखी हजारों वर्षांनंतरच्याही पृथ्वीच्या पृष्ठभागावरील राष्ट्रांचा नकाशा यानें कुशल चिताऱ्याप्रमाणें सर्व रंगवून तयार केलेला आहे. हिरवा, पिवळा, तांबडा, निळा, पांढरा हे निरनिराळे रंग कोठकोठें कसे भरावयाचे ह्याचा ह्यानें कधींच निकाल लावून टाकलेला आहे !

—शि. म. परांजपे.

## एक जुना रुपया व त्याचें आत्मचरित्र

एकदां एक रुपया आपल्या कडावर एकदम उभा राहिला आणि लोकांच्याकडे आपलें तोंड फिरवून आपल्या आयुष्यांतील घडलेल्या साहसाची कहाणी सांगूं लागला. तो म्हणाला :—

माझा जन्म अमेरिका खण्डांतील पेरू देशांतील ॲण्डीज नांवाच्या पर्वतामध्यें झाला. जन्म झाल्याबरोबर जन्मतांच असलेलें माझें अशुद्धत्व धुऊन काढिल्यावर मला एका पेटाऱ्यांत बंदोबस्तानें घालून हिंदुस्थान देशाकडे पाठवून दिलें. कृष्णास ज्या-प्रमाणें जन्मतांच कैद झाली व त्यानंतर यमुना नदीचें उल्लंघन करावें लागलें तद्वतच माझें झालें. माझा जलप्रवास सुरक्षित झाला. परंतु माझा हिंदुस्थानास पाय लागल्या-बरोबर माझा जंगली, रानटी, डोंगरी अवतार उतरला व एतद्देशीय पोषाख मजवर चढविण्याची लोकांनीं चांगली तयारी केली. दैव चांगलें म्हणूनच मला धर्मशील, पवित्र, उदार, अशा अकबर बादशहाचा सहवास लाभला. मला जितके मुसलमान लोक जवळ करीत तितकेच हिंदु लोक आपलेपणानें वागवीत. अकबर बादशहाची प्रतिकृति आपल्या मुखावर लावून मी मोठ्या दिमाखानें संचार करूं लागलों. माझा आकार वाटोळा, लहान, सुटसुटीत असल्यामुळें प्रवासांत मला जागेची अडचण कधींहि भासली नाहीं. मला कोठेंहि मज्जाव नसे. माझ्याजवळ जातिभेद नसे. खाटिकाच्या कसाईखान्यापासून तों सोंवळ्या ब्राह्मणाच्या कनवटीपर्यंत माझा शिर-काव सहज व मोठ्या अपूर्वाईनें होत असे.

माझा जन्म होऊन पांच सहा वर्षें झालीं असतील नसतील तों मी एका म्हाताऱ्या कद्रूच्या हातांत सांपडलों. त्यानें एकदम माझ्या प्रवासप्रियतेवर गदा आणली. आणि माझ्यासारख्याच पांचशें इतर सवंगड्यांसह एका तिजोरींत त्यानें मला कोंडून टाकलें. दुःखांत सुख एवढेंच कीं, तो म्हातारा दररोज सकाळी संध्याकाळीं आम्हांस बाहेर काढून आम्ही बरोबर आहोंत कीं नाहीं, हें मोजून पुन्हां तिजोरीच्या तुरुंगांत टाकीत असे. अशा रीतीनें प्रवासास कांहीं दिवस आम्ही अंतरलों; परंतु पुन्हां आमचें दैव उगवलें.

एके अपरात्रीं एकदम आमच्या तुरुंगाच्या दारावर हातोड्याचे कोणी घाव घाल-तांना आम्हीं ऐकिलें. तिजोरी फोडून बाहेर पडतों न पडतों तोंच फोडणारा गृहस्थ कोणी बदमाष चोर नसून आमच्या म्हाताऱ्या मालकाचा वारस मुलगाच होता असें

आम्हांस आढळून आलें. आपले वडील मृत्युपंथास लागले आहेत असें पाहून सर्व चीजवस्त हस्तगत करून घेण्याच्या इच्छेनें त्यानें आपल्या उधळ्या स्वभावास अनुसरून एकदम अशा रीतीनें आम्हांस खुलें केलें. आमची एकदम ताटातूट केली. माझ्या इतर सवगड्यांचें काय झालें कोणास ठाऊक ! माझी मात्र त्या उधळ्या मुलानें एकदम एका वैद्याकडे रवानगी केली—वैद्याकडून काष्ठौषधिवाल्याकडे, त्याच्याकडून लांकुडतोड्याकडे, त्याच्याकडून कलालाकडे, कलालाकडून त्याच्या बायकोकडे व बायकोनें शेवटीं दक्षिणा म्हणून एका भटजीच्या हवालीं मला केलें.

अशा रीतीनें माझा प्रवास भिन्न भिन्न परिस्थितीत मोठ्या आनंदांत चालला होता. ह्या खिशांतून त्या खिशांत, त्या खिशांतून तिसऱ्या खिशांत, असा प्रवास होऊन अखेर त्या ब्राह्मणानें मात्र मी जुनापुराणा म्हणून देव्हाऱ्यांत ठेविलें आणि तो माझी रोज पूजा करूं लागला.

## १०. काल्पनिक संवाद

काल्पनिक संवाद लिहितांना खालीं दिलेल्या सूचना ध्यानात ठेवाव्या.

( १ ) विषयाची निवड योग्य असावी. म्हणजे ज्या विषयावर संवाद करतां येईल असा विषय असावा.

( २ ) ज्या प्रकारचा विषय असेल त्या प्रकारचीं त्याला योग्य माणसें असावीं. विषयावर संभाषण करण्याची त्याच्या अंगीं पात्रता असली पाहिजे.

( ३ ) विषयासंबंधीं अगोदर पूर्ण विचार करावा. त्याविषयीं सर्व मुद्दे व प्रमाणें लिहून ठेवावीं व तीं ज्या माणसांच्या तोंडात योग्य दिसतील त्यांच्या तोंडांत घालावीं.

( ४ ) विषयावरील मुद्दे कोणत्या तरी एका क्रमानें घ्यावे. एका मुद्द्यापासून दुसरा मुद्दा निघावा व तो संभाषणाच्या ओघांतच निघावा.

( ५ ) ज्या त्या मनुष्याच्या तोंडांत त्याच्या योग्यतेप्रमाणें भाषा घालावी. खेडेगावातील मनुष्य इतकासा शुद्ध बोलणार नाहीं. शिष्ट मनुष्याच्या तोंडांत भारदस्त भाषा असावी. भाषा साधी, सरळ व सोपी असावी.

( ६ ) प्रश्न व उत्तरें, पुढचें व मागील भाषण, यांमध्यें योग्य संबंध असावा. संभाषण एकंदरींत साधें, थोडक्यांत पण पूर्ण, मुद्देसूद, स्वाभाविक असें असावें.

खालीं संवाद दिले आहेत.

१. **“खेडेगांवांतील रहाणी चांगली, का शहरांतील रहाणी चांगली ?”** ह्या विषयावर दोन गृहस्थांचा संवाद.

देवबा :—काय पंत, आज कुणीकडे इकडे आमच्या ह्या खेडेगांवास आपले पाय लागले ?

दिनकरपंत :—होय, आलों इकडे यंदाच्या सुट्टींत.

देवबा :—तुम्हांला येथें अगदीं करमत नसेल ? येथें कांहीं तुमच्या शहरांतल्या सारखे टांगे, मोटारी, नाटकें, सिनेमा वगैरे कांहीं सांपडावयाचें नाही. येथें वाचावयास कांहीं मिळावयाचें नाहीं.

दिनकरपंत :–हो, असें झालें आहे खरें. येथें येऊन कांहीं फार दिवस झाले नाहींत तोंच मला कंटाळा आला आहे. प्रथम प्रथम कांही दिवस बरें वाटलें, परंतु आतां दिवस जात नाहींत.

देवबा :—आम्हांला सुद्धां तुमच्या शहरांत गेलें म्हणजे असें होतें ! कामासाठीं मी कधीं कधीं जातों. परंतु काम झालें म्हणजे कधीं एकदां बाहेर पडेन असें होऊन जातें. अहो ! शहरांतील काय तो गलिच्छपणा ? काय तो गोंगाट ? किती ती धूळ ? काय तो गिरण्यांचा धूर ? डोक्याला कधीं शांतता म्हणून मिळतच नाहीं. सदा रखरख, सदा आपली बजबजपुरी !

दिनकरपंत :—खेडेगांवांत राहाण्यानें हवापाणी उत्तम मिळतें ही गोष्ट खरी. ती तुम्हांला ईश्वरानें एक देणगीच दिली आहे. शहरांत त्या गोष्टी मिळत नाहींत. शहरांतील गोंगाट तेथें कांहीं दिवसांच्या रहाणीनें संवयीचा होतो. परंतु खेडेगांवांतील ह्या तुमच्या शांततेनें एखाद्यास वेडच लागावयाचें ! येथें कांहीं धंदा आहे का कांहीं हातपाय हलविण्यास सवड आहे ?

देवबा :—खेडेगांवांतील सृष्टीची शोभा अवर्णनीय असते. सहज कोणीकडेहि नजर टाका. डोळ्यांचें पारणेंच फिटतें ! सहज बागेंत फिरलां तरी मनाचें समाधान होईल.

दिनकरपंत :—व्यक्ति तितक्या प्रकृति हेंच खरें आहे. कोणाला ती रहाणी आवडेल, कोणाला खेडेगांवी रहाणी आवडेल. हें ज्याच्या त्याच्या मनावर राहील.

देवबा :—तें जरी खरें असले तरी कांही गोष्टी तुम्हीं कबूल केल्याच पाहिजेत. एक स्वच्छ हवापाणी. दुसरें सृष्टीचें सौंदर्य. तिसरी गोष्ट आमच्या येथील रहाणीमध्यें दुर्व्यसनें लागण्याचे प्रसंग कमी असतात. त्यांचीं साधनेंहि कमी असतात. त्यामुळें त्यांचा फलावहि शहरांतल्या इतका होत नाहीं., आमच्या येथील हवापाण्याचा परिणाम तुमच्या भुकेवर झाला आहे कीं नाहीं ? येथें आल्यापासून दोन घांस जास्त खातां कीं नाहीं ?

दिनकरपंत :—तें खरें आहे. तरी पण सध्यांच्या प्रगतीच्या काळांत खेडेगांवांत राहून चालणार कसे ? आयुष्याचा जास्तींत जास्ती फायदा करून घेतला पाहिजे. बरें, येतों मी.

२. (खालील संवाद हॅम्लेट नाटकांतील आहे. चंद्रसेन म्हणजे हॅम्लेट. हॅम्लेटच्या बापाचें भूत आपल्या खुनाची हकीकत हॅम्लेटास सांगत आहे. हा उतारा आगरकर यांनीं हॅम्लेट नाटकाचें जें भाषांतर केलें आहे त्यांतून घेतला आहे.)

(चंद्रसेन आणि समंध प्रवेश करितात)

चं०:—आतां तूं मला कोठें नेणार ? बोल; मी पुढें येणार नाहीं.

स०—ऐक तर.

चं०—ऐकतों.

स०—हा पहा वेळ अगदीं थोडा राहिला आहे. तेवढ्यांत तुला जें सांगावयाचें आहे तें सांगून फिरून त्या गंधकाच्या होरपळणाऱ्या जाळांत मला जाऊन पडलें पाहिजे.

चं०—अरेरे ! काय हे हाल !

स०—माझ्यासाठीं हळहळण्याचा हा प्रसंग नव्हे. मी जें गुह्य सांगणार आहें तिकडे नीट लक्ष दे.

चं०—बोल, मला तें दिलेंच पाहिजे.

स०—मीं सांगितल्यावर त्याचा सूडहि तुला घेतलाच पाहिजे.

चं०—काय ?

स०—मी तुझ्या बापाचा समंध; जन्मांतरीं केलेलीं पापें जळून खाक होऊन जाईपर्यंत दिवसा कांहीं न खातां विस्तवांत गढून असावें व रात्रीं बाहेर पडावें अशी मला शिक्षा झाली आहे. या पिशाच योनींतील यमयातना कितीतरी भयंकर; परंतु या कारागृहांतील एक गोष्ट देखील मांसशरीरी मनुष्यांच्या कानावर जातां कामा नये अशी आम्हांस सक्त ताकीद आहे ! असो, आजपर्यंत तूं आपल्या बापावर कधीं प्रीति केली असलीस तर मी जें सांगत आहें त्याच्याकडे चांगलें लक्ष दे.

चं०—हे देवा !

स०—त्याच्या अत्यंत घोर आणि अत्यंत दुष्ट खुनाबद्दल सूड घे.

चं०—खून ?

स०—अरे कसलाही खून असला तरी वाईटच; पण हा खून अत्यंत घोर आणि राक्षसी आहे !

चं०—लौकर सांग तो मला, म्हणजे ज्या अधमाधमानें तो केला असेल त्याच्यावर विजेच्या वेगानें जाऊन त्याच्या नरडीचा घोंट घेतों.

स०—या तुझ्या बोलण्यावरून तुझ्या हातून कांहीं होईलसें वाटतें. ही कामगिरी तुझ्या हातून झाली नाहीं तर तुला मी आपल्या पोटचा समजणार नाहीं. असो, चंद्रसेना, आतां ऐक. त्या चोरानें अशी कंडी पसरून दिली आहे कीं मी आपल्या बागेंत निजलों असतां साप चाऊन मेलों; निदान सगळ्या बलभद्राच्या लोकांचा तरी माझ्या मरणासंबंधानें असा खोटा समज झाला आहे. परंतु ज्या सर्पानें तुझ्या बापाचा जीव घेतला तो सर्प सध्यां बलभद्राच्या गादीचा मालक आहे.

चं०—तरी मला वाटलेंच ! काका !

स०—नित्याप्रमाणें मी आपल्या बागेंत निजलों असतां, तुझा दुष्ट काका एका कुपींत कांहीं विषारी वल्लीचा रस घेऊन आला, आणि मला गाढ निद्रा लागली आहे असें पाहून तें कालकूट द्रव्य त्यानें माझ्या कानांत ओतलें. थोडावेळ झाला नाहीं तों तें माझ्या सर्वांगांत भिनलें आणि ज्याप्रमाणें तापलेल्या दुधांत ताकाचा शितोडा टाकल्याबरोबर तें तत्काळ नासून जाऊन त्याच्या गठळ्या बनतात, त्याप्रमाणें विषानें माझें शुद्ध रक्त जागच्या जागीं गोठून जाऊन त्याच्या गांठी झाल्या आणि माझ्या एकूणएक शिरेंतला चिवटपणा नाहींसा होऊन अंग ताठरलें आणि त्यावरील नेहमींच्या तुळतुळीत कातडीला चिरा पडून तीवर एक घाणेरडा पापोद्रा आला.

याप्रमाणें मी निजलों असतां माझ्या भावाच्या हातानें मी आपल्या जीविताला, राज्याला आणि राणीला अंतरलों. अरे, मरतेसमयीं पापक्षालनासाठीं तीर्थोदक घेण्याला देखील त्यानें मला अवकाश मिळूं दिला नाहीं ! हरएक वस्तु जेथल्या तेथें टाकून मला जावें लागलें. किती घोर कृत्य हें ! केवढी निर्घृण महत्त्वाकांक्षा ! कोण राक्षसी कामवासना ! तूं खरोखरीच माझ्या बीजाचा असशील तर बळभद्राच्या राज-शय्येवर असा निंद्य व्यभिचार होऊं देणार नाहींस. इतकें झालें तरी चंद्रसेना, तुला एक गोष्ट सांगून ठेवितों ती ही कीं तूं आपल्या आईचा सूड घेण्यासाठीं कांहींएक करूं नको. तिचें मन तिला खाऊन खाऊन मरूं दे. तूं तिच्यावर आपला हात उचलूं नको. घेतों तर मी आतां तुझा निरोप. काजव्यांचा प्रकाश फिक्का दिसूं लागला यावरून सूर्य क्षितिजाच्या निकट आला आहे यांत शंका नाहीं. ईश्वर तुझे कल्याण करो. जातों. मला विसरूं नको.

( समंध जातो )

चं०—हे आकाशस्थ, पातालस्थ आणि भूतलस्थ अनंत जीवांनो, काय अनर्थ हा ! हृदया, असें कातर होऊं नको; थोडा धीर धर, स्नायूंनो, एका क्षणांत असे जीर्ण आणि दुर्बल होऊ नका; क्षणभर मला सावरून धरा. तुला विसरूं नको ? गरीब पिशाचा, हें डोकें जाग्यावर आहे तोंपर्यंत तुला विसरेन काय ? तुझी आठवण ठेवूं ! लहानपणापासून अभ्यासानें आणि परिश्रमानें या मेंदूंत सांठविलेली एकूणएक गोष्ट काढून टाकून तुला जागा करीन ! कोण क्रूर हडळी ही ! केवढा अधम चाण्डाळ हा ! वरून गोगलगाईसारखी गरीबी दाखवून पोटांत लोक रामोशी कसे असतात हें आज चांगलें प्रत्ययास आलें. निदान बळभद्रदेशांत तरी अशा चोरांची वाण नाहीं. काकासाहेब, ठीक आहे. काय तें ? " देव कल्याण करो. मला विसरूं नको ? " हं ! ही शपथ घेतों. घेणारच घेणार.

## अभ्यास

१. खालीं कांही काल्पनिक आत्मचरित्राचे आराखडे दिले आहेत, ते पूर्ण लिहा.

नदी—माझा जन्म—उगम. डोंगरांतील धबधबे. लहानसा प्रवाह. उपनद्या. मैदाना-वरील प्रवाह. संथ प्रवाह. तीरावरील सुपीक प्रदेश. कालवे व पाट. कांठावरील गांवें व शहरें. शहरांतील घाण. नावा व गलबतें. माझीं मुखें.

मेंढपाळाचा कुत्रा—आमचें लहानपण. संवयी. मेंढपाळच्या खुणा व शब्द. प्रत्येक मेंढीची ओळख. मेंढपाळास जें हवें तें आणून देणें. मेंढ्या गोळा करणें. संकटें नाहींशीं करणें. रात्रीं पहारा करणें. मेंढ्यांशीं एकरूप, समरस होणें. मेंढ्यांना चरावयास नेणें. उघड्या हवेंतील सुखें.

मुंगी—आमच्या लहानपणचीं सुखें. आमच्या संवयी. तोंडांत खाद्य घेणें. संग्रह करणें. उद्योगप्रियता. पुढच्या संकट काळासाठीं तरतूद करणें. आमच्या जाती.

हत्ती—जंगलांतील दिवस. कसा मी पकडला गेलों. नंतर माझे झालेले हाल. मला दिलेलें शिक्षण. नंतर मला दिलेलें काम. लांकडें ओढणें. नंतर मी राजाच्या हातीं गेलों. तेथील माझें चरित्र. माझें खाद्य. एखाद्या मिरवणुकीचें वर्णन.

२. खालील काल्पनिक संवाद लिहा :—

१. नाटकें पहावीं कीं नाही ? २. चहा प्यावा की नाहीं ? ३. स्त्रीशिक्षण. ४. धार्मिक शिक्षण असावें किंवा नाहीं ? ५. रेल्वे प्रवास चांगला किंवा मोटार-प्रवास चांगला ? ६. सत्याचा जय नेहमीं होतो किंवा नाहीं ?

---

## ११. मराठींतील कांहीं गद्यलेखनप्रकार

विद्यार्थ्यांनीं निरनिराळ्या विषयांवर निबंध कसे लिहावे यासंबंधीं सविस्तर विवेचन येथवर केले. विद्यार्थ्यांची दृष्टि वाङ्मयापेक्षां भाषा कमाविण्याकडे आणि आपले विचार साध्या व सरळ भाषेत मांडण्याकडे विशेष असली पाहिजे. ही प्राथमिक तयारी झाली म्हणजे गद्यलेखनाचे वाङ्मयांत जे इतर प्रकार दृष्टीस पडतात त्यांचें पुढेमागें अनुकरण करण्यास त्यांना धीर येईल. गद्यलेखनामध्यें कादंबरी, नाटक, लघुकथा, लघुनिबंध व नाट्यछटा हे प्रमुख प्रकार आहेत. त्यांपैकीं कादंबरी आणि नाटक हे बऱ्याच वरच्या दर्जाचे असल्यामुळें त्यासंबंधीं विशेष माहिती येथें दिली नाहीं. ही प्राथमिक तयारी झाल्यानंतर विद्यार्थ्यांना बाकीच्या वाङ्मयप्रकारांत रचना करणें आवडेल. त्यासंबंधीं थोडीशी माहिती पुढें दिली आहे. तथापि याप्रकारचे लेखन करावयाचें असल्यास प्रसिद्ध लेखकांच्या वाङ्मयकृति वाचणें हाच त्या पद्धतींचा अभ्यास करण्याचा राजमार्ग

आहे. वाचनाच्या योगानें त्या त्या वाङ्मयप्रकाराच्या तंत्राची माहिती होते, भाषासौंदर्याची बरोबर कल्पना येते आणि नामवंत लेखकाच्या विचाराशीं परिचय घडतो. हे वाचन वाढविणें म्हणजेच त्या त्या प्रकाराचा अभ्यास करणे होय. अभ्यासाच्या सदराखालीं दिलेल्या पुस्तकापैकीं काहीं पुस्तके वाचण्याचा विद्यार्थ्यांनीं प्रयत्न करावा.

## लघुकथा

लघुकथा हा वाङ्मयप्रकार म्हटला तर जुना, म्हटला तर नवीन असा आहे. मानवी समाजाच्या बाल्यावस्थेंत सुद्धां त्याचे अस्तित्व नाकबूल करतां यावयाचें नाहीं. संस्कृतमधील अत्यंत प्राचीन असा ग्रंथ जो ऋग्वेद त्यांत अनेक कथा उल्लेखिलेल्या आहेत. महाभारतरामायणादि महाकाव्यें आणि पुराणें हीं तर कथांचीं आगरेच आहेत. तथापि वाङ्मयप्रकार या नात्यानें लघुकथा अर्वाचीन आहेत. इंग्रजी वाङ्मयांत सुद्धां हा वाङ्मयप्रकार गेल्या शतकाच्या अखेरी अखेरीस विशेष रूढ झाला. अमेरिकन लेखक पो हा या वाङ्मयप्रकाराचा जनक म्हणून समजला जातो. तो इ. स. १८४९ मध्यें मृत्यु पावला; आणि त्याच्यानंतर झालेल्या लेखकानीं त्याच्या सांप्रदायानुसार लघुकथा लिहून कादंबरी किंवा नाटक याच्याप्रमाणे लघुकथेला वाङ्मयात स्वतंत्र स्थान मिळवून दिलें.

लघुकथा ही लघु म्हणजे लहान असली पाहिजे हे उघड आहे. एका वेळेला सहज वाचता येईल अशी स्थूल मर्यादा कित्येक टीकाकारानीं घातली आहे. लघुकथेचे हें बाह्यलक्षण झाले. लघुकथेमध्ये एक मध्यवर्ति कल्पना असते आणि तिचा विस्तार अशा रीतीनें करावयाचा कीं, शेवटीं वाचकाच्या मनावर एकच ठसा किंवा संस्कार उमटावा. एखादा प्रसग, भावना किवा विचार यावर लघुकथेची उभारणी झालेली असते. कादंबरीमध्ये प्रसंग, पात्रे किवा भावना यांची विविधता असते. लघुकथेमध्ये एकाच भावनेवर लेखक केंद्रीभूत झालेला असतो. कादंबरीप्रमाणें लघुकथेलाहि कथानक असते, परंतु ह्या कथानकाची गुंफण एकाच कल्पनेभोवतीं झालेली असते.

कादंबरी किंवा नाटक यांच्या कथानकातील पात्रांचें स्वभावरेखन बरेंच विस्तृत असतें. लघुकथालेखकाला संपूर्ण किंवा विस्तृत स्वभावरेखन करण्यास

वाव नसतो. मध्यवर्ति कल्पनेला जेवढें आवश्यक तेवढ्याच स्वभावातील भागाचें दिग्दर्शन लघुकथेंत आलें म्हणजे त्याचें कार्य संपतें.

आधुनिक लघुकथालेखक संभाषणाला फार महत्त्व देतो. जुन्या गोष्टीमध्यें पुष्कळवेळां सरळ कथन असतें. संभाषण आलेंच तर तें अगदीं अपरिहार्य ठिकाणींच येते. कथानकाचें उद्घाटन आणि स्वभावरेखन यांना संभाषणाचा फार उपयोग होतो. सभापणांत पात्रानुसार भाषा वापरण्यास फार कौशल्य लागते. लघुकथेंत हे संभापण मंदगतीचें किंवा फाजील लाबलचक असून चालत नाहीं. वीज एक निमिषार्धच तळपते पण तेवढ्यांत भूपृष्ठभाग आपल्या नजरेत भरतो त्याप्रमाणें संभाषणांतील एकेका वाक्याने पात्राच्या स्वभावावर प्रकाश पाडावा लागतो.

लघुकथेचा आरंभ आणि शेवट कौशल्यपूर्ण केल्यानें लघुकथेची सरसता वाढते. कादंबरी किंवा नाटक यांमध्ये कथानकाचे धागे वाचकाला हळूहळू कळूं लागतात. लघुकथेचा आरंभ इतका आकर्षक करावा कीं पहिल्या वाक्या-पासूनच वाचक कथानकांत गुंतून रहावा. तसेंच शेवटहि वाचकाच्या कल्पना-शक्तीला चालना देणारा असावा. कथानकाची सारवासारव करून पुण्याचा प्रभाव किंवा पापाचे प्रायश्चित्त दाखविणारा नसावा. कित्येक वेळा अगदीं अनपेक्षित असा शेवट करणेहि कलापूर्ण असतें.

**अभ्यास** :—खालील प्रसिद्ध लघुकथालेखकांच्या लघुकथा वाचा.

हरि नारायण आपटे—स्फुट गोष्टी भाग १ ते ४
दिवाकर कृष्ण—समाधि व इतर गोष्टी.
कॅ. लिमये—शकूचा भाऊ व इतर गोष्टी.
प्रो. फडके—कथासंग्रह.
वि. स. खांडेकर—जीवनकला, नवमल्लिका, दत्तक व इतर गोष्टी.
य. गो. जोशी—पुनर्भेट.
कु. रघुवीर—हृदय.

## लघुनिबंध

निबंध हा शब्द आपण फार व्यापक अर्थानें योजतों. कोणत्याहि विषयावर जो स्फुट लेख लिहितात त्याला आपण निबंध म्हणतों. याची व्याप्ति चारपांच

पानांपासून शंभर पानांपर्यंत सुद्धां असूं शकते आणि कोणत्याहि विषयावर असें लेखन करतां येतें. परंतु ज्याला इंग्लिशमध्ये literary essay असे म्हणतात त्याचें स्वरूप अशा त्रोटक लेखापेक्षां अगदीं निराळे असते. इंग्रजी-मध्यें अशा तऱ्हेच्या लघुनिबंधाचें वाङ्मय फार आहे. या वाङ्मयप्रकाराला मराठीमध्ये नुकती कोठे सुरवात झाली आहे; पण हा वाङ्मयप्रकार लौकरच वाढीस लागण्याची सुचिन्हें दिसून येत आहेत.

अठराव्या शतकातील लेखक ॲडिसन आणि स्टील यांनीं या लेखनप्रकाराला चालना दिली. नित्याच्या परिचयाचेच विषय घ्यावयाचे; त्याची एकाद दुसरीच बाजू वाचकापुढें माडावयाची; पण ती माडीत असताना लेखन मनोरंजक करण्याकडे विशेष लक्ष द्यावयाचे. भाषा खुलवून लिहावयाची; शक्य तेथे विनोद, उपहास, व्याजोक्ति यांचा उपयोग करावयाचा. विषयविवेचन करता करतां एखादी मनोरंजक दंतकथा, महदाख्यायिका किंवा लोककथा सांगाव-याची; एकंदरींत लेखक वाचकाशीं गुजगोष्टी करीत आहे असें भासवावयाचे असा हा निबधाचा प्रकार आहे. विषय कोणता कां असेना, भावगीतांत ज्याप्रमाणे कवीचें व्यक्तित्व प्रतिबिंबित झालेले आढळतें, तसे लेखकाच्या मनोगत व्यापाराचें चित्र त्यांत उमटलेले दिसते. ज्ञान देणे किंवा मतप्रचार करणे किंवा उपदेश करणें हा हेतु नसून एखाद्या विषयासंबंधीं आपल्याला काय वाटते हे मित्रत्वाच्या नात्याने गप्पागोष्टी करीत असता सागत आहों अशी लेखकाची भूमिका असते. त्यामुळेंच अशा निबंधाची भाषाशैली संभाषणाच्या जवळ जवळ असते. वाचकाला आपल्या विश्वासात घेऊन लेखक आपले विचार मांडीत असतो.

साध्या विषयांतून मोठा आशय सहज लीलेनें व वाचकाला फारसा शीण न देतां लेखक त्याच्या गळीं उतरवीत असतो. संगीत, हास्य, वेषभूषा, पाऊस, वारा इत्यादि विषय आपल्या अगदीं परिचयाचे असतात. अशावेळीं आपल्याहि मनांत एकाद दुसरा पुसट विचार किंवा भावना येऊन जाते. तीच शब्दात माडण्याचें कार्य लघुनिबंधाचा लेखक करीत असतो आणि हे करताना आपले स्वतःचे अनुभव, गोड आठवणी यांचा सर्रास उपयोग करतो; यामुळे या लेख-नांत जिव्हाळा आणि आपुलकी अधिक येते.

**अभ्यास**:—पुढील पुस्तकें वाचा:—

प्रो. फडके—गुजगोष्टी. वि. स. खांडेकर—वायुलहरी आणि चांदण्यांत. अनंत काणेकर—पिकलीं पानें. आणि तुटलेले तारे. वि. ल. बरवे—लघुनिबंधसंग्रह.

**नाट्यछटा**

नाट्यछटा हा एक नवीनच वाङ्मयप्रकार अलीकडे मराठींत आला आहे. इग्रजी, सस्कृत किंवा प्राचीन मराठी यामध्ये हा वाङ्मयप्रकार आढळत नाहीं. नाट्यछटा हे स्वगतभाषणासारखें असतें. एखादा मनोवेधक प्रसंग कल्पून त्या प्रसंगामध्ये सापडलेल्या एका व्यक्तीच्या तोंडून त्याच्या भावना वदवावयाच्या आणि हे करीत असतानाच मानवी स्वभावातील बारीक सारीक दोषांचें आविष्करण करावयाचें किंवा जगाच्या व्यवहारात चित्तवेधक घटना कशा घडून येतात हे सांगावयाचें हा नाट्यछटाचा प्रधान हेतु असतो. दोघांमधील चाललेलें सभाषण परंतु वाचकांना ते एकाच व्यक्तीकरवीं कळवावयाचें हे एक नाट्यछटेचे वैशिष्ट्य आहे. संस्कृत नाटकामध्यें आकाश-भाषित म्हणून एक संभाषण-प्रकार आहे त्याचे स्वरूपहि असेंच आहे. नाट्यछटा ही फार दीर्घ असत नाहीं. मूलतः नाट्यछटा हे एक स्वगतभाषण असल्यामुळें नाट्यछटा थोडक्यातच असली पाहिजे. मनुष्य आपल्या स्वतःशीं फार वेळ बोलत बसत नाहीं. स्वगत-भाषणाचा संबंध नाटकाच्या संविधानकाशी येतो. परंतु नाट्यछटा ही स्वयंपूर्ण असते. थोडक्यांत अशी स्वयंपूर्णता आणणे ही अवघड कला आहे. नाट्यछटेत ग्रथित करावयाचा विचार किंवा भावना वाचकाला कळली कीं तेथेंच ती संपूर्ण झाली पाहिजे आणि हा विचार किवा भावना वाचकांनाहि लौकरच कळविली पाहिजे. दीर्घरचना नाट्यछटेचे सौदर्य नाहींसें करते. मनुष्यस्वभावातील विरोधाचें दर्शन हा नाट्यछटेचा पुष्कळवेळां विषय असतो. मानवी मनाच्या दुर्बलतेचा मृदु उपहास नाट्यछटेनें चांगला साधता येतो.

नाट्यछटेच्या भाषेमध्यें बोलीभाषेचें ज्यास्तींत ज्यास्त अनुकरण करतात. बोलताना आपण लाबलचक वाक्य किवा संस्कृतप्रचुर शब्द सहसा वापरीत नाही. तसेंच आपलीं वाक्यें सुद्धा त्रुटित असतात. अर्थबोध होण्याकरिता जेवढा वाक्याश आवश्यक असतो तेवढाच उच्चारतों. या सर्व विशेषांचें नाट्यछटेंत अनुकरण करणे आवश्यक आहे.

**अभ्यास**:—‘ दिवाकर यांच्या नाट्यछटा ’ हें पुस्तक वाचा.

# अर्वाचीन मराठींत येणाऱ्या नव्या गोष्टी

## लिपि-सुधारणा

सध्यां लेखनांत किंवा मुद्रणात आपण जी लिपि वापरतों त्यास देवनागरी लिपि असें म्हणतात. अ आ इ इत्यादि स्वर आणि क् ख् ग् इत्यादि व्यञ्जने मिळून आपली वर्णमाला सिद्ध होते. हे वर्ण ज्या खुणानी लिहून दाखवितात त्यास लिपि असें म्हणतात. देवनागरी वर्णमाला ही शास्त्रीय पायावर उभारलेली आहे. स्वरांचीं आणि व्यञ्जनांचीं उच्चारस्थानें फार काळजीपूर्वक निश्चित केलीं आहेत. ही वर्णमाला ज्या खुणांनीं किंवा अक्षरांनीं आपण लिहून काढतों तीं अक्षरे लिहिण्याची पद्धत मुद्रणाच्या सोयी-करिता बदलावी असा प्रयत्न सध्यां चालू आहे. इंग्रजी लिपीमध्ये अक्षरें फक्त २६ च आहेत. त्यामुळें मुद्रणालयांतील टाइपाची संख्या २६ ठेवून इंग्रजी पुस्तक छापलें जातें. पण मराठीमध्ये १५० ते २०० टाईप करावे लागतात. देवनागरी अक्षराना डोक्यावर रेघ असल्यामुळे छापण्याच्या अडचणींत भर पडते. जोडाक्षर लिहिण्याच्या विशिष्ट पद्धतीमुळेंहि या अडचणी दुणावतात. मुद्रणसुलभता यावी आणि थोड्या खर्चांत मराठींतील पुस्तकें छापता यावींत म्हणून लिपिसुधारणेची आवश्यकता भासूं लागते. लिपिसुधारकाची विचारसरणी पुढीलप्रमाणें आहे.

( १ ) **अ, इ, ई, उ, ऊ, ऋ, ए, ऐ,** हीं अक्षरें पृथक् पृथक् असल्यामुळे तितके टाइप ज्यास्त लागतात. त्याऐवजीं अची बाराखडी वापरली तर टाइपांची बचत होते. **आ, ओ, औ, अं, अः** हीं अक्षरं आपण अच्या बारा-खडीप्रमाणें सध्या सुद्धां काढतोंच. तेव्हा **अि, अी, अु, अू**, **अे** आणि **अै** ही त्याच पद्धतीनें लिहिण्यास व छापण्यास सुरवात झाली आहे.

( २ ) मराठींत जोडाक्षरें लिहिण्याची पद्धतहि निरनिराळी असल्यामुळे टाइपांची संख्या वाढते. त्याऐवजीं एका अक्षरापुढें दुसरे अक्षर ठेवण्याची पद्धत स्वीकारली तर सुमारें ४०।५० टाईप कमी होतील. उदा०—

क् + त = क्त च्या ऐवजीं क्त
क् + व = क्व „ „ क्व
क् + का क्का „ „ क्का
द् + य द्य „ „ द्य
क् + ष = क्ष „ „ क्ष

जोडाक्षरातील अक्षरें आपण ज्या क्रमानें उच्चारतों त्याच क्रमानें लिहीत गेल्यास उच्चारसुलभताहि साधते.

( ३ ) **क, फ, र** आणि **ल,** हीं अक्षरें अनुक्रमे **का, फा, ा, ला** अशीं कानायुक्त लिहावीत. या अक्षरापासून जोडाक्षर सिद्ध करावयाचे असल्यास काना काढून त्यापुढे दुसरें ठेवावें म्हणजे मुद्रणसुलभतेप्रमाणें उच्चारसुलभताहि येईल. तसेच रकारयुक्त जोडाक्षरें मराठींत निरनिराळ्या प्रकारें लिहितात. उदाहरणार्थ **क्र, ग्र, ट्र, त्र, प्र** इत्यादि. त्याऐवजीं कानायुक्त र वापरला तर हींच जोडाक्षरें **क्‍ा, ग्‍ा, ट्‍ा, त्‍ा, प्‍ा** अशीं लिहितां येतील आणि काहीं टाईप वाचतील.

लिपिसुधारणेचे प्रयत्न सध्यां विविध चालू आहेत. मुद्रणसुलभता हें तिचें ध्येय आहे.

मुद्रणसुलभता आली म्हणजे पुस्तकें थोड्या खर्चांत छापतां येतील. सध्यां जे २०० टाईप लागतात त्याऐवजीं ६० टाईपांत काम भागेल. ‘अ’ची बाराखडी अलीकडे काहीं लेखक वापरूं लागले आहेत. या सुधारणेमुळे देवनागरी लिपीचें सौंदर्य नष्ट होईल अशी भीति मात्र कित्येकांना वाटते. परंतु संवयीमुळे नवीन लिपिहि सुंदर वाटूं लागेल असें या आक्षेपाला उत्तर देता येईल. ‘अ’ ची बाराखडी **‘केसरी’ ‘ज्ञानप्रकाश’** इत्यादि वर्तमानपत्रांनीं स्वीकारली आहे. बडोदें संस्थानात तर **‘अ’** ची बाराखडीच वापरली पाहिजे असा हुजूर-हुकूमच निघाला आहे.

मुद्रणसुलभतेप्रमाणे टंकयंत्राची ( टाइप-रायटरची ) सोय पाहिली पाहिजे. पुष्कळ अक्षरचिन्हें असल्यास हीं यंत्रें तयार करणें फार खर्चाचें काम होईल. कांहीं कांहीं टंकयंत्रांत कानायुक्त अक्षरे आणि जोडाक्षराची नवीन पद्धत स्वीकारली आहे.

# भाषासुधारणा

मुसलमानाचा दक्षिणेत चौदाव्या शतकांत प्रवेश झाला व महाराष्ट्रांत त्यांनीं आपल्या पातशाह्या स्थापिल्या. अरबी व फार्शी ही राजकर्त्यांची भाषा असल्या-मुळें राजकारणांत तिचा प्रवेश झाला. त्यामुळे राजकीय व्यवहाराला आवश्यक असणारे कितीतरी शब्द तत्कालीन मराठींत रूढ झाले. जिल्हा, इलाखा, वसूल, इन्साफ, कायदा, खजिना, कैदी, खून, जमीन, जामीन, साहेब, तक्रार, फिर्याद, असे कितीतरी शब्द मराठींत कायमचें ठाणें देऊन बसले. दोन संस्कृति एकत्र आल्या म्हणजे असे शब्द येणे हे स्वाभाविक आहे. ज्ञानेश्वर–नामदेवकालीन मराठी वाङ्मयांत परकीय शब्द बहुतांशीं सापडत नाहींत. पण तेच एकनाथकालीन मराठींत या परकीय शब्दांचे प्रमाण वाढलेले दिसून येतें. मराठी भाषेत घुसलेले हे परकीय शब्द काढून त्याऐवजीं शुद्ध संस्कृतशब्द आणण्याचा पहिला प्रयत्न छत्रपति शिवाजी महाराज यांनीं राजव्यवहारकोश तयार करवून केला. तथापि सामान्य व्यवहारांत आलेले शेकडों शब्द लोकाच्या तोंडीं राहिले ते राहिलेच.

इंग्रजी अमदानी सुरू झाल्यानंतर मराठींत अनेक इंग्रजी शब्द येऊं लागले. नवीन नवीन कल्पना यावयाला लागल्या आणि मूळभाषेंत त्या व्यक्त करण्यास शब्द नसले म्हणजे परकीय शब्दांच्या साहाय्यानेच व्यवहार करावा लागतो. भाषेकरितां व्यवहार अडून राहत नाहीं. परंतु कित्येक वेळां नवीन भाषा ही राजकर्त्यांची भाषा म्हणून त्या भाषेचें वर्चस्व लोकमनावर विशेषतः सुशिक्षित मनावर इतकें पडतें कीं आपल्या भाषेतील स्वकीय शब्द सोडून तो परकीय शब्द फॅशन म्हणून स्वीकारतो. त्यामुळे भाषेचें मूळचें स्वरूप जाऊन तिला मिश्रस्वरूप प्राप्त होते.

सध्यां या परकीय शब्दांचें प्राबल्य कमी करण्याचे प्रयत्न कोठेकोठे चालू आहेत. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं हे शब्द वापरण्याच्या छंदाविरुद्ध चळवळ केली. प्रा. माधवराव पटवर्धन आणि बॅ. सावरकर हे सध्या फार्शी शब्द आणि इंग्रजी शब्द काढून टाकण्याच्या प्रयत्नाला लागलेले आहेत.

भाषासुधारणे हा प्रश्न कांहींसा वादग्रस्त आहे. परकीय शब्दांचें प्राचुर्य झालें तर मूळ भाषेचें सौभाग्य नष्ट होतें हें म्हणणें तितकेंसें शास्त्रास धरून नाहीं. जे परकीय शब्द मराठीनें आत्मसात् केले आहेत ते काढून टाकणें आवश्यक आहे का? ते शब्द आज कित्येक वर्षे लोकांनीं वापरले आहेत; कांहीं शब्द अर्थच्छटा व्यक्त करण्यास चांगले उपयोगी पडतात; तर कांहीं शब्दांऐवजीं शुद्ध संस्कृत किंवा मराठी शब्द वापरले तर भाषा दुर्बोध होण्याचाच संभव अधिक. कोणत्याहि भाषेत परकीय भाषांतून कांहीं ना कांहीं कारणानीं आलेले शब्द सांपडतातच; तेव्हां ज्या परकीय शब्दांचे अंतर्बाह्य मराठीकरण झालेलें आहे ते शब्द मराठीची शब्दसंपत्ति वाढवितात, तेव्हां त्याना आपण आश्रय द्यावा. परंतु नवीन शब्दांच्या आक्रमणाबद्दल मात्र आपण दक्ष राहावें असें कित्येक प्रतिपादतात. मराठींत सर्वांच्या परिचयाचे आणि बद्धमूल झालेले कांहीं फार्शी शब्द आहेत. उदा.—अखेर, इरादा, उमेद, ऐपत, ऐषआराम, कर्ज, कायम. कायदा, किंमत, किल्ला, खर्च, खात्री, खून, गर्दी, गरिबी, गुन्हा, चेहरा, जमीन, जागा वगैरे. या शब्दांचे पर्याय मराठींत आणण्याचा अट्टाहास केल्यानें भाषेला दुर्बोधत्व येईल, किंवा शब्दाच्या पाठीमागे ज्या कल्पना असतात त्या सर्वच्या सर्व कल्पना नवीन शब्दांनीं व्यक्त होतीलच असें नाहीं. अशा तऱ्हेच्या अडचणी येतील असें आक्षेपकांचे म्हणणे आहे.

आपल्या भाषेंतील शब्द कायम टिकविणें हें तत्त्व एकदां मान्य केलें म्हणजे त्यांचा उपयोग मोठ्या प्रमाणावर करणें ओघानेच येतें. ज्या ठिकाणीं भाषेला दुर्बोधत्व येत नाहीं, ज्या ठिकाणीं अर्थच्छटेचा प्रश्न उद्भवत नाहीं किंवा ज्या ठिकाणीं भाषाशैलीच्या सहजतेला बाध येण्याचा संभव नाहीं अशा ठिकाणीं परकीय आणि स्वकीय शब्द असल्यास स्वकीय शब्दाचाच अवलंब करावा. परंतु परकीय आत्मसात् झालेले शब्द वापरल्याने भाषेला सुबोधत्व येत असेल तर, व निरनिराळ्या अर्थांच्या च्छटा त्यांनीं दाखविल्या जात असतील तर ते परकीय शब्द वापरण्याला हरकत नाहीं हेंहि म्हणणें संयुक्तिक आहे.

इंग्रजी भाषेंतील शब्द मुख्यतः नवीन कल्पनांमुळें मराठींत आले आहेत. टेबल, कोट, शर्ट, सायकल, मोटार, ट्रॅम, कलेक्टर, जज, पोलीस, मास्तर,

फोनो, रेडिओ, कपाट इत्यादि. लोकव्यवहार हा थांबत नाहीं. स्वभाषेंत शब्द नसल्यास दुसरीकडून उसनवारी करून कां होईना पण हा व्यवहार चालू राहतो. पण या परकीय शब्दांना आपल्या भाषेंत साधे सुटसुटीत असे पर्याय शब्द सांपडले कीं त्यांचा स्वीकार मात्र तत्परतेनें झाला पाहिजे. इंग्रजी शब्दांना मराठी पर्याय शब्द निर्माण होत आहेत आणि त्यांपैकीं कितीतरी आज रूढ झालेले आहेत. सहानुभूति ( Sympathy ), वृत्तपत्रें (Newspapers), विधिमंडळ ( Legislative Body ), नगरपालिका ( Municipality ), आगगाडी ( Railway ), बोलपट ( Talkies ), भावगीत (Lyrical poetry) पाणबुडी ( Submarine ), फटफटी ( Motor cycle ), लोकशाही ( Democracy ), संपादक ( Editor ), इत्यादि. नवीन कल्पनांना अनुसरून नवीन शब्द निर्माण करण्याची शक्ति मराठींत संस्कृतच्या साहाय्यानें आली आहे. तिचा योग्य उपयोग करून मराठींतील शब्दांचें कोठार समृद्ध करणें आणि पर्यायानें भाषेचें वैभव वाढविणें हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे. या कर्तव्याची जाणीव ठेवून अशा तऱ्हेचे प्रयत्न अर्वाचीन मराठींत चालू असल्यामुळे नित्य नवीन नवीन शब्दांची भर मराठींत पडत आहे तिकडे प्रत्येक भाषाभ्यासकानें लक्ष पुरविलें पाहिजे.

## एकेरी क्रियापदें

मराठी भाषेची मोडणी पाहिली तर तीमध्यें संयुक्त क्रियापदे फार असलेलीं दृष्टोत्पत्तीस येतात. उदाहरणार्थ—खालील क्रियापदें पहा: संमति देणें, उत्तेजन देणें, शाप देणें, प्रचार करणें, निषेध करणे, आजारी पडणें, शोक करणें, आनंद होणें, दुःख होणें, टीका करणें इत्यादि. या संयुक्त क्रियापदांच्या ऐवजीं एकेरी क्रियापदें वापरण्याची प्रथा सुरू केली तर मराठींतील हें क्रियापद-दारिद्य जाईल. हिंदुस्थानांतील इतर देशी भाषांतूनसुद्धां अशा तऱ्हेचें क्रियापददारिद्य आहे. संस्कृतमध्यें नामापासून क्रियापदें बनविण्याची सोय आहे आणि त्याच पद्धतीचा अवलंब केला तर देशी भाषांतील संयुक्त क्रियापदांच्या जागीं एकेरी क्रियापदें घालतां येतील.

प्रतिकार करणें, स्वीकार करणे, धिक्कार करणें, उत्तर देणें, आमंत्रण देणें, या संयुक्त क्रियापदांच्या जागीं अनुक्रमे प्रतिकारणे, स्वीकारणें, धिक्कारणें, उत्तरणे, आमंत्रणे अशीं एकेरी क्रियापदे वापरतां येतील. यांपैकीं कांहीं एकेरी क्रियापदें आतां रूढ झालीं आहेत. परंतु या प्रथेचा स्वीकार अधिक प्रमाणांत झाला पाहिजे. प्रसिद्ध कादंबरीकार ह. ना. आपटे यांनीं 'उत्तरणें (उत्तरला) हे एकेरी क्रियापद वापरले त्यावेळीं त्याची थोड्याफार प्रमाणांत चेष्टाहि झाली. परंतु तेच क्रियापद आतां प्रचारांत येऊ लागले आहे. अलिकडे रा. सावरकर यांनीं आपल्या लेखनात अशा तऱ्हेचीं क्रियापदे वापरण्याची पद्धत सुरू केली आहे, आणि त्यांपैकीं कांहीं रूढहि होत आहेत.

जुन्या मराठी कवितेत अशीं एकेरी क्रियापदे येतात तेव्हां ही पद्धत मराठीला अगदीं अपरिचित आहे असे म्हणतां येणार नाहीं. ज्ञानेश्वरीमध्यें 'अवधारीं, निरूपिति' हीं क्रियापदे तर वारंवार येतात. मुक्तेश्वरानें 'जरासंधें राज्यासनीं अभिषेकिलें सहदेवा' असा एकेरी क्रियापदाचा प्रयोग केला आहे. प्रार्थणे, वंदणे, आलिंगणे हीं क्रियापदे निरनिराळ्या काळांत आणि त्यापासून बनलेल्या धातुसाधिताच्या रूपांत मोरोपंतानींहि उपयोगांत आणिलीं आहेत.

खेड्यापाड्यांतील लोकांच्या बोलीमध्ये अशा एकेरी क्रियापदांचीं रूपें पुष्कळच आढळतात. 'शेती पाणवली', 'कोथिंबीर वासाळली', 'मका कणसाळला', 'फरशी शेवाळली' अशीं कितीतरी उदाहरणे देतां येतील. माणसाळणें, हाताळणें, धुरकटणे, थंडावणें इत्यादि नामधातु रूढ झालेले आहेत. याच प्रकाराने आणखीहि नामधातु बनविता येतील. उदाहरणार्थ, वर्णिणें, परीक्षिणे, प्रतीक्षणे, संतोषिणे, उपकारणे, अभिनंदणे, संपादिणे, प्रकाशिणे, विवेचिणें, चर्चिणें इत्यादि. प्रथम प्रथम नाविन्यामुळें ही सुधारणा चमत्कारिक भासेल. पण परिचयानंतर हीं एकेरी क्रियापदे रुळलीं जातील आणि त्याचा चमत्कारिकपणा वाटेनासा होईल. एकेरी क्रियापदांच्या योगानें विनाकारण होणारी पुनरुक्ति टळेल आणि भाषेमध्यें क्रियापदांची भर पडेल.

---

# १२. विरामचिन्हें

निबंधलेखनांत विरामचिन्हे करावीं लागतात. विरामचिन्हे लिहिता लिहितां करावीं. कारणाशिवाय विरामचिन्हे करूं नयेत. विरामचिन्हें करण्याचे उद्देश तीन आहेत.

१. अर्थव्यक्ति—लेखनाचा अर्थ स्पष्ट व्हावा व काहीं संदिग्धता राहू नये म्हणून विरामचिन्हांची जरूरी असते.

२. अर्थाच्या दृष्टीने आणि व्याकरणाच्या दृष्टीने शब्दाचा, वाक्यांचा परस्पर सबंध दिसावा म्हणून विरामचिन्हे करावीं लागतात.

३. विरामचिन्हाच्या साहाय्याने भावना, विकार दाखविता येतात.

आतां कांहीं मुख्य विरामचिन्हें देतों आणि तीं केव्हा वापरावीं ह्यांचेंहि दिग्दर्शन करितो.

१. पूर्णविराम ( . )—१. वाक्य संपलें म्हणजे, विचार किंवा कल्पना पूर्ण झाली म्हणजे. २. संक्षेपानंतर उ.—रा. रा. ( राजमान्य राजश्री ).

२. उद्गारवाचक ( ! )—१. उद्गार दाखविण्यासाठीं. उदा.—रामा, शिवा, गोविंदा ! २. अचंबा दाखविण्यासाठीं. उदा.—काय औदार्य ! ३. उद्गारवाचक-अव्ययांपुढं. उदा.—अरेरे ! शिव ! शिव ! वाहवा !

३. **प्रश्नार्थक** ( ? )—१. प्रश्नार्थक वाक्याच्या शेवटीं. २. मध्येंच शंका दाखविण्यासाठीं.

४. **स्वल्पविराम** ( , )—१. वाक्यखंड किंवा अवयव निराळे दाखविण्याकरितां. २. गौणवाक्य, संबंधी वाक्य, क्रियाविशेषण दाखविण्याकरितां. ३. समानार्थक शब्द तोडतांना. ४. शब्दाची याद दिली असतांना प्रत्येक शब्दानंतर. उ.—रामा, गोविंदा, कृष्णा हीं मुलें शाळेस गेलीं. ५. अध्याहृत शब्द दाखवावयाच्या वेळीं. ६. उतारा देतांना त्याच्या अगोदर. ७. विचार अपूर्ण असेल तर त्याच्या शेवटीं.

५. **कोलन** ( : )—१. शब्दाचा, वाक्याचा अर्थ देतांना. २. पदार्थांची यादी देतांना. ३. उतारा मोठा देतांना. ४. वाक्यांत तुटकपणा दाखवितांना.

६. **अर्धविराम** ( ; )—१. मिश्र वाक्यांत प्रधान वाक्य निराळें दाखवितांना. ज्या वेळेस उभयान्वयी अव्ययें घातलीं नसतील किंवा वाक्य लांब असेल तर. २. लहान वाक्यें तोडतांना. ३. मिश्र वाक्यांतील सारख्या दर्जाच्या गौण वाक्यांच्या शेवटीं. ४. उदाहरणार्थ व इतर शब्दानंतर.

७. **इतर चिन्हें—रेघ** ( – )—एकदम सुचलेला विचार घालतांना. कंसांतील वाक्यें-स्पष्टीकरणार्थ घालतांना. समानार्थक शब्द घालतांना.

**कंस** ( )—कोणत्याहि कठीण शब्दांचें, वाक्यखंडाचें विवरण करणारें वाक्य कंसांत घालावें.

**फुल्या** ( * )—विस्मृतीनें राहिलेला भाग लिहावयाचा असेल तर तो खालीं लिहून तो ह्या खुणेनें दाखवावा.

**काकपद**—( ^ ) एखादा शब्द चुकून राहिला असेल तर वर लिहून काकपद त्याच्या खालीं मोकळ्या जागेंत करावें.

**अवतरणचिन्हें**—( " " ) १. दुसऱ्याच्या मुखांतील, ग्रंथांतील शब्द ज्या वेळेस उतारे म्हणून द्यावयाचे असतील त्यावेळीं त्या शब्दांच्या आरंभीं आणि शेवटीं " " अशीं चिन्हें करावी. २. उताऱ्यांमधील उतारा असेल त्यावेळी पहिल्या उताऱ्याच्या आरंभीं व शेवटीं " " अशीं करावी आणि पोट उताऱ्यास ' ' असे एकेक चिन्ह करावें. ३. संभाषण लिहितांना ह्या चिन्हांकडे विशेष लक्ष दिलें पाहिजे. बोलणाऱ्या व्यक्ति निराळ्या असल्या तर प्रत्येक व्यक्तीचें भाषण स्वतंत्र परिग्राफमध्यें द्यावें. ४. पुस्तकाचें नांव. कवितेचें नांव, निबंधाचें शिरोभूत वाक्य, कोणताहि महत्त्वाचा शब्द अथवा शब्दसमूह इत्यादि बाबी अवतरणचिन्हांत घालाव्या.

---

## १३. शुद्धलेखन

शुद्धलेखनांच्या बाबतींत खालील गोष्टी ध्यानांत ठेवाव्या.

शुद्धलेखनांत दोन गोष्टी महत्त्वाच्या आहेत. १ ऱ्हस्वदीर्घ, २ अनुस्वार.

१. ऱ्हस्वदीर्घ विचार.

( अ ) मूळ मराठी व इतर भाषांतील आत्मसात् झालेल्या शब्दांचे अन्त्य इ, उ, दीर्घ लिहावे. उदा.—बाई, लाडू, रूढी, अब्रू , गडू.

(आ) अन्त्य 'अ' पूर्वीचे इ, उ, दीर्घ लिहावे. उदा.–पीठ, लांकूड. अपवाद–चिच, लिंब, उंट, सुंभ.

( इ ) वरीलशिवाय इतरत्र आलेले इ, उ, ऱ्हस्व लिहावे. उदा.–शिवण, तुरट, भुसकट, भुगा. संस्कृत शब्द ऱ्हस्व इकारान्त, उकारान्त असेल तर तसाच ऱ्हस्व लिहावा. उदा.–मति, रुचि, भानु.

( ई ) अन्त्य यीच्या ऐवजीं ई स्वर लिहावा. उदा.–बाई ( बायी नव्हे ).

( उ ) दोन अवयवांनीं युक्त असलेल्या शब्दांतील ई अथवा ऊ हे स्वर विभक्ति–प्रत्यय लागतांना ऱ्हस्व होतात. उदा.–दूध–दुधास; मीठ—मिठांत.

( ऊ ) तीन किंवा चार अवयवांच्या शब्दांतील ई, ऊ, विकल्पानें ऱ्हस्व करावेत. उदा.—बटीक–बटिकीस, बटकीस.

( ऋ ) एकाद्या शब्दांतील उपान्त्याच्या पूर्वीं जर दीर्घ अथवा सानुनासिक स्वर असेल तर उपान्त्य स्वराचा विभक्तिप्रत्ययापूर्वीं 'अ' करावा. उदा.—रेशीम–रेशमास, वाघुळ–वाघळास.

( ॠ ) तत्सम शब्दाचा अन्त्य स्वर मूळचा ऱ्हस्व किंवा दीर्घ असेल तर तो तसाच ऱ्हस्व किंवा दीर्घ लिहावा. विभक्तिप्रत्यय लावतांना मात्र अन्त्य ऱ्हस्व स्वर असेल तर तो दीर्घ करावा. मति, बुद्धि, कवि, पति, नीति, गति, गुरु, मधु, रिपु, वधू, चमू, स्वयंभू. मतीनें, बुद्धीला, गतीचा, नीतीमुळें, मधूला.

२. अनुस्वार विचार.

( अ ) नपुसकलिंगी शब्दाच्या अन्त्याक्षरावर अनुस्वार द्यावा. मात्र अन्त्य स्वर अ नसला पाहिजे.

उदा.—केळें, वासरूं, कोकरूं. मोतीं–मोत्यें, दहीं, बीं, पाखरूं–पाखरें, तळें–तळीं, घरें ( घर–चें अनेकवचन ). दारें, ( दार–चें अ. व. ) अपवाद. पाणी, लोणी, तरवणी गुळवणी इ.

(आ) नपुंसकलिंगी सर्वनामावर अनुस्वार द्यावा. उदा.—जें, तें, असें. हीं, तीं.

( इ ) पुढें दिलेल्या शब्दांवर अर्थभेदासाठीं यथाक्रम अनुस्वार दिला पाहिजे.

उदा.—पांच ( संख्या ); पाच ( रत्न ); नांव ( संज्ञा ); नाव ( नौका ); कांप (कम्प); काप ( काटणें ); वांचणें ( जिवंत राहणें ), इ. इ.

( ई ) मूळ संस्कृत शब्दांतील म् कार अथवा न् कार ह्यांचा लोप दाखविण्यासाठीं अनुस्वार द्यावा. उदा.—गांव ( ग्राम ), नांव ( नामन् ) हींव ( हिमम् ) अपवाद—वीस ( वींशति ), तीस ( त्रिंशत् ) इ.

( उ ) कांहीं शब्दांच्या विशिष्ट अक्षरावर अनुस्वार देण्याची रूढी पडली आहे. उदा—कांहीं, नाहीं, हास, धांव, केंस, संवय, वांकडी.

विभक्तिप्रत्ययांवरील अनुस्वार.

अनेकवचन, सामान्यरूप :—ह्यावर अर्थभेदासाठीं अनुस्वार द्यावा.
प्रथमा—वरील ( अ ) व ( आ ) पहा.
द्वितीया—'तें' वर अनुस्वार द्यावा.
तृतीया—नें, नीं, शीं, एं, आं, ईं, हीं, ह्यांवर अनुस्वार द्यावा.
सप्तमी—ई, आं, 'त' प्रत्ययापूर्वींच्या सामान्यरूपाच्या अन्त्यक्षर ह्यांवर अनुस्वार द्यावा.

विभक्तिप्रतिरूपक अव्ययांच्या अन्त्याक्षरावर अनुस्वार देतात. उदा. प्रमाणें, मुळें, विषयीं, शेवटीं, मध्यें, पेक्षां साठीं, करितां.

( ऊ ) सर्वनामावरील अनुस्वार—तूं, ह्यांवर अनुस्वार द्यावा. म्यां, त्वां आम्हीं तुम्हीं ( कर्मणिप्रयोग–तृतीया कर्ते ) ह्यांवर अनुस्वार द्यावा.

( ऋ ) विशेषणाबाबत सर्व विशेष्यांचे म्हणजे नामांचे नियम पाळावेत. पुल्लिंगी व स्त्रीलिंगी (नामाच्या) विशेषणांवर अनुस्वार देऊं नये. नपुसकलिंगी ( नामाच्या ) ई–ऊं–एकारान्त विशेषणांवर द्यावा. उदा०—माझें, आमचें, हिरवें, हिरवीं ( फुलें ), ताजें, वाटोळें, येणारें ( संकट ).

( ॠ ) क्रियापदांमध्यें कर्मणि प्रयोगांत तृतीय पुरुषी नपुंसकलिंगी क्रियापदांवर अनुस्वार द्यावा. उदा०—म्यां काम केलें. त्यानें पुस्तक वाचिलें. प्रथम पुरुषवाचक वर्तमान, भूत, रीतिभूत, ऊं–प्रत्यय भविष्य व आज्ञार्थ क्रियापदाच्या उभयवचनीं अन्त्याक्षरावर अनुस्वार द्यावा. उदा०—मी काम करितों. मी चालतों. आम्ही बोलतों–बोलूं–बोलत असूं.

द्वितीय पुरुषी वर्तमान, भूत, रीतिभूत, संकेतार्थी क्रियापदाच्या अनेक-वचनी अन्त्याक्षरावर अनुस्वार द्यावा. तुम्हीं बसतां, बसलां.

(ऌ) अव्ययांवरील अनुस्वार—कोठें, येथें, जेथें, मघांशीं सुद्धां, दोनशें, चारशें, लागीं, पुढें, जेव्हां, तेव्हां, खालीं, एरवीं, जेवीं, अगदीं, इत्यादींवर अनुस्वार देण्याचा प्रघात आहे.

(अपवाद—सहज, तडक, लवकर, जरा, बहुधा, सर्वथा, इकडे, तिकडे, जिकडे, अन्यथा.)

ऊं,—तां, प्रत्ययान्त धातुसाधित अव्ययांवर व तांना ह्याच्या तां वर अनुस्वार द्यावा. जाऊं, जातां, करूं, करितां, बोलूं, बोलतांना, जातांना, करितांना.

भाव व लिंग ह्याप्रमाणें बदलणाऱ्या नपुंसकलिंगी क्रियापदावर व तदन्त-र्गत धातुसाधिताच्या अन्त्याक्षरावर अनुस्वार द्यावा. (खरें) बोलावें, (फूल) उमलतें, (फुलें) उमललीं, (मला) सांजावलें, मला जावयाचें असतें.

# काव्यरचना

## १ पद्यरचना

### ( अ ) प्रास्ताविक

काव्य म्हणजे काय हें बरोबर सांगतां येणें कठीण आहे. कोणी अंतः-करणास उचंबळणारें जें वाक्य तें काव्य म्हणतात. कोणी रसानें ओथंबलेलें वाक्य म्हणजे काव्य समजतात. कोणी त्याला मानवी आयुष्याचें समीक्षण असेंहि म्हणतात. कोणी शब्द आणि अर्थ ह्यांची चमत्कारिक रीतीनें घातलेली संगति म्हणजे काव्य असेंहि म्हणतात.

यापैकीं कोणतीहि काव्याची व्याख्या स्वीकारली तर काव्य गद्यांत किंवा पद्यांत असूं शकेल. शब्दांच्या शक्ति, अलंकार, रसविचार, रसोद्ग्रहण यांसंबंधीं जो विचार करावयाचा तो गद्यकाव्य किंवा पद्यकाव्य यांना सारखाच लागूं पडेल.

परंतु सामान्य माणसाच्या दृष्टीनें काव्य म्हणजे पद्य. गद्यापेक्षां निराळें व तालावर उच्चारण्यासारखें, कांहीं एका विशिष्ट पद्धतीने गळ्यावर म्हणतां येण्या-जोगें वाक्य दिसलें म्हणजे सामान्य मनुष्य त्याला काव्य असें समजतो. तेव्हां पद्यत्व हें काव्याचें एक प्रमुख लक्षण समजण्यास हरकत नाहीं.

पद्यरचनेचा विचार ज्या शास्त्रांत येतो त्याला छन्दःशास्त्र म्हणतात. परंतु छन्द हा शब्द संकुचित अर्थानें विशिष्ट प्रकारच्या पद्यरचनेलाहि लावितात. म्हणून गण, मात्रा, यति, वृत्त, जाति, छंद यांचा विचार करण्याऱ्या या शास्त्रास पद्यरचनाशास्त्र हें नांवच अधिक सयुक्तिक दिसतें.

गद्यापेक्षां निराळें आणि तालावर किंवा गळ्यावर म्हणतां येणारें तें पद्य. हें पद्य काव्यस्वरूप असेल असें नाहीं. अमरकोश, वैद्यकावरील ग्रंथ, कारिका इत्यादि पद्यांत असल्या तरी त्यांना काव्य म्हणतां येणार नाहीं. याठिकाणीं फक्त पद्यरचनेचाच विचार करावयाचा आहे.

पद्य हें मुख्यतः खालील प्रकारचें असतें.

( १ ) **गणवृत्तें**—अक्षरांचा गुरुलघुक्रम ठराविक असणें.

( २ ) **जाति** किंवा **मात्रावृत्तें**—अक्षरांची संख्या किंवा गुरुलघुक्रम यापेक्षां चरणांतील मात्रासंबंधीं विशिष्ट नियम पाळून चरणाची रचना करणें.

( ३ ) **छंद**—गण, किंवा मात्रा यांचा निर्बंध नसलेली पद्यरचना.

या सर्व पद्यप्रकारांचा क्रमशः विचार करण्यापूर्वी गुरुलघुअक्षरे, मात्रा व अक्षरगण म्हणजे काय हें पाहिलें पाहिजे.

**गुरुलघु**—पद्यपंक्तीमध्यें येणारीं अक्षरें लघु किंवा गुरु असतात. सामान्यतः ऱ्हस्व अक्षरें लघु आणि दीर्घ अक्षरें नेहमींच गुरु असतात. परंतु पुढें जोडाक्षर अगर विसर्ग आला असल्यास किंवा अनुस्वारयुक्त ऱ्हस्व अक्षर, गुरु होतें, जसें विक्रम. या शब्दांतील तिन्हीं अक्षरें ऱ्हस्व आहेत, परंतु '**वि**' च्या पुढें '**क्र**' हे जोडाक्षर असल्यामुळें '**वि**' हें गुरु होतें. संयम यामधील '**सं**' हें अनुस्वारयुक्त असल्यामुळें गुरु होतें. 'तेजः' यांतील जच्यापुढे विसर्ग असल्यामुळे तें गुरु अक्षर झालें.

लघु अक्षर ᵕ अशा अर्धचंद्राकृतीनें व गुरु अक्षर – अशा सरळ रेषेनें दाखवितात. जसे वि̄क्र̆म̆, सं̄य̆म̆, ते̆जः̄, कु̆सु̆म̆.

**मात्रा**—लघु अक्षर उच्चारण्यास जो वेळ लागतो त्यास मात्रा म्हणतात. लघु अक्षराची एक मात्रा आणि गुरु अक्षराच्या दोन मात्रा मोजतात. विक्रम, संयम, तेजः यांच्या चार मात्रा आणि कुसुम याच्या तीन मात्रा होतात.

**अक्षरगण**—तीन अक्षरांच्या एका गटाला अक्षरगण असें म्हणतात. गुरुलघूच्या भेदाने.अशा अक्षरगणांचे एकंदर आठ प्रकार होतात, आणि या आठ प्रकाराला य, म, त, र, ज, भ, न, स, अशीं नांवे दिलीं आहेत. एका लघु अक्षराचा लगण आणि एका गुरु अक्षराचा गगण समजतात.

| | |
|---|---|
| य ᵕ – – | भ – ᵕ ᵕ |
| र – ᵕ – | ज ᵕ – ᵕ |
| त – – ᵕ | स ᵕ ᵕ – |
| न ᵕ ᵕ ᵕ | ल ᵕ |
| म – – – | ग – |

ह्या गणांचें लक्षण एकत्र देणारें—'यमाताराजभानसलगम्' हें सूत्र आहे. ह्यांतील तीन तीन अक्षरांचा एक एक गट केला म्हणजे आठ निरनिराळे गण पडतात. एका लघु अक्षराचा लगण आणि एका गुरु अक्षराचा गगण होतो. जसें यॅमाता, मातारा, ताराज, राजभा, जभान, भानस, नसल, सलगम्, लॅ, गम्. हे सर्व गण पुढील श्लोकांतहि त्यांच्या लक्षणांसह गुंफिले आहेत.

**आदि मध्यावसानीं ये यरता लघु अक्षर ।**
**भजसा तेंवी गुरु ये मन सर्व गुरु लघू ॥**

**यति**—पद्याचा चरण–मग ते पद्य वृत्त असो, जाति असो किंवा छन्द असो–वाचीत असताना कांहीं ठिकाणीं थांबावें लागते त्याला यति म्हणतात. ज्या ठिकाणीं यति असतो त्या ठिकाणीं एक तुकडा पडतो म्हणून त्या ठिकाणीं शब्द संपला पाहिजे. त्या ठिकाणीं शब्द संपलेला नसेल तर तेथें यतिभंग होतो आणि पद्याचा चरण बरोबर वाचतां येत नाहीं म्हणून तो दोष गणला आहे. चरणाच्या शेवटीं यति हा असलाच पाहिजे; परंतु चरणामध्यें अक्षरें अधिक असलीं आणि तीं सलगपणें म्हणतां येत नसलीं तर चरणाच्या मध्यें कोठें तरी यति असतोच. खालील उदाहरणांत यतिस्थान दिसून येईल.

**पृथ्वी**: अक्षरे १७. यति आठव्या अक्षराच्या नंतर येतो.

**सुसंगति सदा घडो । सुजनवाक्य कानीं पडो.**

**शिखरिणी**: अक्षरे १७. यति सहाव्या अक्षराच्या नंतर येतो.

**अहा कैसा झाला । अवचित विधी निष्ठुर असा.**

**शार्दूलविक्रीडित**: अक्षरे १९. यति बाराव्या अक्षरानंतर येतो.

**म्हातारी उडतां नयेचि तिजला । माता मदीया अशी.**

## (आ) वृत्तविचार

वृत्तामध्यें चार चरण असतात. या चरणांतील अक्षराची संख्या सारखीच असते एवढेंच नव्हे तर त्यांचा गुरुलघुक्रम ठराविक असतो. सर्व चरण रचनेच्या दृष्टीनें एकसारखे असल्यामुळें यांना '**समवृत्तें**' म्हणतात. संस्कृत-मधून मराठींत आलेलीं बरींचशीं वृत्तें याच प्रकारचीं आहेत. थोड्याशा फरकानें **अर्धसमवृत्तें** किंवा **विषमवृत्तें** सिद्ध होतात. परंतु त्यांची संख्या थोडी आहे. चारी चरणांपैकीं पहिला व तिसरा एकच प्रकारचा आणि दुसरा व

चौथा निराळ्या प्रकारचा असला तर अर्धसमवृत्त होतें. चारी चरण निरनिराळ्या प्रकारचे असल्यास विषमवृत्तें तयार होतात. समवृत्तांतील निरनिराळ्या वृत्तांच्या संमिश्रणानें अर्धसमवृत्तें किंवा विषमवृत्तें अगणित होतील. पण प्रायः अशी रचना मराठींत नाहीं.

पुढें मराठींतील मुख्य समवृत्तांचीं उदाहरणें त्यांच्या अक्षराच्या संख्येच्या क्रमानें दिलीं आहेत. यांतील कांहीं उदाहरणें प्रा. पटवर्धन याच्या छंन्दोरचना या ग्रंथांतून घेतलीं आहेत.

**इन्द्रवज्रा :** ११ त त स ग ग

| त | त | ज | ग ग |
|---|---|---|---|
| — — ᴗ | — — ᴗ | ᴗ — ᴗ | — — |

**हे कीर्ति गातां सुरगायकांनीं**
**श्री नारदें आयकिलीं स्वकानीं**
**ये द्वारके विस्मित चित्त झाला**
**पाहूं म्हणे त्या पुरुषा अजाला** ( वामन )

**उपेन्द्रवज्रा :** ११ ज त ज ग ग

| ज | त | ज | ग ग |
|---|---|---|---|
| ᴗ — ᴗ | — — ᴗ | ᴗ — ᴗ | — — |

**सरोवरें निर्मळ नीर ज्याचें**
**किं ज्यामध्यें कानन नीरजांचें**
**तया अजी वर्णिल कोण पद्मा**
**जिथें असे सद्मकरूनि पद्मा**

ह्या दोन्ही वृत्तांत फरक फक्त पहिल्या अक्षरापुरताच आहे.

एकाच वृत्तांत दोन्हींचे मिश्रण झालें म्हणजे त्या वृत्ताला **उपजाति** म्हणतात.

( इंद्र. ) **ज्याच्या विषाचे उदकीं चपेटे**
( उपें. ) **वनाग्नि ज्याच्या नयनेंच पेटे**
( इंद्र. ) **देखे असा गर्व भुजंगमाचा**
( उपें. ) **निर्माण कर्ता स्थिरजंगमाचा ॥**

**शालिनी** : ११ म त त ग ग

म त | त | ग ग
— — — — — ⏑ | — — ⏑ | — —

**थोरां सेवी आदरानें सुखानें**
**पोरां पाळी कष्टुनी कौतुकानें;**
**शालीनत्वें आचरी प्रीति–नीती,**
**संसाराची श्रीच हो शालिनी ती.** (मा. पटवर्धन)

**रथोद्धता** : ११ र न र ल ग

र | न र ल ग
— ⏑ — | ⏑ ⏑ ⏑ | — ⏑ — ⏑ —

**चंद्रकोर गगनांत शोभते,**
**तारकागण झुले सभोंवते,**
**देव लोकमहिषी मनोज्ञता**
**ही जणूं प्रकटवी रथोद्धता.** (मा. प.)

**स्वागता** : ११ र न भ ग ग

र | न | भ | ग ग
— ⏑ — | ⏑ ⏑ ⏑ | — ⏑ ⏑ | — —

**पद्मजे परिस सुंदर बाला**
**सिद्ध अर्थ चंहुही करण्याला**
**पातली जर होऊनि गेहीं**
**स्वागता कवण धाव न घेई.** (मा. प.)

**द्रुतविलंबित** : १२ न भ भ र. लक्षण :—द्रुतविलंबित नाभभरागणी.

न | भ | भ | र
⏑ ⏑ ⏑ | — ⏑ ⏑ | — ⏑ ⏑ | — ⏑ —

उदा०— **खचित चंचल यौवन माधुरी**
**उचित तेढ नव्हे प्रिय सुंदरी**
**उलटता क्षण होशिल सन्मुख**
**द्रुतविलंबित होइल तें सुख** (मा. पटवर्धन)

पसरुनी गुरुजाळक धीवरीं
धरियले बहु मीन नदीवरी
यदुदरीं शिशु तो झष सांपडे
विधिबळें व्यसनी सहसा पडे (मो.)

**वंशस्थ :** १२ ज त ज र

**लक्षण :**—वंशस्थ जाणा जत जार याहिं ते

ज | त | ज | र
⏑ – ⏑ | – – ⏑ | ⏑ – ⏑ | – ⏑ –

लतेतळीं रुंदनिरुंद कालवे
गळोनि तेथें मकरंद कालवे
परागहि सांद्र तयांत रंगती
फुलांसवें भृंगतती तरंगती (रघुनाथ पंडित)

**भुजङ्गप्रयात :** १२ य य य य

**लक्षण :**—भुजंगप्रयातीं य हे चार येती.

य | य | य | य
⏑ – – | ⏑ – – | ⏑ – – | ⏑ – –

भिऊनी जनां एक बाजूस व्हावें
न होऊन कोणासही दूखवावें
कुणी दुष्ट अंगास लावील हात
तरी दाखवावा भुजङ्गप्रयात (मा. प.)

**स्रग्विणी :** १२ र र र र.

र | र | र | र
– ⏑ – | – ⏑ – | – ⏑ – | – ⏑ –

कोणता लाडकी तीस लक्ष्मीधर
घेत अंकीं म्हणे शान्ति चित्तीं धर
बाहुपाशांत या माझिया रुक्मिणी
शोभशी भूवरी तूं खरी स्रग्विणी (मा. प.)

**प्रहर्षिणी :** १३ भ न ज र ग

म | न ¦ ज र | ग
— — —|⏑ ⏑ ⏑ ¦ ⏑ — ⏑|— ⏑ —|—

**गेलेला परमुलखांत जेर झाला**
**गेहाला प्रियसुत तो अखेर आला**
**प्रीतीची खचित सदा क्षमाच रीती**
**संन्यासाविण नच हे प्रहर्षिणी ती** (मा. पटवर्धन)

**वसन्ततिलका :** १४ त भ ज ज ग ग.

**लक्षण :**—जाणा वसंततिलकी तभजाजगागा.

त | भ ¦ ज ¦ ज | ग ग
— — ⏑|— ⏑ ⏑ ⏑ — ⏑ ¦ ⏑ — ⏑|— —

**उद्धर्षिणी श्रवुन कोकिल गीतिका ही**
**केवीं सखे शिशिर आन्तर जात नाहीं ?**
**कां म्लान एकच मुखाब्ज तुझें सुरेख ?**
**घेही वसन्ततिलका, मधु दृष्टि फेंक.** (मा. पटवर्धन)

**मालिनी :** १५ न न म य य

**लक्षण :**—न न म य य गणांनीं मालिनीवृत्त होतें.

न | न ¦ म | य | य
⏑ ⏑ ⏑|⏑ ⏑ ⏑ ¦ — — —|⏑ — —|⏑ — —

**रुचिर मदिर नेत्रीं लोल नीलाम्बुजें हीं**
**उजळ नितल नामी चम्पकें स्वर्णदेहीं**
**मृदुल मधुर ओंठीं लाल गुल्जार शोभे**
**हृदय तुज बघूनी मालिनी फार लोभे** (मा. पटवर्धन)

**पंचचामर :** १६ ज र ज र ज ग

ज र | ज | र ¦ ज | ग
⏑ — ⏑|— ⏑ —|⏑ — ⏑|— ⏑ — ¦ ⏑ — ⏑ |—

**नमोऽस्तुते जयोऽस्तुते गुलाल लाल भास्करा**
**सुवर्ण पाउले तुझीं पवित्र होय उंबरा**
**विहङ्गसूक्त गायनें धूमून राहिलीं वनें**
**सरू झुलून वारिती तुझ्यावरून चामरा** (मा. प.)

**मन्दाकिनी :** १६ त म य र त ग

त | म | य | र | त | ग
— — ᴗ — — — | ᴗ — — — ᴗ — | — — ᴗ | —

**हे श्यामले नानापरी बन्दा तुझी सेवा करी**
**बक्षीस तूं कांहींहि दे–दे भाकरी, दे खापरी**
**सिंहासनी चित्ताचिया देवी बसे भक्तिप्रिया**
**सारें जिला अर्पूनिया मी पूजितों नानापरी.** (मा. प.)

**तुङ्गभद्रा :** १६ र त म य र ग

र त | म य र | ग
— ᴗ — — — ᴗ | — — — ᴗ — — — ᴗ — | —

**प्रेम कोणीही करीना कां अशी फिर्याद खोटी**
**प्रेम दे अन्यास आधीं ठेविशी कां स्वार्थ पोटी**
**प्रेम कां संगीन गुच्छीं ? प्रेम कां रंगीन ओठीं**
**प्रेम लाभे प्रेमळाला त्याग ही त्याची कसोटी.** (मा. प.)

**मन्दाक्रांता :** १७ म भ न त त ग ग

**लक्षण :**—मंदाक्रांता मभनततगा, गागणीं युक्त राहे.

यति बाराव्या अक्षराच्या शेवटीं असतो.

म | भ न त | त ग ग
— — — | — ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ — — ᴗ | — — ᴗ — —

**मेघांनीं हें गगन भरतां गाढ आषाढमासीं**
**होई पर्युत्सुक विकल तो कान्त एकान्तवासी**
**तन्निःश्वास श्रवुन रिझवी कोण त्याच्या जिवासी ?**
**मन्दाक्रान्ता सुभग कविता कालिदासी विलासी** (मा. पटवर्धन)

**पृथ्वी :** १७ ज स ज स य ल ग

**लक्षण :**—जसाजसयलाग हे नियतसंघ पृथ्वीमधे.

ज स ज | स य | ल ग

u – u | u u – | u – u | u u – u – – | u –

**बलाढ्यतम भेटतां नर तयास पृथ्वीवरी**
**स्वराज्य निजमानसावर परी तपस्वी करी**
**म्हणून नृपतीपुढें शिर जरी प्रजा वांकवी**
**लवे कृश यतीपुढें नृप अशी तपीं थोरवी**

मोरोपंताच्या प्रसिद्ध केकावलि काव्यांत हेंच वृत्त वापरलें आहे.

**हरिणी :** १७ न स म र स ल ग

**लक्षण :** नसमरसलागानीं युक्ता सदा हरिणी म्हणा.

न स | म | र | स | ल ग

u u u u u – | – – – | – u – | u u – | u –

**विमल हरिणी साधी भोळी शिशूपरि बागडे**
**व्यथित अबला आर्या तीही अचेतन कां पडे ?**
**कवण इजला सत्तेनें तो छळी ? पति राक्षसी**
**लढुन वधिती व्याघ्रांना ते खरे नर साहसी**

**शिखरिणी :** १७ य म न स भ ल ग

**लक्षण :**—यमानासाभाला गगण सहिता ती शिखरिणी.

य म | न | स | भ | ल ग

u – – – – – | u u u | u u – | – u u | u –

**जिच्या प्रीतिसाठीं रुचिर कवनें नित्य रचिलीं**
**महायत्नें रत्नें जमवुन सुवर्णांत खचिलीं**
**जिवी छाया वाया भुलवित जिवा या निशिदिनीं**
**कुठें आतां कान्ता शिखरिदशना ती शिखरिणी** (मा. प.)

**शार्दूलविक्रीडित :** १९ ( १२–७ ) म स ज स त त

**लक्षण :**—मा साजा सतताग येति गण ते शार्दूलविक्रीडित

म स ज | स त त | ग

——— ⏑⏑— ⏑—⏑ | ⏑⏑— ——⏑ ——⏑ | —

**भाषा संस्कृति थोर एकच महाराष्ट्रा तुझी देख रे**
**नाना धर्म असंख्य जाति असती अद्यापि हें ही खरें**
**भेदांनीं परि या किती दिन अतां व्हावें तुवां पीडित ?**
**जाणूनी अपुलें स्वरूप कर तूं शार्दूलविक्रीडित** (मा. पटवर्धन)

**स्रग्धरा :** २१ ( ७–१४ ) म र भ न य य य

**लक्षण :**—माराभानाययाया मतत गण असे स्रग्धरीं.

म र | भ न य | य | य

——— —⏑— | —⏑⏑ ⏑⏑⏑ ⏑—— | ⏑—— | ⏑——

**दृष्टिक्षेपें जियेनें सहज मज दिली पावक प्रीति दीक्षा**
**प्राप्तीसाठीं जियेच्या तपभरच जणूं मीहि केली प्रतीक्षा**
**माझ्या सङ्गे गृहाला शुभ घटि बघुनी पातली मध्यराती**
**साधाया अर्थ चारी रसिक सुगृहिणी जाहली स्रग्धरा ती** (मा. प.)

( इ ) जाति–ऊर्फ मात्रावृत्तें.

**जाति :** म्हणून जो पद्यरचनेचा प्रकार आहे त्यांमध्यें अक्षरांच्या गुरुलघु-क्रमावरती कटाक्ष नसून चरणांतील मात्रा विशिष्ट नियमानुसार असाव्या लागतात. संस्कृतमधून आर्या, गीति हीं मात्रावृत्तें मराठींत आलेलीं आहेत. दिंडी हें मराठींतील मात्रावृत्त होय.

**आर्या :** संस्कृतमध्ये ज्या पद्याला आर्या म्हणतात तीमधील पहिल्या व तिसऱ्या चरणात १२ मात्रा आणि दुसऱ्या चरणात १८ व चौथ्या चरणांत १५ मात्रा असतात. मराठींत हें वृत्त क्वचित्च वापरलें आहे. परंतु संस्कृत-मध्यें ज्याला गीति म्हणतात त्यालाच मोरोपंतानीं आर्या असें संबोधलें असल्यामुळें तेंच नाव मराठींत रूढ झाले आहे. गीतीच्या म्हणजे मराठींत ज्याला आर्या म्हणतात त्यामध्यें पहिल्या व तिसऱ्या चरणांत १२ मात्रा आणि दुसऱ्या व चौथ्या चरणात १८ मात्रा असतात. उदा०—

**हा सीते हा सीते, टाकुनि जावें तुवां न रामा तें**
**राहूतें जेंवि सुधा, देवि न जिरलीस तूं नरा मातें** (मोरोपंत)

**दिण्डी**: हें एक अस्सल मराठी मात्रावृत्त आहे. ह्यांतील प्रत्येक चरणांत १९ मात्रा येतात. उपान्त्य अक्षर मात्र गुरूच असावें लागतें. हें मात्रावृत्त रघुनाथपंडितांच्या नलोपाख्यानांत उपयोगांत आणिले आहे. उदा०

**घोष होतां 'ग्यानबा तुकाराम !'**
**राउळाची ही वाट सुखाराम**
**करी भक्ती चित्तांत नृत्यलीला**
**पहा दिण्डी चालली पंढरीला** (मा. प.)

अर्वाचीन मराठी कविता मात्रावृत्तामध्यें पुष्कळच आहेत. या जाति उर्फ मात्रावृत्तें यांची छन्दःशास्त्रदृष्ट्या सूक्ष्म पाहणी करून त्यांचें शास्त्रशुद्ध वर्गीकरण करण्याचें कार्य प्रा. पटवर्धन यांनीं आपल्या छंदोरचना या ग्रंथांत केलें आहे. त्यांनीं या जातींचे सुमारें २६० प्रकार आपल्या ग्रंथांत त्यांच्या लक्षणासह सोदाहरण दिले आहेत आणि या सर्व प्रकारांचें नामकरणहि केले आहे. जिज्ञासूंनीं तें तेथें पहावें.

(ई) छन्द

वृत्तामध्यें अक्षरें गुरुलघुक्रमानें येतात; जाती किंवा मात्रावृत्तें यांतील चरणांत मात्रा किती असाव्यात यासंबंधी नियम असतात. परंतु छन्दामध्ये यापैकीं कोणताच नियम पाळला जात नाहीं. छन्दांतील चरणामध्यें अक्षरांची संख्या सारखी असावी असा नियम आहे. परंतु हा नियमहि साक्षेपानें पाळला जातो असें नाहीं. छन्दांत येणारीं सारींच अक्षरें गुरु मानतात म्हणजे त्यांच्या दोन मात्रा समजतात. परंतु अक्षरांच्या संख्येबरोबरच छन्दांतहि लयबद्धता आवश्यक आहे. जातिप्रमाणें छन्दाचेहि पुष्कळ प्रकार होऊं शकतील.

तथापि छन्दाचे मुख्य प्राचीन प्रकार म्हटले म्हणजे ओवी, अभङ्ग व घनाक्षरी हे होत.

**ओवी**: मराठींतील ओवी हा अत्यंत साधा व सर्वसामान्य लोकप्रिय छन्द आहे. स्त्रीगीतें, लोकगीतें, ज्ञानेश्वर–एकनाथ, श्रीधर–महिपती इत्यादि कवींचीं काव्यें, ह्या ओवीछन्दांत आहेत. हा छन्द संस्कृत–प्राकृत भाषांतील छन्दावरून मराठींत आला आहे. ओवीची रचना अत्यंत अनियमित आहे. सामान्यतः असें म्हणतां येईल कीं ओवींत ४ चरण असतात. पहिल्या तीन चरणाच्या

शेवटीं अन्त्ययमक असतें आणि चौथा चरण आखूड असतो. असल्या ओवीस औटचरणी म्हणजे ३½ चरणी असें म्हणतां येईल.

**१. ॐ नमो श्री आद्या । वेद प्रतिपाद्या**
**जय स्वसंवेद्या । आत्मरूपा ॥** (ज्ञानेश्वरी)

**२. पहिली माझी ओवी । पहिला माझा नेम**
**तुळशी खालीं राम । पोथी वाचे**

**३. गाई घरा आल्या । घणघण घंटा नाद**
**कुणीकडे घालूं साद । गोविंदा रे ।** (मायदेव)

ओवीच्या चरणांत अक्षरें किती यावींत यासंबंधीं नियम नाहीं.

एकनाथांच्या ओवींत चौथ्या चरणाच्या मध्यभागीं यमक साधलेलें असते.

**श्रीराम सांगे सौमित्रासी । अगस्त्या, शांडिल्या, गार्ग्य ऋषींसीं**
**वामदेवादि कौशिकांसीं । बहु धनराशी पाठवाव्या.**

ओवीच्या पहिल्या तीन चरणांत सहापासून अठरापर्यंत अक्षरं आणि चौथ्या चरणांत चारपासून बारापर्यंत अक्षरें असावींत असें ओवीचें लक्षण एका प्राचीन ग्रंथांत दिलें आहे, तथापि ओवीची रचना एकंदरींत अनियमितच असलेली दिसते.

## अभंग

अभंग हे वृत्त ओंवीपेक्षां नियमित आहे. त्यास चरण चार असतात. पहिल्या तीन चरणांचीं अक्षरें प्रत्येकीं चार, सहा किंवा आठ असतात. चौथ्या चरणाचीं तीन, चार किंवा सात असतात. यमक कधीं तीन चरणांत तर कधीं दुसऱ्या तिसऱ्या चरणांत तर कधीं दुसऱ्या चौथ्या चरणांत असतें.

## घनाक्षरी

चार चरण, एकतीस अक्षरें, तीन चरणांत आठ आठ व शेवटच्या चरणांत सात अक्षरें अशी मांडणी घनाक्षरी छन्दांत असते. ह्याच्या पहिल्या तीन चरणांत यमक असतें.

**म्हणे भरत हा राम**
**आहे आहे मेघश्याम**

**वसिष्ठ ह्या गुरु नाम**
**तोही मज कोपला**

वामनपंडित, मोरोपत, शिवराम आणि रघुनाथपंडित यांच्या कवितेंत हें वृत्त आढळतें.

## साकी

ह्या वृत्तांत दोन अर्धें असून प्रत्येकांत सात मात्रागण असतात आणि विराम दुसऱ्या आणि चवथ्या मात्रागणापुढें असतो.

**गावीं संत चरित्रें हो । तारक मधुर पवित्रें हो**
**हरिला हृदयीं चिंतित जातां । मार्ग जहाला थोडा**
**बहुधा केला हरि संदर्शन । काम प्रेमा घोडा.** (मोरो.)

रे. टिळक कवींचें 'वनवासी फूल' व गिरीश यांचें 'आम्बराई' हीं काव्यें साकीवृत्तांत लिहिलीं आहेत.

## ( उ ) परकीय वृत्त

मराठीमध्यें संस्कृत, महाराष्ट्री व अपभ्रंश ह्या जुन्या भाषांतील वृत्तांवरून आलेलीं कांहीं वृत्तें वर दिलीं. ह्या भाषांप्रमाणे फार्सीभाषेच्या व वाङ्मयाच्या संसर्गामुळें त्या भाषेंतीलहि कांहीं वृत्तें मराठींत आलीं आहेत.

ह्या सर्व वृत्तांमध्यें आधुनिक कवींनीं व गायकांनीं सर्वांच्या परिचयाचें केलेलें गज़ल हें फार्सीवृत्त फार महत्त्वाचे आहे.

## गज़ल ( फार्सी घझल् )

हें एक नवीन वृत्त मराठींत आधुनिक कवींनीं रूढ केलें आहे. हें मूळ फार्सीभाषेंतून घेतलें आहे. 'गज़ल' ह्या शब्दाचा मूळ धात्वर्थ 'प्रेमालाप' 'प्रेमाचें बोलणें' असा आहे. यामुळें गज़लवृत्तांत लिहिलेली बरीचशी कविता प्रेम ह्या विकारासंबंधीं आहे. क्वचित् दुसऱ्या इतरहि भावना ह्या वृत्तांत गुफिल्या आहेत. गज़लांत साधारणपणें ओळींची संख्या दहापासून चवतीस-पर्यंत असूं शकते. पहिल्या दोन ओळींच्या शेवटीं यमक असतें व तेंच सम ओळींच्या शेवटीं साधलेलें असतें. ह्या यमकामुळें पहिल्या दोन ओळी ध्रुपदा-सारख्या समजल्या जातात.

## सुनीत

फार्सीवृत्ताप्रमाणेंच कांहीं वृत्तें इंग्रजीभाषेंतून आलीं आहेत. त्यामध्यें सुनीत हें मुख्य होय. हें वृत्त चौदा ओळींचें असते. ८+६ किंवा १२ + २ असे साधारणपणें त्याचे भाग पडतात. पहिल्या आठांत पहिली, चौथी, पांचवी व आठवी या ओळींत एकच यमक असतें व बाकीच्या दुसरी, तिसरी, सहावी, सातवी ह्या ओळींत एक यमक असतें. ह्या चौदा ओळींत एकच भावना किंवा विचार गुंफावयाचा असतो. हे एक निराळेंच वृत्त तितकेंसे म्हणतां येत नाहीं. कारण सुनीत रचतांना कोणतेंहि वृत्त वापरलें तरी चालते. बहुधा शार्दूलविक्रीडित ह्या वृत्तांत सुनीतें रचतात. चौदा ओळींचें बंधन व त्या ओळींची ८+६ किंवा १२+२ अशी विभागणी हे नियम मात्र सुनीत रचताना पाळले जातात.

### अभ्यास

१. मराठींत किती प्रकारचीं वृत्तें आहेत?

२. मूळ मराठीचीं अस्सल वृत्तें कोणतीं? फार्सीभाषेंतून कोणतीं वृत्तें आलीं आहेत?

३. अक्षरगण किती आहेत व त्यांचीं लक्षणें काय?

४. यति म्हणजे काय? यतिभंग झाल्यास कवितेवर काय परिणाम होतो?

५. रागानें किंवा प्रेमानें बोलणें झाल्यास कवीनें कोणतें वृत्त वापरल्यास अधिक परिणामकारक होईल? भक्तीला कोणतें वृत्त उपयोगी पडेल? मोठें वर्णन करण्यास कोणतें वृत्त अधिक उपयोगी आहे?

६. मराठींत कांहीं नवीं वृत्तें वापरलीं आहेत, त्यांचीं उदाहरणें द्या.

७. आर्या, वसंततिलका, पृथ्वी, शार्दूलविक्रीडित ह्यांचीं लक्षणें द्या.

८. खालील ओळींचे गण पाहून वृत्तें सांगा.

**१ निंदोत वानोत सुनीतिमंत.**
**चलो असो वा कमला गृहांत**

**२ कृतीचीं आयाळें जडवुनि गळा पुष्ट करुनी**
**बसे श्वा सिंहाच्या पदिं बहुत आवेश धरुनी**

**३ तया कासारी राजहंस पाहे**
**राजहंसाचा कळप पोहताहे.**

## २ काव्याचे प्रकार

कवितेच्या स्वरूपावरून, त्यांत गोवलेल्या अर्थावरून काव्याचे प्रकार पाडलेले आहेत. त्यांतील मुख्य प्रकार महाकाव्य, आख्यानें, भावगीतें, सुनीत, विलापिका हे होत. काव्य मोठें असलें म्हणजे त्याला महाकाव्य म्हणतात. ह्यामध्यें प्रकरणें असतात. ह्याचा विषय देवादिकांचा किंवा शूरवीरांचा किंवा सत्पुरुषांचा असतो. ह्याची भाषा, रचना, व शब्दयोजना भारदस्त असते. अलंकार, रस वगैरे त्या त्या अर्थाला योग्य असतात. ह्यांत प्रकरणें किंवा खंड असतात. सर्व काव्यांत एकच वृत्त असतें. प्रकरणाच्या शेवटीं मात्र वृत्त बदललेलें असतें. ह्या काव्याचीं ठळक उदाहरणें म्हणजे मोरोपंत, मुक्तेश्वर, श्रीधर, वगैरेंनीं लिहिलेलीं महाभारत, रामायण, पांडवप्रताप, वगैरे महाकाव्यें होत.

**खंडकाव्य** म्हणून ह्या महाकाव्याचा एक पोटभेद आहे. ह्याचीं उदाहरणें आधुनिक काव्यांत बरींच आहेत. महाकाव्यासारखा खंडकाव्याचा विषय इतका उदात्त नसतो. रोजच्या व्यवहारांतील किंवा लौकिक जगांतील नेहमीं आढळणारें एकादं उदाहरण घेऊन त्याचे मोठें वर्णन करण्याकडे खंड-काव्याचा रोंख असतो. वनवासी फूल, ( टिळक ); गरीब भिकारीण, ( मायदेव ); आम्बराई, अभागी कमल, ( गिरीश ); सुधारक, ( माधवराव पटवर्धन ); बदीशाळा ( यशवंत ) हीं आधुनिक खंडकाव्याचीं उदाहरणे होत.

**भावगीत** म्हणून एक आधुनिक काव्यामधील नवीन प्रकार आहे. हा शब्द इंग्रजी Lyric ह्या शब्दाचा प्रतिशब्द आहे. एखाद्या क्षणास कवीस आलेल्या सुंदर कल्पनेचें किवा एखाद्या क्षणात प्राप्त झालेल्या भावनेचें स्पष्टी-करण ह्या भावगीतांत केलेले असते. ही कविता त्रुटित व त्रोटक असते. आधुनिक कवींची बहुतेक सर्व कविता ह्या स्वरूपाची आहे. केशवसुत, गोविंदा-ग्रज, टिळक, बी, गिरीश, यशवंत, माधव ज्यूलीयन वगैरे कवींनीं भावगीतें बरींच लिहिलीं आहेत.

**विडंबनपर काव्य**—ह्या प्रकारचें काव्य मराठींत अलीकडे सुरू झालें आहे. मोरोपंतांचें हंसकाकीय प्रकरण ह्या स्वरूपाचें आहे. अलीकडच्या कवींत केशवकुमार ( प्रि. प्र. के. अत्रे ) ह्यांनीं हा काव्यप्रकार विशेष रूढ केला

आहे. समाजांतील, वाङ्मयांतील, धर्मांतील, अनिष्ट रूढींची प्रच्छन्न रीतीने चेष्टा ह्या काव्यांत केलेली असते. ‘ झेंडूचीं फुलें ’ हा ह्या प्रकारच्या कवितांचा संग्रह प्रसिद्ध आहे.

**विलापिका**—मृत्यु, वियोग, त्याग, वगैरेंनीं झालेलें दुःख वर्णन करणाऱ्या कवितांना **विलापिका** म्हणतात. आधुनिक कवींनीं ह्या प्रकारची कविता लिहिलेली क्वचित् क्वचित् ठिकाणीं आढळते. आगाशे यांची बाष्पांजलि, रेंदाळकर, सुमंत यांनीं आपल्या गतमुलासंबंधीं लिहिलेल्या कविता ह्या प्रकारांत येतात.

तांबे, दत्त, मायदेव, वगैरे कवींच्या **बालकवितांचा** एक निराळा प्रकार पडेल. त्याचप्रमाणें **सुनीत, गीतें, नाटकांतील पदें** वगैरे आणखी प्रकार आहेत.

## ३. शब्दशक्ति

**शब्दाचे अर्थ**—आपण आपल्या मनांतील भावार्थ कांहीं शब्द उच्चारून त्यांच्या मार्फत दाखवितों. अमुक एक शब्दाला अमुक एक अर्थ कसा आला ह्यासंबंधीं विद्वानांचीं निरनिराळीं मतें आहेत. साखर, आंबा, पेरु, मनुष्य, काठी, चांगला, सत्त्व इत्यादि शब्दांना ते ते विशिष्ट अर्थ प्राप्त झाले आहेत, व त्या अर्थानेंच ते नेहमीं वापरले जातात. शब्दाच्या अर्थाला संस्कृतमध्यें ‘ संकेत ’ असें म्हणतात.

शब्दाकडून अमुक एक जो अर्थ दाखविला जातो तो त्या शब्दांच्या मूळशक्तीनें दाखविला जातो. साखर ह्या शब्दाने एक पांढरा स्वच्छ पीठासारखा, गोड असा पदार्थ दाखविला जातो. हा जो साखर शब्दाचा उघड उघड व सरळ व एकदम सुचणारा असा अर्थ तो त्या शब्दाच्या मूळशक्तीमुळेंच आहे. ह्या शक्तीला ‘ **अभिधा** ’ शक्ति म्हणतात. स्पष्ट व उघड अर्थाला ‘ **वाच्यार्थ** ’ म्हणतात.

‘ आंबा अगदीं साखर आहे ’ ह्या म्हणण्यांत आंबा हा पदार्थ साखरेपासून निराळा असून फक्त गोडींतच ते सारखे आहेत. ह्या वाक्याच्या अर्थांत ‘ साखर ’ ह्या शब्दाचा नेहमींचा सरळ स्पष्ट उघड उघड असणारा अर्थ सोडून आपण त्याच्या जवळचाच असा दुसरा अर्थ घेतला. ‘ साखर ’

शब्दांतील ही दुसरा अर्थ घेण्याची जी शक्ति ती पहिल्या शक्तीहून निराळी आहे. ह्या शक्तीस "**लक्षणा**" शक्ति म्हणतात, व ह्या अर्थाला "**लक्ष्यार्थ**" म्हणतात.

तेव्हां अभिधा व लक्षणा ह्या शब्दाच्या दोन शक्ति आहेत हें सिद्ध होतें.

लक्ष्यार्थानें बोलणें हें नेहमींचें सरळ बोलणें नव्हे. हें थोडेंसें वांकडे आडवाटेचें बोलणें आहे.

ह्या अभिधा आणि लक्षणा ह्या दोन शक्तींशिवाय शब्दाची आणखी एक शक्ति आहे. ह्या शक्तीस "**व्यंजनाशक्ति**" म्हणतात. 'व्यंजना' ह्या शब्दाचा अर्थ सूचना असा आहे. ह्या व्यंजनाशक्तीनें जो अर्थ उत्पन्न होतो तो शब्दाच्या मूळ अर्थापासूनच सूचित होतो. 'अभिधा' म्हणून जी शब्दाची एक शक्ति सांगितली तिच्यापासूनच व्यंजनाशक्ति उत्पन्न होते. 'मुला, उजाडलें, ऊठ' असें मुलाला त्याची आई म्हणते. ह्या वाक्यांतून 'नुसतें उजाडलें सकाळ झाली' एवढाच अर्थ न निघतां, 'तुझी शाळेस जाण्याची वेळ झाली, तुला उशीर होईल, तूं किती वेळ निजणार?' इत्यादि अर्थ त्या साध्या वाक्यांतून सुचतात. 'मुला, उजाडलें ऊठ' त्यांतील शब्दशः, वरवर दिसणारा अर्थ तर खरा असतोच. त्याशिवाय त्यापासून इतर त्याच्यासंबंधाचा अर्थ सूचित होतो. 'सूर्य मावळला' असें म्हटल्यानें संध्याकाळ झाली, हा स्पष्ट अर्थ तर समजतोच परंतु त्याशिवाय एखादा कामकरी हमाल म्हणेल कीं, काम करण्याची वेळ संपली, एखादा विद्यार्थी म्हणेल कीं, घरीं जाण्याची वेळ झाली, एखादा ब्राह्मण म्हणेल कीं, संध्या करण्याची वेळ झाली, असे निरनिराळे अर्थ निरनिराळ्या लोकांच्या बाबतींत सूचित होतील. सूर्य मावळला, हा अर्थ तर खोटा नाहींच परंतु त्याशिवाय वर दिलेल्या इतर व्यंजना सूचित होतात. असे जे मुख्य अर्थापासून इतर अर्थ सूचित होतात त्यास **व्यंग्यार्थ** म्हणतात व इतर अर्थ सूचित करण्याच्या त्या शक्तीस **व्यंजनाशक्ति** म्हणतात.

शब्दाच्या अशा ह्या तीन शक्ति आहेत:—

**१ अभिधा, २ लक्षणा, ३ व्यंजना.**

अभिधेपासून वाच्यार्थ कळतो, लक्षणेपासून लक्ष्यार्थ कळतो, व्यंजनेपासून व्यंग्यार्थ कळतो. शब्दाचा वरवर दिसणारा उघड जो अर्थ तो वाच्यार्थ,

हा उघड उघड असणारा वाच्यार्थ ज्यावेळीं बरोबर लागत नाहीं व त्यामुळें त्याच्याजवळ जो अर्थ घ्यावा लागतो तो लक्ष्यार्थ. वाच्यार्थ घेऊन पुन्हां त्या अर्थानें सूचविलेला दुसरा अर्थ जो आपण घेतों तो व्यंग्यार्थ. शब्दाच्या ह्या तीन अर्थांशिवाय "तात्पर्यार्थ" म्हणून आणखी एक निराळा अर्थ कांहीं लोक मानतात. वाक्यांत येणाऱ्या शब्दांचा एकमेकांशीं संबंध लावून त्या सर्वांची गोळाबेरीज होऊन जो अर्थ निघतो त्यास तात्पर्यार्थ म्हणतात.

---

## ४. अलंकार

अलंकार म्हणजे भूषण, दागिने. शरीरावर ज्याप्रमाणे दागिने घातले म्हणजे शरीर सुंदर दिसतें, त्याप्रमाणे आपल्या भाषणांत किंवा लेखनांत अलंकार घातले म्हणजे त्या भाषणाला किंवा लेखनाला शोभा येते. तें भाषण किंवा लेखन सुंदर दिसतें.

मागें शब्दाच्या तीन शक्ति सांगितल्या. त्या शक्तींच्या मुळेंच शब्दांत अलंकार उत्पन्न होतात. साध्या सरळ बोलण्यानें अर्थ लवकर समजतो, परंतु त्या बोलण्यापासून चमत्कार वाटत नाहीं. त्यापासून आनंद होत नाहीं. 'मुख सुंदर आहे' ह्या वाक्याचा अर्थ साधा व सरळ आहे व तो आपल्यास तेव्हांच समजतो. पण त्यांत विशेष चमत्कार वाटत नाहीं. मुख कमलासारखें सुंदर आहे, किंवा मुख हें केवळ कमलच आहे, किंवा जणूं काय हें प्रत्यक्ष कमलच आहे, किंवा हें मुख नव्हेच, तर कमल आहे असं म्हटल्यानें ऐकणारासच एक प्रकारचा चमत्कार वाटतो व आनंद होतो, तो ज्या बोलण्यापासून किंवा लिहिण्यापासून चमत्कार वाटतो व आनंद होतो त्यास **अलंकारी** बोलणें म्हणतात.

आतां हें खरें कीं अलंकारी बोलण्यांत आपण सरळ बोलण्याचें सोडून देऊन आड मार्गानें बोलतों. सरळ मार्गानें बोलणें ह्यास **स्वभावोक्ति** व आडमार्गाने बोलणें ह्यास **वक्रोक्ति** असें संस्कृतमध्यें म्हणतात. एखाद्या स्त्रीच्या मुखाला आपण चंद्रमा म्हणतों, तिच्या नाकास चांफेकळी म्हणतों, तिच्या हांतास कमल म्हणतों. ह्या प्रकारच्या बोलण्यानें ऐकणारास आनंद होतो.

त्याला चमत्कार वाटतो. अलंकारी बोलण्यांत आपण जरा अवास्तव-वस्तुस्थितीस सोडून बोलतों. हें बोलणें साध्या बोलण्यापेक्षां निराळें आहे. साध्या बोलण्यानें चमत्कार वाटत नाहीं.

आपल्या बोलण्या-लिहिण्यांत किंवा काव्यामध्ये शब्द व अर्थ अशा दोहोंचा संबंध येतो; तेव्हां अलकार सुद्धां शब्दाचे कांहीं व अर्थाचे कांहीं असे दोन प्रकारचे आहेत. शब्दासंबंधीं जे अलंकार ते शब्दालंकार व अर्थासंबंधीं जे अलंकार ते अर्थालंकार होत. ह्या दोहोंशिवाय शब्द आणि अर्थ ह्या दोहोंच्या मिश्रणापासून जे अलंकार तयार होतात त्यास मिश्रशब्दार्थालंकार म्हणतात.

## ( अ ) शब्दालंकार

शब्दात वर्ण जर एकच आला तर त्याच्या उच्चारानें थोडासा चमत्कार उत्पन्न होतो.

**" गगनांत शशी निशीं प्रकाशे "**

ह्या ओळींत ' श ' हा वर्ण पुष्कळ वेळां आल्यामुळें ती ओळ म्हणण्यांत चमत्कार वाटतो.

**" द्विजां द्विजां मान्य मान्य कामकाम-हरा हरा**
**सुरा सुरास वासरवा रमारमा सहा स्मरा "**

ह्या कवितेत तोच शब्द दोनदां आला आहे, व त्यामुळें कविता म्हणतांना चमत्कार वाटतो. शब्दाच्या किंवा वर्णाच्या आवृत्ति-पुनरावृत्ति ह्यापासून जो अलंकार उत्पन्न होतो त्यास **अनुप्रास** म्हणतात.

**अनुप्रास**

**हे मंदमंद पद सुंदर कुंददंती**
**चाले जसा मदधुरंधर इन्द्रदंती**
**हंसा धरूं जवळि जाय कृशोदरी ते**
**निष्कंप कंकणकरासि पुढें करीते**

( रघुनाथ पंडित )

**यमक**ः—यमक हा शब्दालंकाराचा एक प्रकार आहे. ‘ अनुप्रास ’ ह्या शब्दालंकारांत ज्याप्रमाणें एकच शब्द किंवा वर्ण पुनः पुनः येतो त्याप्रमाणे यमकामध्ये सुद्धां तेच तेच वर्ण पुनः पुनः परंतु कवितेच्या पदाच्या शेवटीं येतात.

संस्कृत कवितेत ‘ यमक ’ फारसे आलेले दिसत नाहींत. मराठी कवितेंत मात्र यमक फार येतात. मराठी कवितेंत यमकाचें प्राबल्य जास्त आहे. दोन वर्ण, तीन वर्ण, चार वर्ण, कधीं कधीं सबंध ओळच्याओळही यमकानें बांधलेली असते. तेच तेच वर्ण पुनः पुनः आणण्याची जाणून बुजून खटपट केली जाते. असे वर्ण जरी तेच ते पुन्हां आले तरी त्यांचा अर्थ भिन्न असतो.

उदा० वर्णाचा यमक—वर्ण ‘ळे’

**साध्याहि विषयांत आशय कधीं मोठा किती आढळे**
**नित्याच्या अवलोकनें परि किती होती जगीं आंधळे.**

२. दोन वर्ण

**बुडे बुडवि सागरीं तरि सुकर्ण धारा विना**
**सहाय नसतां स्वयें परतटासि ती दाविना**

३. आठ वर्ण

**कवीस स्वर्ग रुचला न पुष्पकविमानसा**
**त्वथश प्रिय नाकींचें न पुष्पकविमानसा**

यमक म्हणजे दाब, नियंत्रण. यमकानें वाचणाऱ्यास जरी कौतुक किंवा चमत्कार वाटला तरी कविता करणाऱ्यास यमक माधणें म्हणजे एक प्रकारचें बंधनच वाटतें.

**यमक**

**सत्संगतीं असावा प्रेमा, ग्रीष्मीं जसा असे व्यजनीं**
**रम्यहि अभक्त हो मज, मधुपा चंपक तसा, असे व्यजनीं ॥**

( मोरोपंत )

कांहीं आधुनिक कवि हे बंधन मानीत नाहींसे झाले आहेत. काव्यास यमकाचीं बंधनें नसलीं तर काव्य चांगलें निर्माण होतें अशी त्यांची समजूत आहे. यमक नसलेल्या कवितेस निर्यमक कविता म्हणतात.

उदा०—गंगौघापरि भव्य केशवसुता सावेशवाणी तुझी
नव्योजीवनलाभ देत अमुच्या कर्णीं पडावी पुनः
वीराची धृति, वा शुचित्व शिशुचें, स्त्रीजातिचें मार्दव
यांचा पाठ तुझीच एक कविता देईल राष्ट्राप्रति

( रेंदाळकर )

## ( आ ) अर्थालंकार

एखाद्या वस्तूचे ती जशी आहे तसे वर्णन करणें त्याला **स्वभावोक्ति** म्हणतात. स्वभावोक्ति म्हणजे स्वभाव + उक्ति = जसं आहे तसें वर्णन.

उदा०—**उसळे सळसळा जळ डोहीं । त्यावरी खग शके न उडोहि**
**अंतरिक्षगत पक्षिजळानी । लक्ष लक्ष पडतात गळोनी**
**कालिया तरि जळांतचि आहे । जाति दूर गरलानळ आहे.**

कालिया नावाच्या नागाचे वर्णन अगदीं बरोबर आहे. यामध्ये अवास्तव असे अतिशयोक्ति पर्यायानें बोलणें किंवा कांहीं गोळाबेरीज सांगणे असे कांहीं नाहीं.

ह्याच्या उलट वर्णन करण्याची जी पद्धत ती वक्रोक्ति म्हणून प्रसिद्ध आहे. वर जें सरळ बोलणे म्हणून सांगितलें त्याच्या उलट हें वांकडें बोलणें होय. हें वांकडें बोलणें अर्थात कोणास दुःख, वाईट वाटावें म्हणून नव्हे, तर ह्या निराळ्या बोलण्यापासून, वर्णनापासून ऐकणारास किंवा वाचणारास चमत्कार वाटून आनंद व्हावा, वाचण्यापासून समाधान वाटावे हा ह्याचा उद्देश असतो. सर्व अलंकाराच्या मुळाशीं ही वक्रोक्ति असते, ह्यालाच अलंकारिक बोलणें असे म्हणतात.

अलंकाराचे दोन प्रकार पाडतां येतात. दोन गोष्टींत असणाऱ्या सारखेपणावर व विरोधावर अलंकार अवलंबून असतात. साम्य किंवा सारखेपणा ह्यांवर अवलंबून असणारे अलंकार–(१) **उपमा**, (२) **उत्प्रेक्षा**, (३) **अनन्वय**, (४) **रूपक**, (५) **अपह्नुति**, (६) **अप्रस्तुतप्रशंसा**, (७) **समासोक्ति**, (८) **अतिशयोक्ति**, (९) **दृष्टांत** इत्यादि आहेत.

विरोधावर अवलंबून असणारे अलंकार (१) **विरोध**, (२) **विरोधाभास**, (३) **विषम**, (४) **असंगति** इत्यादि आहेत.

## उपमा

"मुख हें कमलासारखें आहे" या वाक्यांत उपमा अलंकार वापरला आहे.

'मुख' आणि 'कमल' या दोन वस्तूंची तुलना केली आहे म्हणून ती उपमा आहे. 'मुख' ह्या **वस्तूची** तुलना केली आहे म्हणून त्याला उपमेय म्हणतात. 'कमल' ह्या **वस्तूशीं** तुलना केली म्हणून त्याला उपमान म्हणतात. 'मुख' ही वस्तु सुंदर आहे व 'कमल' ही वस्तुहि सुंदर आहे. ह्या दोन्ही वस्तूंमध्यें 'सुंदरपणा' हा गुण सारखा आहे. ह्या गुणाला **साधर्म्य** म्हणतात.

मुख व कमल ह्या दोन्ही वस्तु सुंदरपणांत सारख्या असून पुन्हां दोन्ही एकरूप सांगितल्या नाहींत. या दोन्हीमध्ये अलगपणा दाखविला आहे. हा अलगपणा दाखविणारा शब्द 'सारखा' हा आहे.

'उपमा' ह्या अलंकारांत वर दिलेले शब्द महत्त्वाचे आहेत.

१. ज्याची तुलना करावयाची त्याला **उपमेय** म्हणतात.
२. ज्याशीं तुलना करावयाची त्याला **उपमान** म्हणतात.
३. उपमेय व उपमान या दोहांत जो सारखा गुण असतो त्यास '**साधर्म्य**' म्हणतात.
४. अलगपणा दाखविणारे 'सारखे' यासारखे शब्द असतात त्यास **उपमादर्शक** शब्द म्हणतात.
५. ह्या तुलनेस किंवा अलंकारास '**उपमा**' म्हणतात.

## उत्प्रेक्षा

उपमालंकाराच्या जवळचा उत्प्रेक्षा हा अलंकार आहे.

ज्या **वस्तूची** तुलना केली असें उपमेय तें ज्या **वस्तूशीं** तुलना केली असे उपमानच आहे कीं काय असें ज्या वाक्यांत दाखविलें जाते त्या वाक्यांत उत्प्रेक्षा अलंकार होतो. उदा०:–मुख हें उपमेय, कमल हें उपमान. मुखाकडे पाहून हें कमलच आहे कीं काय असें विधान केलें कीं 'उत्प्रेक्षा' हा अलंकार उत्पन्न होतो.

ह्या विधानांत 'जणूं, जणो, जणूं कांहीं, असें कीं काय' हे किंवा ह्या अर्थाचे शब्द घालावे लागतात. उदाः—त्या साधूचे शब्द जणूं अमृतच !

उदा०—१. रामाचा बाण रावणास मारून जमीनींत घुसून जणूं कांहीं पाताळांतील नागास ही बातमी देण्यास गेला कीं काय ?

२. आम्रपंक्ति डुलून जशी कांहीं वसंत ऋतु आला म्हणून आनंदानें त्याचें स्वागत करीत आहे !

**उत्प्रेक्षा**

३. **धवलवर्ण हा देहावरतीं फुलस्या पुष्पांचा**
**लाल छटा वर, जणूं पसरला रसचि गुलाबाचा.**

(गडकरी)

४. **कस्तूरिका संचित ही असें कीं**
**आकाश कीं अंजनपुंज फेंकी**
**कीं भूमि काळी अजि लेई शाल**
**कीं वाढले दाट महा तमाल.**

## अपह्नुति

उत्प्रेक्षा अलंकाराच्या पुढची पायरी म्हणजे अपह्नुति अलंकार होय. वस्तूचें खरे स्वरूप नाकबूल करून त्यावर उपमानाचा आरोप करतों त्यास **अपह्नुति** अलंकार म्हणतात.

उदा०— मुख नव्हे, चंद्रच आहे.

आपलें व्याख्यान—व्याख्यान नसून केवळ अमृतच आहे.

ह्या ठिकाणीं मुख व व्याख्यान ह्यांचें खरें स्वरूप नाकबूल केलें आहे व चंद्र व अमृत हीं उपमानें आहेत त्यांचे आरोप मूळ वस्तूवर केले आहेत.

उदा०— १. **न हें नभोमंडळ वारिराशि**
**न तारका फेनच हा तयाशी**
**न चंद्र हा वर्तुळ शेष झाला**
**न अंक तो विष्णु गमे निजेला.**

२. संताप दे यास्तव चंद्र नोहे
रवि म्हणावा तरि रात्र आहे.

३. न तो चंद्र, न तो सूर्य यमाचीं तीं विलोचनें
पापें पुण्यें यम बघे करिजेतात जीं जनें.

## रूपक

अपह्नुतीच्या पुढची पायरी म्हणजे रूपक अलंकार होय. उपमेय हे दुसरे भिन्न नसून प्रत्यक्ष उपमानच आहे असें म्हणणें म्हणजे **रूपक** अलंकार होय.

उदा०—तो मनुष्य केवळ कर्णच होय.
तो प्रत्यक्ष यम आहे.

१ दयाब्द वळशील तूं तरी न चातकां सेवकां
उणें किमपि भाविकां उबगशील तूं देव कां

२ कवि सृष्टीचा अलंकार । कवि लक्ष्मीचा शृंगार
सकलसिद्धीचा निर्धार । ते हे कवि ॥
कवि सभेचें मंडन । कवि भाग्याचें भूषण
नाना सुखाचें संरक्षण । ते हे कवि ॥

३ मन्मति दरींत न शिरे कोपमतंगज विवेक हरि जागे

४ असी अगणित गुणकीर्ति नैषधाची
फिरे भुवनत्रय जान्हवीच साची.

(रघुनाथ पंडित)

५ पार्थ—पयोधर गर्जे स्पर्धा मंडूक तूं वृथा करिशी
त्याच्या पुढें टुरुटुरु टरों टरों शब्द हे किती करिशी

रूपकाचाच एक अतिशयोक्ति हा प्रकार आहे. त्यांत उपमेयाचा लोप करून उपमानच त्या ठिकाणीं वापरावयाचें. ह्या अलंकारास रूपकातिशयोक्ति असें नांव आहे.

उदा०—**हरीच्या पुनः पुनः कां काळ्या नाकांत घालिशी मशका**

दोन वस्तूंमध्यें योग्य संयोग असतो त्यावेळेस **सम** अलंकार होतो.

श्रीकृष्ण रुक्मिणीला, श्रीकृष्णा रुक्मिणी जशी आतां
दमयन्तीस नल नळा दमयन्ती आइको जनीं गातां

ह्याच्या उलट स्थिति असली म्हणजे विषम अलंकार होतो.

## दृष्टांत

एखादी गोष्ट जास्त स्पष्ट करण्यासाठीं दुसरी त्याच प्रकारची बाहेरची गोष्ट उदाहरण देऊन आपण सांगतों त्यावेळेस **दृष्टांत** अलंकार होतो.

१. काव्य करावें म्यां नच वचकावें दूषितो परी लघूस
कां न सदन बांधावें, कीं त्यांत पुढें बिळें करिल घूस

२. भजें मी विश्वेशा, बहुत अपराधी जरी खरा
नुपेक्षावें मातें पदनत अनाथा प्रभुवरा
नद्या ओढे नाले मिळति समभावें जलधिला
असाधू वा साधू शरण रिघतां पावति तुला.

## अतिशयोक्ति

सर्वच अलंकाराच्या मुळाशीं वाजवीपेक्षां अधिक असें बोलणं किंवा अतिशयोक्ति असते. परंतु त्यांतल्यात्यांत जर अधिक उघड रीतीनें अतिशयोक्ति दिसत असली तर तेथें अतिशयोक्ति अलंकार होतो. ह्या अलंकारांत वाक्यांत उपमेय न सांगतां उपमानाचा फक्त निर्देश केलेला असतो.

१. वनदेवता न पाहों शकती लज्जावनता नलास्याला
करिति न रोमंथाला हरिण मयूरहि तदा न लास्याला ।

२. अष्टमी चंद्र हा केंवि शोभे पहा
दोन ह्रीं खालतीं पंकजें शोभती

३. पंगु मेरु जर लंघिल पायीं
विंध्यरूप जर होइल रायी
हीरकास जर पद्म चिरील
निर्मलत्व तर नीच वरील ।

## अप्रस्तुतप्रशंसा ( अन्योक्ति )

वाक्यांत बोलतांना प्रस्तुत मुद्द्याची गोष्ट न बोलतां अप्रस्तुत–जिचा संबंध नाहीं अशा गोष्टीसंबंधीं बोलावयाचे व त्यायोगें प्रस्तुत गोष्टीची कल्पना आणून द्यावयाची ह्याला **अप्रस्तुतप्रशंसा अलंकार** म्हणतात. 'अन्योक्ति' म्हणून ह्यालाच दुसरें नांव आहे. 'अन्योक्ति' कवितांत हाच अलंकार आहे.

**१. मर्कटास कोणी मोतियांचा सर। अति मनोहर अर्पियला**
**तें न खाद्य ऐसें मर्कटें पाहून। दिला तो फेंकून दूरवरी**

**२. तूं काक कोकिल असें मी, काळेपण सारिखे**
**काकली कोविदांनाच अस्मदंतर पारखे।**

**३. हा सागर रत्नाकर म्हणुनि धनास्तव तयासि म्यां वरिलें**
**दूर असो धनलाभ क्षार जळें मम मुखा तयें भरिलें**

## अर्थांतरन्यास

वाक्यांत असलेल्या सामान्य व विशेष अशा दोन विधानांपैकीं एकाचा दुसऱ्यास दाखला देतात तेव्हां **अर्थान्तरन्यास** हा अलंकार होतो.

**१ स्वजन गवसला जो त्याजपाशीं नसे तो (विशेष विधान)**
**कठिण समय येतां कोण कामास येतो (सामान्य विधान–सिद्धांत)**

**२ आधीं होता वाघ्या दैवयोगें झाला पाग्या**
**मूळ स्वभाव जाईना त्याचा येळकोट राहीना**

**३ कंस कृष्णास पीडोनि तत्करें मृत्यु पावला**
**कोण जो नाश पावेना करितां सज्जनच्छला**

साम्यावर अवलंबून असलेले जसे अलंकार आहेत तसे दोन वस्तूंमधील विरोधावर अवलंबून असलेले विरोध, विरोधाभास, असंगति, विषम इत्यादि अलंकार आहेत.

## विरोध व विरोधाभास

एकमेकांस विरोधी, विसदृश अशीं विशेषणें एकाच वस्तूला लावलीं म्हणजे **विरोध** अलंकार तयार होतो.

दोन वस्तूंत खरा विरोध नसून विरोध आहे असा भास जेव्हां होतो तेव्हां **विरोधाभास** अलंकार होतो.

१ सूर्यवंश कुठें—माझी अल्पबुद्धि कुठे बरे!

२ कुठें तुझे शर तीक्ष्ण! कुठें त्या हरिणांचा भंगूर जीव

**३ अजहि जन्म घेसी तूं निरिच्छ वधिसी अरी**
**जागसी जरि निद्रालू त्वद्रीति न कळे खरी**

**४ गिरि होति ठेंगणे स्थिर वायु जलधि उथळ तुज पुढें राया**

मनांत एक असून त्याच्या विरुद्ध बोलावयाचें व हा विरोध बोलणाऱ्याच्या आवाजावरून, भाषेवरून दाखविला म्हणजे **व्याजोक्ति** किंवा **व्याजस्तुति** हा अलंकार होतो. उदा० :—आपण मोठे शाहाणे आहां।

**काय शीत हिमाद्रिचा कर। तो करो तुमचें शिव**

## व्यतिरेक

उपमेय हे प्रत्यक्ष उपमानापेक्षां श्रेष्ठ आहे असं दाखविणं किंवा उपमेय आणि उपमान ह्या दोहोंतील सारखेपणा व विरोध हे एकाच वेळीं दाखविले असतात त्यावेळीं **व्यतिरेक** अलंकार होतो.

**कृष्ण, सख्यातें करी धरुनियां सांगे गोष्टी गोड**
**त्याशीं, सर्व रसाधिक परि, ते अमृत न पावे जोड.**

(मोरोपंत)

## निदर्शना

दोन वस्तूंमध्यें अशक्य, असंभाव्य असलेला संबंध आहे असें म्हणणे तेथें **निदर्शना** अलंकार होतो.

उदा०—

१ त्या कंजूषापासून पैसं काढणे म्हणजे मुसळाला अंकुर फोडणे आहे.

२ मी सूर्यवंशाचें वर्णन करणं म्हणजे लहानशा होडीनें समुद्र तरणें होय.

**३ ठसवाया मनीं बोध खलाच्या यत्न जो करी**
**पाणी पुरुष तो ओती पालथ्या घागरीवरी**

## सार

बोलतांना शब्द, वाक्य ह्यांची रचना अशी करावयाची कीं बोलणाऱ्याचा भाव उत्तरोत्तर वाढता होऊन त्याची पराकाष्ठा व अंतिम मर्यादा शेवटच्या शब्दांत होते. तेव्हां **सार** हा अलंकार होतो.

उदा०—**राया कुलार्थ पुरुष ग्रामार्थ कुलहि समस्त सोडावें**
**ग्रामहि देशार्थ, मही आत्मार्थ बुधें भलेंच जोडावें.**

## प्रश्नालंकार

ज्यावेळीं बोलणारा आपल्या मनांतील भाव प्रश्नाच्या रूपानें विशेष स्पष्ट रीतीनें सांगतो त्यावेळीं **प्रश्नालंकार** होतो. ऐकणारास प्रश्न विचारला तर त्याचें त्याकडे लक्ष लागतें.

उदा०—१ **कोण ज्ञाता राज्य स्वीकार करील आधि ज्या माजी**
२ **करिल कसें मांजर जें दुष्कर हरिहनन काज वाघास**

**भ्रांतिमान्—**

उपमेय आणि उपमान यांतील भेद न कळून उपमानालाच उपमेय समजणें व त्याप्रमाणे प्रत्यक्ष क्रिया करणें अशा वेळीं भ्रांतिमान् अलंकार होतो.

**भृंगें विराजित नवीं अरविन्द पत्रें**
**पाहूनि मानुनि तुझींच विशाल नेत्रें**
**घालीन अंजन अशा मतिनें तटाकीं**
**कांते वृथा उतरलों भिजलों विलोकीं.**

(रघुनाथ पंडित)

**प्रतीप—**

उपमेयापेक्षां उपमान हें कमी दर्जाचें आहे असें जेव्हां दर्शविलें जातें त्यावेळीं हा अलंकार होतो.

**चंद्रासि लागति कळा उपराग येतो**
**गंगेसि भंग बहु पाणउतार होतो**
**जें होय चूर्ण तरि मौक्तिक तें कशाला**
**नाहीं समान नळराज महायशाला**

(रघुनाथ पंडित)

## ५. रस

चांगल्या उत्तम लेखनाच्या वाचनानें आपणास आनंद वाटतो. विशेषतः उत्तम श्रेष्ठ अशा कवींचीं काव्ये वाचून मनाला समाधान होते. त्रास नाहींसा होतो. ह्या आनंदाचें कारण काव्यामध्ये रस किंवा गोडी असते हें होय.

रस म्हणजे गोडी, कोणताही पदार्थ खाल्ल्यानें जशी त्याच्या चवीपासून त्याची गोडी लागून त्यापासून सुख होते तसेंच काव्याच्या रसानें होतें. आपल्या मनांत प्रीति, हर्ष, क्रोध, शोक, उत्साह, भय, जुगुप्सा, आश्चर्य, शांति अशा निरनिराळ्या भावना असतात. मनुष्याच्या मनात, स्वभावांत जन्मापासून असणाऱ्या ह्या भावनांमुळे हे निरनिराळे रस उत्पन्न होतात. ह्या भावना म्हणजेच रसांचीं कारणें किंवा त्यांचे **आधार** होत. ह्यांना **स्थायी** म्हणजे कायमच्या स्वरूपाच्या **भावना** म्हणतात.

लहान मुलाच्या बाबतींत तर ह्या भावना आपणास पदोपदीं दिसतात. त्याची आई दिसल्यास त्याला आनंद होतो. थोडावेळ ती जर न दिसली तर त्याला दुःख होते. एखादी सावली दिसली तर किवा एकदम मोठा आवाज झाला तर त्याला भय वाटते. त्याच्या हातांतील खेळणें काढून घेतल्यास राग येतो. मोटार प्रथम पाहिल्यावर आश्चर्य वाटतें. खेळातील केसाळ कुत्रे किवा अस्वल हातांत घेतलें तर तिटकारा वाटतो. अशा पुष्कळ भावना आहेत. ताजमहाल पाहिल्यापासून जर आनंद होतो तर मित्रनाशापासून दुःख होतें. खोल दरी पाहून भय वाटते व बेडूक पाहून किळस येते. काव्याच्या वाचनानें ह्या भावना किंवा मनोवृत्ति जागृत होतात; तेव्हांच त्यापासून रस उत्पन्न होतो.

लेखक किवा कवि आपल्या बुद्धीच्या सामर्थ्यानें चागल्या चांगल्या शब्दाची जुळणी करून त्याच्यापासून वाचकाच्या मनावर जो परिणाम करतो त्यास '**रस**' म्हणतात.

**रसाचे प्रकार** :—रसाचे प्रकार एकंदर आठ आहेत. **१ शृंगार, २ वीर, ३ करुण, ४ हास्य, ५ रौद्र, ६ भयानक, ७ अद्भुत, ८ बीभत्स.**

ह्याशिवाय **शांतरस, भक्तिरस,** किंवा **वत्सलरस,** असे काहीं निराळे रस कांहीं विद्वान मानतात. **उदात्त** ह्या नांवाचा आणखी एक रस कोणी मानतात.

वर दिलेल्या आठ रसांपैकीं शृंगार, वीर, रौद्र, बीभत्स हे चार मूळचे असून त्यापासून अनुक्रमे हास्य, करुण, अद्भुत व भयानक हे चार रस उत्पन्न होतात, असें कोणी, तर शृंगार हाच एक रस मुख्य तर कोणी करुण हा रस मुख्य मानतात.

**शृंगार**:—दुष्यंत-शकुंतला, नल-दमयंती, अर्जुन–सुभद्रा, कृष्ण–रुक्मिणी वगैरे पतिपत्नींचा प्रेमविषयक संबंध हा शृंगाररसाचा विषय होय. परस्पर प्रीतीमुळें हा रस उत्पन्न होतो. हा काव्यामध्यें आणावयाचा असेल तर कोमल, ललित, सुंदर, मृदु असे वर्ण असलेले शब्द योजावे लागतात.

उदा०–१. **सुंदरी मूर्ति मदनाची, अमृतवदनाची, मदकदनाची विखारी धार.**
रा. जो.

२. **शिण जाइल न्याहारी करून। अन् सांग कुना देखुन**
**हें खुले तोंड घामानें। भरघोंस हि कणसाहून**
**पाहिलें जरी रोज मी**
**तरि हौस न होई कमी**
**फिरफिरूनि बगायास मी**
**होतसे मनि उतावीळ। मैतरिणी बिगि बिगि चाल** (यशवंत)

२ **वीर**:—भीम व दुर्योधन, हनुमान व रावण, वगैरे वीर व त्यांचे प्रतिस्पर्धी ह्यांचा संबंध हा वीररसाचा विषय होय. मनुष्यामध्ये असणाऱ्या उत्साहामुळें हा रस उत्पन्न होतो. हा रस उत्पन्न करावयाचा असेल तर कठोर वर्ण वापरावे लागतात.

उदा०—**वधिले क्षत्रिय तेव्हां नव्हता भीष्म शांतनव समज**
**देवांसि मागते झाले मरणीं करुनि नवस मज.**
(मोरोपंत.)

**करुण**:—रामानें सीतेच्या वियोगानंतर केलेला शोक, अजराजाचा इंदुमतीच्या मृत्यूबद्दलचा शोक, मातापितरांचा आपल्या मुलाबद्दलचा शोक हे सर्व करुणरसाचे विषय होत. एकमेकांबद्दल होणाऱ्या शोकामुळें हा रस उत्पन्न होतो. ह्या रसाला सुद्धां मृदु, कोमल असेच वर्ण लागतात.

उदा०—**हा हा देवी हृदय फुटतें देह माझा गळाला**
**वाटे शून्य त्रिभुवन मला अंतरात्मा जळाला**
**या आत्म्यानें कितितरी सदा दुःखभारा वहावें**
**मोह व्यापी फिरफिरुनिया काय आतां करावें।**

**हास्य:**—विदूषकासारखें विचित्र बोलणें, चमत्कारिक पोषाख, दुसऱ्याची चेष्टा, मस्करी वगैरे हास्याचे प्रकार होत. वैचित्र्यापासून हा रस उत्पन्न होतो.

उदा०—**हो हो उटूनिया आरिसा। आंधळेवा पुढें दाखवूं जैसा।**
**ना बहिरेसी हृषीकेशा। गाणें केऊतें.**

**रौद्र:**—आपलीं हत्यारें शस्त्रें उगारणें, एखाद्या बलवानानें बुक्क्या-लाथा मारणें वगैरे भीतिदायक प्रकार रौद्ररसाचे विषय होत. दुसऱ्याबद्दल आलेल्या क्रोधाबद्दल हा रस उत्पन्न होतो. वीररसाप्रमाणें ह्या रसाच्या बाबतींतहि कठोर कर्कश वर्णांची योजना उपयोगीं पडते.

उदा०—**काइ सागराचा घोटु करावा। कीं पर्वताचा घासु करावा**
**ब्रह्मकटाहो घालावा। आसका दाढे**
**दिशा सगळिया मिळाविया। चांदणिया चाटुनु घेयाविया**
**ऐसे वर्ततसे नासविया। लोपुपता तुज**

**भयानक:**—राक्षसाचे वेडेविद्रे आचार, भुतपिशाचांचें नाचणें हे भयानकरसाचे विषय होत. भयामुळें हा रस उत्पन्न होतो. वरीलप्रमाणें ह्यालाहि कर्कश वर्ण लागतात.

उदा०—आली झाली विषाची लाट! गवताच्या गर्दीतून हा विषारी बाण सणाणतो आहे! क्रोधानें इतका दुमडला आहे कीं श्वास घेण्यास त्याला फुरसत नाहीं. नुसता फणकारा चालला आहे. अखिल ब्रह्मांडांतील क्रूरता, दुष्टपणा, हिंस्रता एकवटून तुमचे पुढें स्वारी खडी आहे.

**अद्भुत रस:**—देवाचें अचानक येणें, स्वर्गांतून एकदम उतरणें व एकदम अदृश्य होणें, मृतास एकदम जीवंत करणें, अकस्मात् आकाशवाणी होणें इत्यादि अद्‌भुतरसाचे विषय आहेत. अकस्मात् घडून आलेल्या बनावानें

आश्चर्य वाटतें व त्यामुळें हा रस उत्पन्न होतो. ह्यालाहि कठोर वर्णांची जरूरी लागते.

उदा०—**तव नानावर्ण कमलवनें। विकासलीं तैसीं अर्जुने**
**डोळां देखिलीं आलिंगणें। आदित्याचीं जैशीं**

**बीभत्स:**—एरंडेल पाहिल्या बरोबर मनुष्याची जशी भावना होते, गिळगिळित वस्तूस हात न लावण्याची प्रवृत्ति, घाण, खरूज इत्यादि रोगांपासून दूर राहाण्याची प्रवृत्ति, हे बीभत्सरसाचे विषय होत. शिवीगाळ, शपथा, शाप वगैरे देण्यानें बीभत्सरस उत्पन्न होतो. कोणत्याहि गोष्टीनें किळस उत्पन्न झाली म्हणजे हा रस उत्पन्न झाला असें समजावें. ह्यालाहि कठोर वर्णांची जरूरी लागते.

**वरोवरी दिसे वैभवाचें। अंतरीं पोतडें नरकाचें**
**जैसें झांकणें चर्मकुंडाचें। उघडितांचि नये।**

**उदात्त:**—मनाचें औदार्य, वर्तनाचें गांभीर्य, सद्गुण, सद्वृत्ति ह्यांचें माहात्म्य वगैरे उदात्तरसाचे विषय होत. मनाला दुसऱ्याचे हे वरील गुण पाहून जो परिणाम होतो तेव्हां उदात्त रस उत्पन्न झाला असें समजावें.

उदा०—**न दिसणें दिसणेंनसि मालववि**
**दोहों झाकलें सैंघ पद्यलवी**
**काहीं बोलो आघवीं। उखाचि ते आनी**
**तो अहोरात्राचा पैलकडु। कोणें देखावा ज्ञानमार्तंडु**
**प्रकास्येंवीण सुरवाडु। प्रकाशाचा.**

**शांतरस:**—पुढील ओवींत शांतरसाचें उदाहरण आहे.

**जो सर्वां भूतांचे ठायीं। द्वेषातें नेणेंच कांहीं। आपपरू नाहीं। चैतन्या जैसा॥**

## अभ्यास

**१. काव्याच्या व्याख्या पुढें दिल्या आहेत त्यांची चर्चा करून त्यांपैकीं तुम्हांस कोणती व्याख्या पसंत आहे ती सांगा; किंवा तुम्ही काव्याची व्याख्या काय कराल ती सांगा.**

(१) काव्य म्हणजे वृत्तानें बांधलेली वाक्यरचना.

(२) रसानें परिपूर्ण असें जें वाक्य तें काव्य.

(३) दोषरहित गुणपरिपूर्ण असे जे शब्द व त्याचे अर्थ यांना काव्य म्हणतात. त्यांत अलंकार असो किंवा नसो.

(४) भावनांचा, विकारांचा आविष्कार ललित अशा शब्दानें जेथें केला जातो तेथें काव्य तयार होतें.

२. काव्याचे प्रकार सांगा. महाकाव्याचे गुणदोष कोणते ?

३. महाकाव्य व त्रुटित भावनाकाव्य ह्यांत चांगलें कोणतें व कां ?

४. यमकाचा व वृत्ताचा फायदा काव्याला काय होतो ? निर्मयक काव्य म्हणजे काय ?

५. लढाईचें वर्णन कोणत्या वृत्तांत व कोणत्या स्वरूपाच्या शब्दांत केलें तर योग्य दिसेल ?

६. आधुनिक कवींनीं कोणकोणती नवीं वृत्तें प्रचारांत आणिलीं ?

७. ज्या शब्दांच्या उच्चारावरून त्यांचा अर्थबोध होतो असे कांहीं शब्द सांगा.

**अलंकार** :—(१) उपमा, रूपक, व साधी तुलना यांतील फरक स्पष्ट करा.

(२) व्यापारांत भरती ओहोटी अशी चालावयाचीच; त्याची जीभ मोठी चावरी आहे; त्याची लेखणी मोठी धांवती (किंवा तिखट) आहे; या वाक्यांतील अलंकार स्पष्ट करा.

(३) लक्षणा वृत्तीचें सामर्थ्य किती आहे तें सांगा.

(४) अलंकाराच्या मुळाशीं वक्रोक्ति आहे का अतिशयोक्ति आहे ?

(५) अनुप्रासाचीं कांहीं उदाहरणें द्या व त्यांच्या मर्यादा सांगा.

(६) शब्दालंकार व अर्थालंकार ह्यांमधील फरक स्पष्ट करा.

(७) अलंकार म्हणजे काय हें सांगा. चार अलंकारांचीं उदाहरणें देऊन त्यांमधील अलंकाराची स्पष्टता करा.

## ६. काव्यसमीक्षण.

इतर वाङ्मयप्रकार आणि काव्य यांतील मुख्य फरक म्हटला म्हणजे काव्याची तालबद्ध किंवा छंदोबद्ध रचना. छंदामध्यें लिहिलेलें सर्व लेखन काव्य असत नाहीं; परंतु काव्य हें मात्र छंदोबद्ध असलें पाहिजे असा नियम

समजण्यास हरकत नाहीं. या तालामुळेच कोणतेंहि काव्य कमीज्यास्त प्रमाणांत गाऊन दाखवितां येतें. गाऊन दाखविता येण्याजोगी रचना म्हणजेच गेयता. हें काव्याचे पहिले लक्षण आहे.

परंतु नुसती गेयता किंवा तालबद्ध रचना असून भागत नाहीं. ‘ चांदोबा चांदोबा भागलास का। निंबुणीच्या झाडावर बसलास कां।’ अशासारखीं लहान मुलांकरितां रचिलेलीं गाणीं किंवा ‘पहिला माझा नेम। पहिली माझी ओवी ॥ तुळशीखालीं राम। पोथी वाची ॥’ अशासारख्या मुलींच्याकरितां रचिलेल्या ओव्या ही तालबद्ध रचना असली तरी याला काव्य म्हणतां येत नाहीं; किंवा गवई लोक गातात त्या चीजा आणि नाटकांतील पदें हीं गेयप्रधान असलीं तरी त्यापैकीं सेवच काव्य या सदराखालीं येणार नाहींत. याचें कारण काव्यामध्यें तालबद्ध रचनेप्रमाणेंच अर्थाला प्राधान्य असतें.

इतर लेखकाप्रमाणेंच कवीला कांहीं सांगावयाचे असतें. पण त्याचे विषय आणि ते सांगण्याचे मार्ग भिन्न असतात. आपण उदाहरणाकरितां ‘फूल’ किंवा ‘इन्द्रधनुष्य’ घेऊं. सामान्य लेखक फुलाचें किंवा इन्द्रधनुष्याचे वर्णन बाह्यदृष्टीनें करील. अमुक एक फूल कोणत्या जातीचें आहे, त्याला पाकळ्या किती, त्याचा रंग कसा, तें कोणत्या ऋतूमध्यें जन्माला येतें वगैरे गोष्टींचें तपशीलवार वर्णन करील. परतु फूल किंवा इन्द्रधनुष्य पाहिल्याबरोबर कवीच्या सौंदर्यनिष्ठ दृष्टीला जो आनंद प्राप्त झालेला असतो तोच आनंद ती वस्तु समक्ष उपस्थित नसतांना वाचकाच्या अनुभवाला आणून देण्याचा त्याचा प्रयत्न असतो. सृष्टींतील सौंदर्य, मानवांतील, समाजांतील विविध भावनापूर्ण प्रसग याच्या योगानें कवीच्या संस्कारक्षम अशा मनावर जे ठसे उमटत असतात, त्याला जो आनंद होत असतो तोच आनंद तो वाचकाला देतो.

प्रत्येक कलावंताचे अंतिम साध्य हेंच असतें. चित्रकार, शिल्पकार आपापल्या कलेच्या द्वारें हाच आनंद संक्रमित करण्याचा प्रयत्न करीत असतात. प्रत्येकाचीं साधनें मात्र भिन्न. चित्रकार रंगाच्या साहाय्यानें, शिल्पकार पाषाणाच्या साहाय्यानें तर कवि शब्दांच्या साहाय्यानें हें कार्य करीत असतो. या साधनांना कलेचें माध्यम असें म्हणतात. कलावंत कवि हा फुलाचें नुसतें वर्णन देणार नाहीं तर तें वर्णन तो अशा प्रकारें देईल कीं ज्याच्यायोगानें त्याला प्रत्यक्ष

दर्शनानें जो आनंद झाला तोच आनंद थोड्याफार प्रमाणांत वाचकांना नुसतें काव्य वाचून व्हावा. त्याच्या दिव्य दृष्टीला जें सौंदर्य प्रतीत होत असतें ते तो शब्दांच्या साहाय्याने रंगवीत असतो. त्यानें काढलेल्या शब्दचित्रापासून आपणाला तोच आनंद प्राप्त व्हावा असा कवीचा हेतु असतो.

हीं शब्दचित्रें काढण्यास कवीला उज्ज्वल प्रतिभा लागते. जगामध्यें वावरत असतांना कवि निरनिराळीं दृश्यें पाहतो, त्याला निरनिराळे अनुभव येतात, निरनिराळ्या प्रसंगांनीं त्याच्या भावना जागृत होतात आणि अशा तऱ्हेनें त्याच्या अंतःकरणांत अगणित कल्पनाचित्रांचा संग्रह तयार झालेला असतो. वाचकांनाहि हे अनुभव आलेले असतात आणि त्यांच्याहि मनांत हीं कल्पनाचित्रें असतातच. वाचकांच्या जवळ ही कल्पनाचित्रांची सामुग्री नसेल तर काव्यापासून त्याला यथायोग्य आनंद प्राप्त होणार नाहीं. काव्य हें या कल्पनाचित्राची स्मृति करून देतें आणि काव्यापासून चेतना मिळाल्यामुळें अशीं कल्पनाचित्रें वाचकाच्या मनश्चक्षूंपुढे उभीं राहिलीं म्हणजे त्याला काव्यवाचनापासून आनंद होतो.

आपल्या मनात असणाऱ्या भावना किंवा प्रतीत होणारें सौन्दर्य वाचकांना शब्दाच्या साधनानें कळविणें हीच कवीची कला आणि काव्यापासून चेतना मिळाल्याबरोबर सदृश चित्रें मनापुढें आणून त्या भावना किंवा तें सौंदर्य यांचा कल्पनामय आस्वाद क्षणभर घेणें हाच काव्यानंद. तसेंच हीं कल्पनामय चित्रें काव्याच्या द्वारा कवि कशीं उभीं करतो, कोणकोणत्या गोष्टींची मदत घेतो वगैरे पाहणें यालाच काव्यसमीक्षण म्हणतात.

गेयता हें काव्याचें प्रमुख लक्षण आहे हें मागें सांगितलेंच आहे. विषयाला अनुरूप अशीं वृत्तें, चाली वगैरे योजणें आवश्यक असतें. मराठीमध्यें अन्त्ययमक सर्वत्र आढळतें. कांहीं थोडी कविता निर्यमक आहे. शब्दांचे अनुप्रासादि जे इतर अलंकार आहेत त्यांच्या योगानें काव्यांतील गेयतेला मदतच होते. परंतु या शब्दालंकाराचा अतिरेक होऊं देतां कामा नये. अन्त्ययमकाच्या नादीं लागल्यामुळें मोरोपंतांच्या कित्येक आर्या नीरस झाल्या आहेत. योग्य मर्यादेंत शब्दालंकार वापरणें काव्याच्या सौंदर्यास पोषकच होतें.

शब्दालंकारांप्रमाणेंच अर्थालंकारहि काव्यसौंदर्यास पोषक असतात. पण हे अलंकार आहेत, काव्याचें शरीर नव्हे, आत्मा तर नव्हेच नव्हे, ही जाणीव ठेवून त्यांचा उपयोग केला पाहिजे. अर्थालंकारांपैकीं बरेचसे अलंकार साहृश्य किंवा विरोध यांवर अवलंबून असून त्यांपैकीं उपमा हा अलंकार प्रमुख आहे. कल्पनामय चित्रें वाचकांच्या डोळ्यांपुढें उभीं करण्यास कवीला या अलंकारांचा फार उपयोग होतो. दोन वस्तूंमधील सौंदर्ययुक्त साम्य शोधून काढण्यास तरल कल्पनाशक्ति व सूक्ष्म अवलोकन लागतें. भिन्न वस्तूंमधील साम्य आणि तेहि सौंदर्ययुक्त हुडकून काढणें हें कसब कवीखेरीज कोणाला साधत नाहीं, आणि कल्पनामय चित्रें निर्माण करण्याचें हें प्रमुख साधन आहे. फुलाप्रमाणें नाजूक, सिंहासारखा शूर, गाईसारखा गरीब इत्यादि व्यवहारांतील उपमा घ्या. त्या वाचतांच फूल, सिंह, गाय इत्यादिकांचीं चित्रे आपल्या डोळ्यांपुढें उभीं राहतात.

अशा तऱ्हेचीं कल्पनामय चित्रें गेय व सुंदर भाषेच्या साहाय्यानें निर्माण करणें एवढाच कवीचा हेतु नसतो. नुसत्या चित्राच्या योगाने वाचकाला आनंद होणार नाहीं. आपल्याला सहानुभूति वाटल्याखेरीज आपण दुसऱ्याच्या सुखदुःखाचे भागीदार होत नाहीं. कवीला हे पूर्ण माहीत असतें आणि म्हणून तो वर्ण्य विषयासंबंधीं वाचकांच्या मनांत सहानुभूति निर्माण करीत असतो. ज्या तऱ्हेचा अनुभव कवीला आलेला असतो किंवा जीं दृश्यें कवीनें पाहिलीं असतील, तत्सदृश अनुभव वाचकालाहि आलेला असतो. अनुभव जागृत झाला म्हणजे वर्ण्य विषयाबद्दल वाचकाला सहानुभूति वाटूं लागते आणि अशी सहानुभूति निर्माण झाली म्हणजे काव्यानंद प्राप्त होतो. ना. वा. टिळक यांची 'केवढे क्रौर्य हे' ही कविता उदाहरणार्थ घेऊं. एक पक्षिणी उरीं बाण लागून घायाळ झालेली आहे; ती तशा स्थितींत आपल्या पिलांची शेवटची भेट घेण्याकरितां घरट्याकडे येते. भेट झाल्यानंतर तिचें प्राणोत्क्रमण होतें. असा एकंदर कवितेचा सारांश आहे. झाडावर असलेलें पक्ष्याचें घरटें, त्यांत किलबिल किलबिल करणारीं पिलें, संध्याकाळच्या वेळीं घरट्याकडे परत फिरणारे पक्षी इत्यादि चित्रें आपल्या डोळ्यांपुढें उभीं राहतात. पक्ष्याबद्दल आपल्याला जी सहानुभूति वाटत असते, ती जागृत होते आणि कवितेंत वर्णिलेल्या पक्षिणीबद्दल अनुकंपा वाटूं लागते. ज्या मानानें आपल्या या भावना तीव्र होतील त्या मानानें काव्यानंद अधिक. वृत्तयोजना, अलंकाराचा उपयोग, शब्दांची निवड, कल्पना-

मय चित्रे जागृत करणे इत्यादि सर्व युक्त्याप्रयुक्त्या ही सहानुभूति वाचकां-मध्यें निर्माण करण्याकरितां कवि उपयोगांत आणीत असतो. या सहानुभूती-मधूनच काव्यानंदाचा लाभ होतो.

जगांत वावरत असतांना कवीच्या मनावर भलेबुरे असे संस्कार होत असतात. जगाचा त्याला बरावाईट अनुभव येत असतो. मानवी स्वभावाची पारख तो करीत असतो आणि त्यासंबधीं त्याची एक विशिष्ट प्रकारची दृष्टि बनत असते. आजूबाजूला दिसणारें जग त्याला असमाधानकारक वाटते. त्याच्या दिव्य दृष्टीला एक निराळेंच जग दिसूं लागतें. व्यावहारिक जगांत दिसून येणाऱ्या उणीवा त्याच्या या कल्पनासृष्टींतील जगामध्यें पूर्ण केलेल्या असतात. प्रत्येक व्यक्तीचेच असे एक कल्पनानिर्मित जग असतें. हे जग आणि व्यावहारिक जग यांमध्ये एक प्रकारचा झगडा चालू असतो. जग आहे कसें आणि असावे कसें हे कवि स्वतःच्या दृष्टीने सांगत असतो. त्यावरून कवीची जीवनाकडे पाहण्याची दृष्टि आपल्याला कळून येते. ही दृष्टि जितकी व्यापक आणि उदात्त असते त्यामानाने त्याचें काव्य उत्कृष्ट किंवा निकृष्ट ठरत असते.

मानवी जीवनाबद्दलची त्याची ही दृष्टि कवि साक्षात् न सांगतां पर्यायानें सुचवीत असतो. तो आपल्या काव्याला अशा तऱ्हेचे विषय निवडीत असतो कीं ज्या योगानें ही त्याची दृष्टि स्पष्ट होईल. आंग्लकवि वर्ड्स्वर्थ याची निसर्गा-संबंधीं विशेष आस्था प्रसिद्धच आहे. परंतु ही त्याची दृष्टि निरनिराळ्या गीतां-मधून विविध तऱ्हेनें प्रतीत होते. कोणाला लहान मुलाबद्दल विशेष प्रेम वाटतें. निसर्गाकडे पाहाण्याची दृष्टि कित्येक कवींची विशिष्ट प्रकारची असते. ऐतिहासिक विषयाकडे कांहीं कवींचा ओढा असलेला दिसून येतो. कित्येकांना जीवितांत अर्थ वाटत नाहीं. त्यांच्या काव्यामधून पदोपदीं निराशेचे पडसाद ऐकूं येतात. याच्या उलट जगांतील संकटांशीं झुंजण्यांत कित्येकाना आनंद वाटतो. कौटुंबिक वातावरण कित्येक कवींना मोह पाडतें तर कित्येक प्रेमविषयक गीतें गाण्यांत काव्याची इतिकर्तव्यता आहे असें मानतात. ही जी प्रत्येक कवीची विशिष्ट दृष्टि असते ती पाहणें बोधप्रद असते. त्या त्या कवींच्या काव्याची संगति आणि त्यांतील रसास्वाद ही दृष्टि पूर्णपणें समजल्यावांचून होत नाहीं. तेव्हां कोणत्याहि कवींचें काव्य वाचतांना तसा प्रयत्न अवश्य करावा.

काव्यसमीक्षण करतांना खालील गोष्टी लक्षांत ठेवाव्यात :—

( १ ) काव्याला निवडलेला विषय किंवा मुख्य कल्पना कशा प्रकारची आहे ?

( २ ) कवीनें भाषा, वृत्त, चाल कोणत्या प्रकारचें वापरलें आहे ? मूळ कल्पनेला तीं कितपत पोषक आहेत ?

( ३ ) मूळ कल्पनेचा विस्तार कवीने कसा केला आहे ? तसें करतांना कोण-कोणत्या प्रयुक्त्यांचा अवलंब केला आहे ?

( ४ ) यमक—अनुप्रासादि शब्दालंकार आणि उपमा—उत्प्रेक्षादि अर्थालंकार कोणकोणते वापरले आहेत ? त्यावरून कवीचे भाषाप्रभुत्व आणि तरल कल्पनाशक्ति कशी दिसून येते ?

( ५ ) निसर्ग, लोकव्यवहार, जग व मानवी जीवन यासंबंधीं कवीची दृष्टि कोणत्या प्रकारची आहे ?

# अर्वाचीन मराठी

## भाग २

## मराठी भाषा

### उत्पत्ति



**१ मराठी भाषेचा प्रांत :—**मराठी भाषा ज्या प्रांतांत बोलली जाते त्याचा विस्तार मोठा आहे. ठोकळ मानानें सातपुड्यापासून खालीं कावेरी नदीपर्यंतचा पश्चिमेकडील प्रांत मराठी भाषेने व्यापिला आहे. कोंकणपट्टीच्या उत्तरेकडील दमण ह्या पोर्च्युगीज बंदरापासून तों दक्षिणेकडील गोव्यापर्यंतचा सर्व पश्चिम समुद्रकिनारा ही मराठी भाषेच्या प्रांताची पश्चिमेकडील मर्यादा होय. उत्तरेकडील मर्यादेवर दमणगंगा ही नदी आहे. वऱ्हाड व नागपूर ह्या प्रांतात बऱ्याच ठिकाणीं मराठीच बोलली जाते. वऱ्हाडांतील चार जिल्हे व नागपुरांतील दोन जिल्हे ह्यांत मराठी भाषा बोलतात. हैद्राबाद संस्थानांतील पश्चिम भागांतील बोलभाषा मराठीच आहे. माहूर, नांदेड, देगलूर, नलदुर्ग, हीं ठिकाणें त्यांपैकीं मुख्य होत. विजापूर, बेळगांव प्रांतांतील निम्मा अधिक भाग मराठीचा आहे. अक्कलकोट, फलटण, कोल्हापूर, सांगली, मिरज ह्या संस्थानांत मराठी भाषा चालते. हा सर्व मराठी भाषेचा प्रांत झाला. ह्याशिवाय मराठ्यांचे राज्य असतांना त्यांनीं उत्तरेकडे व दक्षिणेकडे जेथें जेथें मुलुख जिंकिला व लहान लहान राज्यें स्थापिलीं तेथें तेथे त्याची मराठी भाषाच चालू राहिली. उत्तरेकडील ग्वाल्हेर, इंदोर, धार, देवास, पश्चिमेकडील बडोदा, दक्षिणेकडील तंजावर ह्या ठिकाणीं मराठी भाषा बोललेली आढळते.

**२ महाराष्ट्रांतील लोक :—**महाराष्ट्रांत निरनिराळ्या जातींचे, निरनिराळ्या धर्मांचे पुष्कळ लोक जरी असले तरी महाराष्ट्र हा देश मराठ्यांचा आहे. तेव्हां

मराठ्यांचीच लोकवस्ती सर्वांत अधिक असणार हें उघड आहे. मराठे हे लोक फार प्राचीन काळीं उत्तरेकडून दक्षिणेत येऊन स्थायिक झाले. ह्यांतील पुष्कळ घराणीं उत्तरेकडील रजपूत क्षत्रिय घराण्यांपैकीं आहेत. खेडेगावांतील बहुतेक मूळचे वतनदार लोक मराठे आहेत. मराठ्यांमध्ये लहान लहान पुष्कळ गट आहेत. कुणबी हे त्यांतील मुख्य होत व ते शेतीवर उपजीविका करितात. मराठ्यांपैकीं काहीं वतनदार, इनामदार, वगैरे पूर्वीच महत्त्व मिळविलेले असे आहेत. पूर्वी एकेकाळीं ह्यानीं महाराष्ट्रांत असलेलें दण्डकारण्य नाहींसें करून येथे वसाहत केली आणि पुष्कळ दिवस राज्यकारभार केला. मराठ्यांची भाषा अर्थातच मराठी होय. महाराष्ट्रातील दुसरा मोठा वर्ग म्हटला म्हणजे ब्राह्मण होय. मराठ्याचीं धार्मिक, लेखन वगैरे कृत्यें ह्या वर्गाकडून होतात. ह्यानींहि पूर्वी मराठ्यांच्या राज्यांत मुत्सद्देगिरी केली. हेहि मूळचे उत्तरेकडील आर्य ब्राह्मणापैकीं होत. ह्याशिवाय महाराष्ट्रातील वसतीपैकीं धंदेवाले कारागीर वर्ग हा आणखी एक वर्ग होय. सोनार, सुतार, लोहार, कुंभार वगैरे धंदेवाले ह्या वर्गांत येतात. ह्यांचीही लोकसंख्या मोठी आहे. ह्याचीहि भाषा मराठी आहे.

हे वर सागितलेले हिंदुधर्माचे लोक आहेत. ह्याशिवाय महाराष्ट्रांत मुसलमान लोकहि पुष्कळ आहेत. ह्यांची भाषा उर्दू आहे खरी परंतु तिच्यात मराठीचे वळण दिसून येतें. कोंकणमधील मुसलमान लोक मराठी भाषा चांगल्या तऱ्हेने बोलतात.

महाराष्ट्रात अस्पृश्य मानल्या गेलेल्या जातींचीहि वसाहत आहे. त्यांत मुख्यतः महार, मांग, चांभार, वगैरे जाती येतात. हे सर्व महाराष्ट्रांतील मूळचे राहणारे असावेत. ह्याची भाषाहि मराठी आहे.

महाराष्ट्रांत पूर्वीच्या मूळच्या ह्या देशांतील लोकांची वसती थोडीबहुत आहे. भिल्ल, कोंड, कातकरी ह्या रानटी जाती त्यापैकीं मुख्य होत. ह्यांची कांहींची भाषा कानडी वगैरे द्राविडी व कांहींची गुजराती आहे.

**३ मराठीच्या पूर्वीच्या भाषा:**—मराठी ही आर्यभाषांपैकीं एक भाषा आहे. फार फार प्राचीन काळीं आर्यांची बोलण्याची भाषा संस्कृत होती. संस्कृत भाषेचा पुढें काहीं काळानें लोप झाला व तिचें रूपांतर कालपरत्वें निरनिराळ्या प्राकृत भाषांमध्यें झालें. ह्या प्राकृतभाषांपैकीं जी प्राकृत ज्या प्रांतांत बोलली जात

असे त्या प्राकृतभाषेस त्या प्रांतावरून नाव दिलें गेले. प्राकृतभाषापैकीं मुख्य प्राकृतभाषा **महाराष्ट्री, शौरसेनी, मागधी** व **पैशाची** ह्या होत. ह्याशिवाय **पाली** आणि **अर्धमागधी** ह्या दोन प्राकृतभाषा होत्या. महाराष्ट्रात जी प्राकृत वापरांत होती ती महाराष्ट्री, शूरसेनाच्या राज्यांत जी बोलली जात असे ती शौरसेनी, मगध प्रांतांत जी वापरली जाई ती मागधी, पिशाचपुर ( पेशावर ) वगैरे प्रांतांत जी प्राकृत रूढ होती ती पशाची अशीं त्यांचीं नावें होतीं. पाली ही भाषा सर्व प्राकृतभाषांच्या अगोदरची असून ती बौद्ध धर्मवाङ्मयाची भाषा होती. महाराष्ट्री व मागधी ह्याच्या मिश्रणापासून जी भाषा उद्भवली ती अर्धमागधी प्राकृत होय, व ती जैनांच्या धर्मवाङ्मयासाठीं वापरली जात असे. ह्या मुख्य मुख्य प्राकृत भाषांशिवाय इतरहि काहीं प्राकृतभाषा रूढ होत्या. परंतु त्याचा उपयोग वाङ्मय लिहिण्याकडे कधीं न केल्यामुळे त्या फार महत्त्वाच्या नाहींत. मूळ संस्कृत ह्या भाषेपासून ह्या सर्व प्राकृतभाषा उत्पन्न झाल्या असे काहीं विद्वानाचे मत आहे. दुसरे कांहीं विद्वान असे म्हणतात कीं प्राकृतभाषा ह्या संस्कृत भाषेच्या बरोबरीनें लोकाच्या वापरांत होत्या. समाजांतील वरील दर्जाच्या लोकामध्यें संस्कृत ही भाषा रूढ होती व खालच्या सामान्य लोकांमध्ये प्राकृत त्याच काळात रूढ होत्या. ह्या प्राचीन काळच्या प्राकृतभाषांपासून पुढील महाराष्ट्री, मागधी, शौरसेनी, पैशाची वगैरे भाषा उत्पन्न झाल्या, अशा प्रकारचें काहीं विद्वानाचें मत आहे.

वैदिक भाषा ह्या इसवी सनापूर्वी ५००० पासून ३००० वर्षांपर्यंत सुरू होत्या. त्यानंतरचा संस्कृत प्राकृतभाषाचा काल येतो. संस्कृतमध्यें पुनः ब्राह्मणकाल, सौत्रकाल, पाणिनीकाल असे भाग पडतात. प्राकृतभाषांचा काळ इसवी सनापूर्वी १५०० ते इसवी सन १५० पर्यंत येतो. ह्या दीर्घ काळांत हिंदुस्थानांत प्राकृतभाषांचें वर्चस्व होतें.

प्राकृतभाषांच्या शेवट शेवटच्या काळांत अपभ्रंश नांवाची भाषा सुरू झाली. खिस्तीशकाच्या आरंभापासून ते इसवी सन १२०० पर्येत ह्या भाषेंत वाङ्मय लिहिले जात असे. आभीर म्हणून जी एक लोकांची जात होती त्या जातीची ही भाषा. हिंदुस्थानांत सध्यां निरनिराळ्या प्रांतांत गुजराती, सिंधी, राजस्थानी वगैरे बोली आहेत त्या सर्व ह्या अपभ्रंशभाषेपासून निघाल्या आहेत व ह्याच

कारणानें अपभ्रंशभाषेचें विशेष महत्त्व आहे. अपभ्रंशभाषेंतहि निरनिराळे किरकोळ प्रकार होते. ह्या भाषेची मुख्य खूण म्हटली म्हणजे 'उकार' ही होय. प्रथमा, द्वितीया ह्या दोन्ही विभक्तींचा प्रत्यय 'उ' हा आहे, क्रियापदांच्या प्रत्ययांमध्यें सुद्धां '**उकार**' फार येतो. ह्या भाषेला 'उकारबहुला' असें म्हणतात. मइं, हउं, अम्हइं, अम्ही, तहुं, तहु, तुहं, तुम्हं, मज्झुं, अम्हाणं, तुज्झुं, तुद्धु, तुम्हाणं, अशीं सर्वनामाचीं रूपे अपभ्रंशांत येतात.

क्रियापदाचीं रूपें पुढीलप्रमाणें आढळतात. वर्तमान—करमी, करंह, करहि; आज्ञार्थ,—करमि, करहं, करउ; परंतु भविष्य—करेसि, करेस, करेसइ–करेसंती; विध्यर्थ–करिज्जे, करिज्जह.

संस्कृत आणि प्राकृत ह्या भाषांत फार फरक आहे. संस्कृतमध्यें वर्ण पन्नास आहेत तर प्राकृतमध्यें चाळीस आहेत. ऋ, ऐ, औ, हे स्वर व ष्, श्, ञ्, ङ् न्, य् ह्या वर्णांचा उपयोग प्राकृतभाषांत केला जात नाहीं. प्राकृतभाषांत द्विवचन नाहीं. संस्कृतमध्यें जसे लिंगाचे ठरीव भेद आहेत तसे प्राकृतभाषांत नाहींत. संस्कृतमधील चतुर्थी विभक्ति प्राकृतमध्यें नाहीं. षष्ठी ही विभक्ति द्वितीया व इतर कांहीं विभक्ति यांच्यासाठीं वापरतात. सप्तमीसाठीं द्वितीया वापरतात. परस्मैपद व आत्मनेपद असे भेद काढून सर्व धातु एक परस्मैपदी समजले जातात.

पिता हा शब्द पिआ, आर्यपुत्र, पर्याय हे शब्द अज्जउत्त, पज्जाअ, कथा शब्दाचें कहा, अशीं रूपांतरें होतात. पंचमीचीं रूपें वच्छाओ, वच्छाउ, धणाओ, धणांऊ, रामादो, रामादु अशीं होतात. अहम्, वयम् बद्दल हगे हें सर्वनाम येतें. 'स्था' ह्या धातूचें 'चिठ्ठ' असें रूप होतें. 'ण' बद्दल 'न'; न्य, ण्य, ज्ञ, ह्या तिन्हीबद्दल ञ्ञ् येतो. 'ल' चा 'ळ' होतो. असे प्राकृतभाषांत फरक होतात. खालीं एक दोन वाक्यें निरनिराळ्या भाषांत दिलीं आहेत त्यावरून एक भाषा दुसऱ्या भाषेपेक्षां किती निराळी आहे हें स्पष्ट नजरेस येईल.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १ | **संस्कृत** | जनो | वृक्षात् | फलानि | गृण्हाति |
| | **पाली** | जनो | रुक्खा | फलाइं | गण्हाति |
| | **प्राकृत** | जणो | वच्छाहि | फलाइं | गेण्हइ |
| | **अपभ्रंश** | जणु | वच्छहे | फलाइं | गिह्णइ |
| | **मराठी** | जन | वृक्षाहून | फळें | घेतो. |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| २ **संस्कृत** | सागरः | उपरि | तृणं | धरति, | तले | रत्नानि | गालवति |
| **पाली** | सागरो | उपरि | तिणं | धरेति, | तले | रतनानि | गालेति |
| **प्राकृत** | साअरो | अवरि | तणं | धरइ, | तले | रअणाणि | घालइ |
| **अपभ्रंश** | सायरू | उवरि | तणु | धरइ, | तलि | रयणइं | घल्लइ |
| **मराठी** | सागर | वर | तण | धरतो, | तळीं | रत्ने | घालितो |

**४ मराठीची उत्पत्ति :—**मराठी भाषेच्या उत्पत्तिसंबंधीं विद्वानांमध्यें बराच मतभेद आहे. मराठी भाषा ही अमुक एका जुन्या भाषेपासून उत्पन्न झाली असें निश्चयानें सांगतां येत नाहीं. कांहीं विद्वान् लोक असें म्हणतात कीं मराठी भाषा ही वेदाच्या समकालीन किंवा वेदाच्याहि पूर्वी लोकांत चालू असलेल्या प्राचीन प्राकृतभाषांपासून निघाली. दुसरे कांहीं विद्वान् म्हणतात कीं मराठीस संस्कृतभाषेनें जन्म दिला. तिसरा एक पक्ष मराठी ही पाली ह्या भाषेची मुलगी मानतो. चौथा पक्ष मराठीची आई महाराष्ट्री नावाची प्राकृतभाषा समजतो. पांचवा एक पक्ष महाराष्ट्रीस तो मान न देतां अर्धमागधी नांवाच्या प्राकृत भाषेस देतो. ह्याशिवाय सहावाहि एक पक्ष आहे आणि तो मराठीची उत्पत्ति सर्वसामान्य प्राकृत-भाषांपासून मानतो. अशाप्रकारचें मतांचें वैचित्र्य आहे. मराठी भाषेच्या उत्पत्तिसंबंधीं हें मताचे वैचित्र्य कां असावें? इतर गुजराती, बंगाली, सिंधी, हिंदी वगैरे ज्या सध्यां बोली म्हणून रूढ आहेत, त्यांच्या उत्पत्तीच्या बाबतींत असें मताचें वैचित्र्य नाहीं. त्या त्या भाषेचें मूळ ठाम निश्चित रीतीनें सांगतां येतें. मग मराठीचीच स्थिति अशी कां ? ह्याचे कारण मराठी भाषेच्या व्याकरणाच्या निरनिराळ्या बाबतींत वर सांगितलेल्या भाषांचे अवशेष व त्यांचीं कांहीं चिन्हें आढळून येतात हें होय.

मराठीची उत्पत्ति सांगतांना आपणास मराठी भाषेचें व्याकरण तपासलें पाहिजे. व्याकरणांतील निरनिराळ्या बाबी कोणकोणत्या भाषांतून मराठींत आल्या हें सांगितलें म्हणजेच मराठीची मूळ जननी आपणास सांगतां येईल. मराठीचे वर्ण, विभक्तीचे प्रत्यय, क्रियापदाचे प्रत्यय, वाक्याचे प्रयोग, शब्द व त्यांचे अर्थ, लहान लहान अव्यये, सर्वनामांचीं रूपें, संख्याविशेषणे ह्या सर्व गोष्टी पाहिल्या पाहिजेत.

मराठीच्या उत्पत्तिसंबंधीं जीं निरनिराळीं मते पुढें आलीं आहेत तीं सविस्तर क्रमाने पुढें देऊन त्या प्रत्येक मतांत कमीपणा कोठें आहे तें देतों.

(१) एक मत असें आहे कीं वेदाच्या काळीं चालू असलेल्या प्राकृत बोलीपासून मराठी उत्पन्न झाली. वेदांमध्ये असे कांहीं प्रयोग व शब्दांचीं रूपें आढळतात कीं तीं संस्कृत भाषेच्या नियमाशीं जुळत नाहींत तर तीं प्राकृत भाषेंतील नियमांशीं जुळतात. परंतु हा पुरावा फार तुटपुंजा आहे. त्या प्राकृत बोलींचे अवशेष मराठींत उतरले आहेत एवढेच फार झाले तर त्यावरून म्हणतां येईल. मराठीस साक्षात् जन्म देणारी भाषा ही इतकी जुनी म्हणजे ५००० वर्षें होऊन गेलेली भाषा कशी ठरेल? त्या काळापासून तों मराठीचा जन्म होईपर्यंत मधील काळांत भाषेचीं स्थित्यंतरें कांहीं झालीं नाहींत कीं काय? तेव्हां हें मत मान्य करतां येत नाहीं.

( २ ) दुसरा एक पक्ष मराठीची साक्षात् जननी सस्कृत भाषा ही आहे असे मानतो. केवळ वर वर पाहिले तरी संस्कृत ही मराठीची साक्षात् जननी ठरत नाहीं. मराठी व संस्कृत ह्या दोन भाषांचें नातें अगदीं जवळचे असेल. संस्कृतचा बराचसा ठसा मराठी भाषेवर उठला आहे हेंही कबूल आहे. इतके असून ती तिची साक्षात् जननी ठरत नाहीं. संस्कृत व मराठी ह्या दोन भाषांच्या मध्यें भाषांचीं पुष्कळ स्थित्यंतरें झालीं. सस्कृत ही फार प्राचीन काळीं वापरांत होती, व तिच्या नंतर पुष्कळ काळांतरानें मराठी भाषा उत्पन्न झाली. ह्या दोन्हीच्या मधील काळात ज्या निरनिराळ्या भाषा सुरू होत्या, त्यांच्यापैकीं कोणापासून तरी मराठी ही उत्पन्न झाली असली पाहिजे.

( ३ ) मराठी भाषा पाली भाषेपासून निघाली असें एक पक्ष म्हणतो. तिण, पाऊस, पिळणें, छकडा, गूळ, अस्वल, रूख इत्यादि शब्द पालीमधून मराठींत आले आहेत. शिवाय मराठींत जो 'ळ' कार आहे तो पालीमधूनच मराठींत आला आहे. तेव्हां मराठी ही पालीपासून उत्पन्न झाली असे हा पक्ष म्हणतो. परंतु हीं जीं प्रमाणे दिलीं आहेत तीं फार थोडीं आहेत. अशीं थोडीं प्रमाणें इतर पुष्कळ भाषांची मराठींत सापडतात. म्हणून त्या सर्व भाषांना मराठीची जननी म्हणावयाचें कीं काय? ह्या वर दिलेल्या पुराव्यापेक्षां अधिक पुरावा पाहिजे.

( ४ ) पैशाची भाषेंतील 'ण' व 'न' ह्यासंबंधीं बदल मराठींत आढळतात म्हणून मराठी भाषा ही पैशाची भाषेपासून निघाली असें एक पक्ष म्हणतो.

ऊन, तहान, कान, रान, जानवें, सुनें इत्यादि शब्द पैशाची भाषेंतून मराठींत आले आहेत. परंतु पाली भाषेप्रमाणेंच हाहि पुरावा अपुरा आहे. त्यावरून पैशाची भाषा मराठीची जननी ठरत नाहीं. तसेंच मागधी भाषेप्रमाणें 'र' व 'स' ह्या दोहोंबद्दल 'ल' व 'श' हे वर्ण मराठींत येतात म्हणून मराठी ही मागधी भाषेपासून निघाली असेहि म्हणतां येत नाहीं.

(५) अर्धमागधी ह्या प्राकृत भाषेचीं चिन्हें मराठींत बरींच आढळून येतात म्हणून तिच्यापासून मराठी निघाली असा एक पक्ष आहे. कुमर, केले, खादिलें, मच्चइ, वच्चइ, डसइ, डाहइ, डोल्लइ, उरइ, डोहलअ, पण्णासअ, पनश इत्यादि. परंतु हीं चिन्हेंहि अपुरीं आहेत. ह्यांवरून मराठी अर्धमागधी भाषेपासून निघाली असें म्हणतां येत नाहीं.

(६) ह्या सर्व मतांशिवाय आणखीहि दोन मते आहेत. एक मत असें आहे कीं मराठी ही महाराष्ट्री ह्या प्राकृत भाषेपासून निघाली. व दुसरें मत असें आहे कीं मराठी ही अपभ्रंश ह्या नांवाच्या भाषेपासून निघाली; ह्या दोन्ही मतांत वरील सर्व मतांपेक्षां अधिक तथ्य आहे. मराठीचें व्याकरण जर तपासलें तर महाराष्ट्री व अपभ्रंश ह्या दोन्ही भाषांचे अवशेष मराठींत उतरलेले दिसतात. व्याकरणांत मुख्य बाबी दोन येतात. एक विभक्तींचे प्रत्यय व दुसरी बाब क्रियापदांचे प्रत्यय. ह्या दोन बाबींपैकीं मराठींतील क्रियापदांचे (काळ-अर्थांचे) प्रत्यय हे महाराष्ट्री भाषेमधून आले आहेत, तर शब्दांच्या विभक्तींचे प्रत्यय हे अपभ्रंश भाषेमधून आले आहेत.

त्याशिवाय इच्छार्थक धातु—बुभुक्ष्, चिकित्स्, ध्यास् ह्यांसारखे, मी ह्या सर्वनामांचीं सर्व रूपें, विशेषणाचा तारतम्याचा गुण, 'ल' हा प्रत्यय हे प्रकार महाराष्ट्री भाषेंतून मराठींत उतरले आहेत.

तसेंच, नामाचें एकवचनी उकारांत रूप, ऊन प्रत्ययांत धातुसाधित, भाववाचक नामाचा 'पण' हा प्रत्यय, सामान्यरूप साधण्याचा प्रकार, कांहीं छंद व अंत्ययमक हे सर्व अपभ्रंश भाषेमधून आले आहेत.

ह्या सर्व पुराव्यावरून असें दिसतें कीं 'मराठी' ही कोणत्या तरी एका प्राकृतपासून-महाराष्ट्री किंवा अपभ्रंश ह्यापासून-निघाली असें ठरत नाहीं. महाराष्ट्री व अपभ्रंश ह्या दोन्हीं भाषांचीं चिन्हें बरोबरीनें ज्याअर्थी आढळतात, त्याअर्थी

मराठी ही ह्या दोन्ही भाषांच्या मिश्रणानें उत्पन्न झाली असें ठरतें. महाराष्ट्रीपासून मराठीनें काळ, अर्थ वगैरे क्रियापदास लागणारे प्रत्यय उचलले, व अपभ्रंशापासून विभक्तीचे प्रत्यय उचलले. अशा रीतीनें मराठीच्या उत्पत्तींत ह्या दोन्ही भाषांचा सारखा भाग आहे. मराठी ही महाराष्ट्री व अपभ्रंश ह्या दोन भाषांपासून उत्पन्न झाली.

**५ मराठीचा उत्पत्तिकाल:**—मराठी भाषा ही कोणत्या मुख्य प्राकृत भाषांपासून उत्पन्न झाली हे वर सांगितलें. आतां मराठी भाषा केव्हां उत्पन्न झाली हें पाहूं. अमुक एक भाषा मृत झाली म्हणजे लगेच दुसरी भाषा उत्पन्न होते हें म्हणणें बरोबर नाहीं. एखादी भाषा मृत होण्याच्या अगोदर बरींच वर्षें दुसरी भाषा उत्पन्न होण्याची क्रिया हळूहळू सुरू असते. तेव्हां अमुक एक भाषा नक्की अमुक एका काळांत उत्पन्न झाली असें आपणास सांगतां येत नाहीं. मराठीच्या पूर्वीच्या भाषा महाराष्ट्री व अपभ्रंश ह्या होत. ह्या भाषांचा काल खिस्ती शकाच्या आरंभाचीं अजमासें पांचशे वर्षें हा होय. त्याच्याहि पुढे पुष्कळ वर्षें अपभ्रंश भाषा चालू होती व तिच्यांत वाङ्मय इ. स. १२०० पर्यंत तयार होत होतें; तेव्हां ह्या भाषांचा लोप केव्हां झाला तो काल आपणास मराठीची उत्पत्ति ठरवितांना फारसा उपयोगी पडणार नाहीं. म्हणून मराठींतील जुन्यांतील जुना लेख कोणत्या काळचा सांपडतो त्यावरूनच आपण मराठीचा उत्पत्तिकाळ ठरवूं.

१. मराठींतील सर्वमान्य पहिला ग्रंथ ज्ञानेश्वरी होय. हा ग्रंथ इ. स. १२९० सालीं ज्ञानेश्वरांनीं लिहिला. हा ग्रंथ फार उत्तम अशा मराठी भाषेंत लिहिला आहे. ह्या ग्रंथाच्या पूर्वी बराच काळ मराठी भाषा लोकांच्या वापरांत असली पाहिजे.

२. ज्ञानेश्वरीच्या अगोदरचें बरेंचसें मानभावी वाङ्मय आतां उपलब्ध झालें आहे. त्याच्याहि पूर्वींचे शिलालेख सांपडले आहेत. ज्ञानेश्वरीच्या अगोदरचा इ. स. १२८९ सालचा उनकेश्वराचा शिलालेख होय. ह्या लेखांतील आठ ओळी मराठी भाषेंत आहेत. त्यांतील कांहीं ओळी देतों.

"सरभंगाचा आश्रमा आले । सरभंगप्रीत्यर्थ हे उदक उप्ल केले
तो राम प्रासादु संपुर्णु जाला । तेयाचा नमस्कार हरीहरा"

ह्याच्या अगोदरचा इ. स. १२८५ सालांतील सासवड जवळील पूर येथील शिलालेख होय.

३. ह्याच्या अगोदरचा एक प्रसिद्ध शिलालेख पंढरपूर येथील चौऱ्यांशीचा हा इ. स. १२७३ सालांतील आहे. ज्यानीं विठ्ठलाच्या देवालयासाठीं वर्गणी दिली, त्यांच्या नांवांची यादी ह्या शिलालेखांत आहे. त्यांत पुढील वाक्य मराठी आहे.

"स्वस्ति श्री सकु ११९५ श्रीमुख संवत्सरे फागनिपुर श्री विठ्ठलदेवरायासी तिसा सिति फुलें दाडें आचंद्रार्क चालावेआ नानाभक्त मालिआं दत्त पैकाचा विवरू."

४. ह्याच्या पूर्वीचा शिलालेख 'नेवासें' येथील होय. तो इ. स. १२३९ सालांतील आहे. ह्याची भाषा संस्कृत मराठी मिश्र आहे.

"हे भूमि देवें पुरुषेण जीवणा दिधली." हें वाक्य त्यांत शेवटीं आहे.

५. ह्या लेखाच्या अगोदरचा म्हणजे अंबेजोगाई येथील शिलालेख होय. ह्याचें वर्ष इ. स. १२२८ हें आहे. ह्याला खोलेश्वराचा शिलालेख म्हणतात. ह्या लेखांत मधील ४–५ ओळी मराठी आहेत.

६. ह्याच्या पूर्वीचा शिलालेख खानदेशामधील चाळीसगांव जवळच्या पाटण येथील. हा लेख ज्ञानेश्वरीच्या पूर्वी ८४ वर्षें म्हणजे इ. स. १२०६ ह्या सालचा आहे. लीलावती नांवाच्या ग्रंथाचा कर्ता जो भास्कराचार्य त्याच्या नातवाच्या—चांगदेवाच्या—नांवानें हा लेख खोदविला आहे. ह्या लेखाची भाषा स्पष्ट आहे.

"इयां पाटणीं जें केणें उघटे तेहाचा असि आउं जो राउला होता ग्राहकापासी तो मठा दिन्हला। ब्राह्मणा जे विकते या पासी ब्रह्मोत्तर ते ब्राह्मणी दिन्हले ग्राहकापासी दामाचा वीसावो आसूपाठी नगरे दिन्हला।

"पांच फोफली ग्राहकापासी पहिलेआ घाणे आदाणाची लोटि मठा दिन्हली। जेती घाणे वाहति तेतीयां प्रति पली पलीतेला येथ (जे) मविजे मढीजेन मापें मवाव।"

७. ह्याच्या पूर्वीचा परळचा शिलालेख इ. स. ११८७ सालचा आहे. त्यांतील मराठी भाषा पुढीलप्रमाणें आहे.

" अथ तु जो कोणु हुवि शासन लो
पी तेया श्री वैद्यनाभ देवाची भाल सकुटुंबी आपडे. "

८. ह्या पूर्वीचा एक शिलालेख मोगलाईतील सावरगांव येथील इ. स. ११६४ सालचा व दुसरा पळसदेव येथील इ. स. ११५७ सालचा असे आहेत.

९. ह्या सर्वांच्या पूर्वीचा शिलालेख म्हैसूर संस्थानांतील श्रवणबेळगोळ येथील होय. ह्या लेखाचें साल इ. स. ९८३ हें आहे. हा ज्ञानेश्वरीच्या पूर्वी ३०७ वर्षांचा ठरतो. शिलेवर लिहिलेले पहिलें मराठींतील वाक्य ह्या लेखांत सांपडतें. ह्याला गोमतेश्वराचा शिलालेख म्हणतात. मराठीचें पहिलें वाक्य पुढीलप्रमाणें आहे.

" श्री चावुण्ड राजे करवियलें
गंगराजे सुत्ताले करवियले "

ह्या सर्व लेखांवरून असे म्हणतां येईल कीं मराठी भाषा इसवी सन ९८३ मध्यें अस्तित्वांत होती. मराठीचा जन्म ह्याच्याहि पूर्वी कांहीं वर्षें झाला असलाच पाहिजे. मराठी शब्द कांहीं जुन्या सातव्या शतकांतील शिलालेखांत आढळून येतात व मराठी लोक, व मराठी भाषा ह्यांचें वर्णन दुसऱ्या कांहीं जुन्या ग्रंथांत सांपडतें. त्यावरून असें म्हणतां येईल कीं **मराठी भाषा ही इसवी सनाच्या सुमारें सातव्या शतकांत जन्म पावली.**

मराठीचें पहिलें वाक्य ९८३ इ. सालांतील सांपडतें. मराठीचा पहिला सर्वमान्य ग्रंथ १२९० सालांतील सांपडतो.

**६ मराठीचे कालिक भेद** :—ज्याप्रमाणें भाषेचीं प्रांतवार निरनिराळीं रूपें होतात, तशीं तिचीं कालवार निरनिराळीं रूपें होतात. भाषेच्या जन्मापासून तों सध्यांच्या काळापर्यंत तिचें आयुष्य म्हणजे लहान काळ नव्हे. मराठी भाषेच्या जन्मापासून आतांपर्यंत जवळजवळ दीड हजारवर वर्षें झालीं. ह्या मोठ्या काळांत मराठी भाषेचें एकच स्वरूप कसें राहणार ? तसें एक स्वरूप राहणें शक्य नाहीं. साधारणपणें दर दोन दोनशें वर्षांनीं भाषेचें स्वरूप बदलतें असें विद्वानांचें मत आहे. त्या दृष्टीनें पाहिलें म्हणजे मराठी भाषेचीं आतांपर्यंत सहा सात रूपांतरें झालीं पाहिजेत. आजपर्यंतच्या तिच्या आयुष्यांतील

रूपांतरें पाहिलीं तर ह्या गोष्टीचा आपणांस पडताळा येतो. हीं रूपांतरें पुढील प्रमाणें ठरतात.

( १ ) पहिले रूप अगदीं मराठी भाषा जन्मास आली त्यावेळचे होय. ह्याला आम्ही मराठीचा आद्यकाळ असें म्हणतों.

( २ ) दुसरें रूप ज्ञानेश्वरांनीं ज्यावेळीं आपली ज्ञानेश्वरी लिहिली किंवा मानभावी कवींनीं आपलीं काव्यें लिहिलीं त्यावेळचें होय. ह्यावेळीं मराठी भाषा वऱ्हाडच्या आसपास अधिक बोलली जात होती. व त्या प्रांतावर यादव राजे राज्य करीत होते. ह्याला आम्ही यादवकाळ म्हणतों.

( ३ ) मराठीचें तिसरे रूप एकनाथ, दासोपंत वगैरे कवींच्या वेळचें होय. ह्या वेळीं मराठीचा विशेष प्रसार पैठण वगैर प्रांताकडे झालेला होता. ह्यावेळीं महाराष्ट्रावर बहामनी राजांचें राज्य होते. ह्याला आम्ही बहामनी काळ म्हणतों.

( ४ ) चौथें रूप, रामदास, तुकाराम वगैरे कवींच्या वेळचें होय. हा शिवकाळ होय.

( ५ ) पाचवे रूप मोरोपंत, वामन पंडित, श्रीधर, महिपती वगैरे कवींच्या वेळचे होय. ह्यावेळीं महाराष्ट्रात पेशव्याचा कारभार होता म्हणून हा पेशवेकाळ असें आम्हीं म्हणतों.

( ६ ) सहावें रूप अव्वल इंग्रजी काळातील होय. ह्या इंग्रजी काळात सुद्धां मराठीच्या रूपांत दोन तीन पोटभेद दिसून येतात.

(अ) एक अव्वल इंग्रजींतील साधे रूप. ह्या काळात बापू शुक्ल, छत्रे, कीर्तीकर, दादोबा पांडुरंग, जांभेकर, फडके वगैरे लेखक होते. या वेळीं मराठी भाषेचें साधें, सरळ, असें स्वरूप दिसून येते.

(आ) ह्याच्या थोडासा पुढचा काळ म्हणजे लोकहितवादी, चिपळूणकर, जोतिबा फुले, आगरकर, टिळक वगैरे गद्यलेखकांचा होय. अव्वल

इंग्रजींतील साधें शालेय वळण नाहींसें होऊन तिला सुसंस्कृत भारदस्त असें वळण आलेलें दिसते. ह्या काळांत मराठी भाषेवर संस्कृत भाषेचे वर्चस्व फार पडले.

( इ ) तिसरें रूप म्हणजे सध्यां चालू असलेले मराठीचें रूप होय. ह्या रूपाला आम्ही "आधुनिक मराठी" असें नांव देतों. ह्या आधुनिक काळांतील लेखक म्हटले म्हणजे न. चिं. केळकर, वा. म. जोशी, फडके, बेहेरे, खांडेकर, अत्रे, वरेरकर हे होत.

१. **यादवकालीन मराठी** :—मराठी भाषेच्या जन्मानंतरचा पहिला कालखंड यादवकाल हा होय. हा काळ अजमासे शंभर वर्षांचा धरिला आहे. ह्या कालांत महाराष्ट्रांतील मराठी भाषेच्या मुख्य प्रांतावर यादवाचे राज्य होते. मराठी भाषेला यादव राजाचा आश्रय होता. मराठी भाषेचे लेखक व कवि हे यादवराजाच्या पदरीं असत. भिल्लम, शारंगधर, जयन्तपाळ, सिंघण, कन्हर, महादेव, रामदेव हे सर्व राजे विद्येचे व मराठी वाङ्मयाचे पुरस्कर्ते होते. ह्याच काळात हिंदु सनातनी धर्माचे कट्टे कैवारी निवृत्तिनाथ, ज्ञानदेव, सोपानदेव, मुक्ताबाई हे योगी व वेदांती होऊन गेले. ह्याच काळांत विठ्ठलाचे संत नामदेव व त्याचे कुटुंब, गोरा कुंभार, सावता माळी, विसोबा खेचर, नरहरि सोनार, बंका महार, चोखा मेळा, परसा भागवत, सजन कसाई, कान्हो पात्रा, सेना न्हावी वगैरे होते. हे सर्व संत सनातनी धर्माचे उपासक, भक्तिमार्गाचे वारकरी. ह्याशिवाय मानभाव धर्माचे उपासकहि ह्या यादवांच्या काळात होऊन गेले. सनातनी हिंदुधर्मांतील काहीं तत्त्वांबद्दल मतभेद होऊन त्याविरुद्ध प्रचार जरी त्यानीं केला, तरी मानभावी साधुसंतांनीं मराठी भाषेची सेवा पुष्कळ केली. त्याचें वाङ्मयहि नावाजण्यासारखें आहे. मानभावांचा संस्थापक चक्रधर, त्याचे शिष्य नागदेव, महींद्रव्यास, भास्कर व्यास, भावे व्यास, आनेराज व्यास, हे त्यामध्यें प्रमुख होत. महदाईसा नावाची चक्रधराची एक शिष्या होती, तिनेंहि थोडीबहुत काव्यरचना केली आहे.

ह्या यादवकाळात मराठी भाषेचा पुरस्कार चांगला झाला. विद्वानांनीं तिची सेवाहि चांगली केली. ह्या काळांत लिहिलें गेलेलें वाङ्मय जर पाहिलें तर

आश्चर्य वाटतें. इतर कोणत्याहि काळचें वाङ्मय यादवकाळांतील वाङ्मयाच्या तोडीस येऊं शकत नाहीं. प्रभाव, सौंदर्य, गांभीर्य, प्रसाद, भूषण, लालित्य वगैरे गुणांनीं ह्या काळची मराठी भाषा दिपवून सोडते. भाषेचे स्वरूप प्रबुद्ध, प्रशांत व प्रौढ असे आहे.

यादवकालीन मराठी भाषा कोणत्या स्वरूपाची होती हे खालीं दिलेल्या उताऱ्यावरून दिसून येईल.

( १ ) शंकरोक्तीवरी। माझी बोलली वैखरी। म्हणोनि धरावी चतुरी। शास्त्र-बुद्धि ॥ अहो युक्तिचेनि प्रसंगे । शास्त्राते म्हणती उगे। तरी माझे बोल वाउगे। कां होतील पां ॥ जैसे आपुलेनि पवित्रपणें। लक्ष्मीयेसीं आणील उणें। म्हणोनी मस्तकी नारायेणे । तुळसी वंदीली ॥ विवेकसिंधुभीतरीं। जो मुमुक्षु अवगाहन करी। त्यासी श्रीहरी भेटे। साक्षात्कारे॥ विवेक सिंधुचीं शब्दरत्नें। कंठी धरीजे प्रयत्ने। तरी जनकाचेनि महिमाने । श्लाघ्यता पावे ॥ लवण समुद्रिची मुक्त भूषणें। होती कारु समस्ते । परी भुशीतया हीमीं मुक्तत्वें। विवेक सिंधुची कां ॥ ( विवेक सिधु )

( २ ) **मानभावी वाङ्मय—**

सर्वज्ञें भणीतिलें " इंद्रे ॐ गावानु वार्ता काइ मातु " ‘जी कांहीं नाहीं जी: सर्वज्ञें भणीतिलें ‘वार्ता केसी या काई नाहीं? राज्यांतरू जालें. रामदेवो रावो राज्यीं बैसला, आमणदेवा खालि उतरिला: देवगिरी पालटीली॥ तथाहा नव्हे लोकु पळतु असे: हा होए: जा वार्ता शोधा।

( ३ ) **पंचतंत्र—**

पिंगलकु पुसे। दमनकु सांगे। म्हणे कोणे एके नगरी। यज्ञदत्त नामें ब्राम्हणु असे। तो दुर्बलु। तयाते ब्राम्हणीने म्हणितले। तुम्हि कांहीं उदीम न करा। आम्ही अवघे भुकें मरत असों। तंव तो चहुंकडे हिंडो निघाला। वाटेस जाता येके अरण्यि पातला। तयासि तृषा लागलि म्हणोनि उदकाकारणे हिंडता तव एक अड देखिला। तणें झाकिला असे। तया आतु पाहे तंव देखिलें। व्याघ्रु सर्पु वान्नरु सोनारू। ऐसे चौघे तया अडामध्यें पडिले असेति.

पंचतंत्र ( तेरावें शतक )

(४) **ज्ञानेश्वरी**—( १२९० )

माझा मऱ्हाटाचि बोलु कवतिकें । परि अमृतातें ही पैजेसीं जींके । ऐसीं अक्षरें चि रसिकें । मेळवीन । १४ । जिये कोवलिकेचेनि पाडें । दीसति नादिचे तरंग थोकडे । वेधें परिमलाचें बीक मोडे । जेयाचेनि । १५ । आइका रसाळ-पणाचेया लोभा । किश्रवणिं चि होथि जीभा । बोलें इंद्रियां लागे कलभा । येकमेकां । १६ । साहाजे शब्दु तरि विषो श्रवणाचा । परि रसना म्हणे कां रसुचि आमुचा । घ्राणासि भावो जाये परिमलाचा । हा तोचि कां होईल । १७ ।

(५) **वेळापूर शिलालेख**—( १३०० )

स्वस्ति श्री शकु १२२२ सर्वरि संवत्सरे ज्येष्ठादौ श्रीमत्प्रौढ प्रतापचक्रवर्ति श्री राम–। चंद्रदेव विजय राज्योदथित दुपादपदुमोपजीवी सर्वाधिकारी श्री जोइदेव तं निरोपि । त ब्रह्मदे ३० राणे तद भ्रातर बाइ । दे३०राण माण देशा-संबंध वे–। लापुर तेथल धर्म स्थल वटे स्वराचे गुण मठअ केले वा वो वर बाइदेवें दत पाली तो स्वर्गा । जाए न पाली तो नरका जाए लेषक दामोदर पंडित मुत माइदेव मंगलं.

२. **बहामनीकालीन मराठी**:—यादव कालानंतर बहामनीकाल येतो. ह्यामध्यें २०० वर्षांचा काळ म्हणजे चौदा व पंधरा हीं दोन शतकें इतका धरिला आहे. ह्या काळात मराठी भाषेच्या मुलुखावर बहामनी राजांचा अमल होता. त्यांचाच वाङ्मयास कांहीं थोडा पुरस्कार असल्यामुळें आम्ही बहामनीकाल असें नांव दिले आहे. मराठ्यांची जी कांहीं छळणूक झाली तीहि ह्याच काळांत. व त्या छळामुळे मराठी साधुसंतांनी मराठी धर्माची व भाषेची जी आस्थेवाईक रीतीनें जोपासना केली तीहि ह्याच काळांत. बहामनी सुलतान सर्वच वाईट होते अशी वस्तुस्थिति नव्हती. कांहीं सुलतान हिंदु साधुसंतांचे शिष्य होते. कांहींना पंढरीच्या विठोबाच्या भक्तीचें वेड लागलें. कांहींचे भक्तीमुळें असाध्य रोग बरे झाले. बहुतेकांनीं आपले वजीर हिंदु नेमून मराठी भाषेस राजदरबारीं मान दिला.

ह्या काळांत पुष्कळ नाणावलेले कवि व साधुसंत होऊन गेले. नरसिंह सरस्वती, जनार्दनस्वामी, भानुदास, एकनाथस्वामी, दासोपंत, नाथांचे शिष्य

रेणुकानंदन, जनीजनार्दन, रामा जनार्दन, महालिंगदास, नरसिव्ह, रंगनाथ व विष्णुदास नामा वगैरे त्यांतील प्रमुख होत.

ह्या कालांत मराठी भाषेवर फारशी भाषेचा फार परिणाम झाला. रोजच्या भाषेंतील शब्दांपैकीं अर्धे शब्द फारशी येऊं लागले.

( १ ) **चोंभा–उषाहरण.** ( १५६५ )

तेथे कैसें काय वर्तलें । कैसी लावन्याची रासी । ती येथं पाहुनु उर्वसी । कैसा येकुची तापसु । पाहिं व रळेची तीयेसीं ॥ तीयेची पाहुनी रूपरेषा । काई-सीया सुरनायका । तीलोतमा । न पवे सरी नव्हे नव्हेची मना मेनीका । ऐसे रूपाचें लावण्य । पण उघडी वस्त्रहीण हातीं घेऊनीया आघाटी। फांकला रंग-ध्वनी आकर्पले त्रीभुवन । गीताचेन नादें । चरों विसरली स्वापदें । हरणी वोडवीले कर्ण । तीथैं राहिलीं नादबोधें.

( २ ) **पर्शुरामोपदेश**

गत तिथि दुणा । वारु चतुर्गुणा । नक्षत्र मेळविजे । ध्रुवक ४ मेळविजे । तिंहिंभागु । उरलये । शेषे लोह पाहिजे । एके जल । दोहो स्थल । शुन्य आकाश । स्थली सावली । जली आडाऊ । आकाशी सावलीये । आडाऊ तीर दार । हे जयेति आडवार । आदित्या पासौनु । नक्षत्रे ९ उत्तमे दाहावें उत्तम । तया पुढील २ उत्तमे । वरिल तिहीं खेळु पांडु १७ उत्तमें । वीसाठायीं चलाहे निर्व चैल ॥

( ३ ) **नागांव येथील शिलालेख**—( १४३५ )

आळावे या लागी आठागर समंध मुख्य नागवें आगरुपैकि कोतळवाडि १ नारदे कवळिआपेकि भाडाळि उरौ वाडिआ २ ससिम फळ भोगा सहित श्रीरायाजा प्रधानु सिहिप्रोविकति सडाउनि चिचवळिये चिये मिजिगति वर मीधा मळिया कातिळवाडी विक्रिता द्रामा १६० नारदे कवळिआ जिये भाट-ळिये विक्रिता द्रम ४०

( ४ ) **एकनाथ**—( १५७८ )

अर्जदास्त अर्जदार । बदंगी । बंदेनवाज अनेक सलाम । साहेबाचे सेवेसीं ।

बंदे शरीराकार । जीवाजी शेखदार । बुधाजी कारकुन । प्रगणे शरीराबाद । किल्ले कायापुरी । सरकार साहेबांची आज्ञा घेऊन स्वार जालों तो प्रगणे मजकुरीं येऊन सरकार काम करावयास लागलों.

३. **शिवकालीन मराठी :**—बहामनी कालानंतर शिवकाल येतो. हाहि काल शंभर वर्षांचा म्हणजे १६०० ते १७०० पर्यंतचा आहे. बहामनी कालांत व त्यापुढे मराठी भाषेवर फारशी भाषेचें जं वर्चस्व वाढत होतें त्याला शिव-काळांत थोडासा आळा बसला. मराठी भाषेतील फारशी शब्दांचा ओघ कमी करण्यासाठीं छत्रपति शिवाजीनें राजव्यवहारकोश रचण्याची आपल्या दरबारच्या रघुनाथपंडितास आज्ञा केली. जेथें जेथें राजदरबारांत फारशी शब्द येतील तेथें तेथें ते काढून त्यांच्या ऐवजीं संस्कृत शब्द घालावयाचे, अशा प्रकारची राजाज्ञा त्यांनीं काढली. अशा रीतीनें मराठी भाषेचें स्वत्व राखण्यासाठीं शिवाजीनें फार मेहनत केली. मराठी भाषेला एकीकडे राजाचा आश्रय व पुरस्कार होता. दुसरीकडे साधुसंतहि आपल्या बुद्धीच्या सामर्थ्याच्या जोरावर मराठी भाषेचे स्वत्व कायम राखण्याचा प्रयत्न करीत असत. शिव-कालातील मुख्य साधुसंत म्हटले म्हणजे रामदास व तुकाराम हे होत. राम-दासाच्या दासबोधाने तर सर्व महाराष्ट्र देश हलवून सोडला. तुकारामाच्या अभंगानीं समाजातील वरच्या थरामधील वेदविद्या अगदीं थेट खालच्या थरावरील लोकांत नेऊन पसरविली व अशा रीतीनें मराठी भाषेचा दर्जा वाढविला. तुकाराम रामदासाशिवाय मुक्तेश्वर, वामन पंडित, रमावल्लभदास, शिवकल्याण, मोरया गोसावी, दासपंचायतनांतील रंगनाथस्वामी, आनंदमूर्ति, केशवस्वामी, विठ्ठल वगैरे कवि साधुसंत आपापल्या परीने मराठीची जोपासना करीत होते. शिवकालांतील भाषेचें स्वरूप खालीं दिलेल्या उताऱ्यांवरून समजून येईल.

( १ ) **फादर स्टीफन्स यांचें ख्रिस्तपुराण** ( १६१५ )

जैसी हरळामाजीं पुस्प मोगरी । कीं परिमळामाजी कस्तुरी। तैसी भासामाजी साजिरी । भासा मराठी ॥ पक्षिआमधे मैओरु । वृक्षयामधे कल्पतरु । भासामधे मानु थोरू । मराठीया ॥ तारामधे बारा राशी । सप्तवारांमाजी रविसशी । या दीपींच्या भाषांमध्ये तैसी । बोली मराठिया । ( अवस्वरू १ )

( २ ) **तुकाराम**—( १६३३ )

बाळ बापा म्हणे काका । तरी तो काये नीपराद । जैसा तैसा भाव गोड । पुरवी कोड विठळ । साखरेसी म्हणता धोंडा । तरी का तोंडा न रुचे । तुका म्हणे अरुश बोळ । नव्हे वोळ आहाच ।

( ३ ) **मुक्तेश्वर** ( १६३५ )

पूर्व दिशेनें क्षालिलें मुखा । कुंकुम रेखिलें त्या तिलका । अरुणोदय बोलिजे । भार्गवाचार्य उदया येत ॥ तव अपार क्रमुनिया पंथ । पुढें जान्हवी-जळाचा वात । शीतळमंद पातला । कुकुट रव करिता का का । भयें पळ सुटला उलुका । भोग द्यावया चक्रवाका । चक्रवाकी चालिल्या । गगन समुद्री मुक्ताफळे । अरुणचंचुनें कनकमराळे । वेंचोनि घेतां कळा कुशळें । नाहींच केली नक्षत्रें । व्योम नर्मदेमाजी थोर । कार्तवीर्य सहस्रकर । तारा बाणलिंगाचा भार । निवटौनि करी परौता ।

( ५ ) **शिवाजी राजे याचें** दादाजी नरसप्रभु देशपांडे व कुलकर्णी ता॥ रोहिरखोरे व वेलवंडखोरे यास **पत्र.** ( १७–४–१६४५ ) तुम्हांस मेहरबान वजिराचा विजापुराहून हुकूम आला तो ठाणें सिरवलाहून अमीनांनीं तुम्हाकडे पाठविला. त्याजवरून तुमचे बाप नरसीबावा हवालदील जाले वगैरे कितेक बहुतेक लिहिले. त्यास शहासी बेमानगिरी तुम्ही व आम्ही करीत नाहीं श्री रोहिरेश्वर तुमचे खोरियांतील आदिकुलदेव तुमचा डोंगर माथा पटारावर शेंद्रीलगत स्वयंभू आहे. त्यानीं आम्हास यश दिलें व पुढे तो सर्व मनोरथ हिंदवी स्वराज्य करून पुरविणार आहे त्यास बावास हवाल होऊं नये, खामखा सांगावा आणि तुम्ही तो कागद घेऊन सिताब हुजूर येणें. राजश्री श्री दादा-पंताचे विद्यमानें बावाचे तुमचे व आमचे श्री पासी इमान जालें ते कायम वज्रप्राय आहे; त्यांत अंतर आम्ही व आमचे वंशज लेकराचें लेकरी वतन वगैरे चालविण्याविसी कमतर करणार नाहीं. हे राज्य व्हावें हे श्रीचे मनांत फार आहे. याप्रमाणें बावाचें मनाची खात्री करून तुम्ही येणें. बहुत काय लिहिणें.

( ४ ) **रामदास** १६५९—गृहासी आग लागली । देखोनि कां बोंब केली । लोकांची मांदी मेळविली । आगी विझवाया कारणें । तैसी परमार्थी बोंब

मारावी। कांहीं काढाकाढी करावी। हळूंहळूं सोडवावी। मिठी प्रपंचाची। प्रपंच धुडका पेटला। मध्ये परमार्थ जळूनी गेला। ऐसे देखोनि तुम्हांला। कैसे बरें वाटतें। मुक्ताफळ आणि दिव्यांबर। नाना वस्तूंचे भांडार। भस्म करूनि वैश्वानर। विझौनि जाई जेवीं॥

४. **पेशवेकालीन मराठी**—पेशवेकालामध्यें १७००–१८५० पर्यंतचा १५० वर्षांचा काळ येतो. ह्या काळांतील मराठी भाषेचे नमुने खालीं दिले आहेत. त्यावरून असे दिसून येईल कीं मराठी भाषेवरील फारशी भाषेचा पगडा बहामनीकाळांत जसा होता तसाच ह्या काळांतहि होता. शिवकालांत जे कांहीं प्रयत्न झाले ते निरुपयोगी ठरले. मराठी भाषेच्या बाबत ह्या काळांत कांहीं विशेष प्रयत्न झाले असें म्हणतां येत नाहीं, राजाश्रयहि कांहीं विशेष म्हणण्यासारखा मिळाला नाहीं.

पेशवाईच्या काळात वामन पंडित, गजेंद्रमोक्षाचा कर्ता कचेश्वर, संप्रदाय-परिमळाचा कर्ता निरंजन माधव उर्फ बनाजी माधव, शामराव, कृष्णदयार्णव हे कवि होऊन गेले. परंतु ह्या सर्वांपेक्षां अधिक मराठी भाषेचा, काव्याचा गांवोगांव व घरोघर प्रसार करणारा कवि म्हटला म्हणजे श्रीधर हा होय. श्रीधर व महीपति ह्या दोघांची मराठी भाषेची सेवा फार आहे. ह्यांचे भक्ति-विजय, हरिविजय, पाडवप्रताप, संतविजय हे ग्रंथ घरोघर वाचले जात. ह्यांनी मराठी भाषेबद्दल आदर व अभिमान सामान्य लोकांत पसरविला. पंडित, ज्ञाते, विद्वान लोकांत मराठी भाषेचा पुरस्कार मोरोपंत ह्या कवीनें केला. हाहि कवि ह्याच पेशवे काळांतील होय.

पेशवाईच्या अखेरीस मराठी गद्यास सुरवात झालेली दिसते. पूर्वीचे गद्य मानभावी वाङ्मयांत दिसते. बखरीचे वाङ्मय, शाहीरी वाङ्मय, लावण्या, कटाव वगैरे ऐतिहासिक व सामान्य लोकाच्या मनरंजनासाठीं वाङ्मय ह्याच काळात उत्पन्न झाले.

( १ ) **श्रीधर इ.** स. १७१२.

अभिमन्यूचे शब्द कोमळ। अर्जुनें ओळखिले तत्काळ। रथारूढ पार्थ घननीळ। आले जवळ धावोनी। सौभद्रें नेत्र उघडिले। पार्थें अंग धरणीस टाकिलें। अभिमन्यूस पोटां धरिलें। पार्थें मांडिलें शोकातें। “अरे माझिया

सुकुमारा। बाळा अभिमन्या सुंदरा। मजवाचून राजकुमारा। का आलासि रणभूमी"। अभिमन्यु स्मरत नामावळी। जवळी आले कृष्ण वनमाळी। उकसा बुकसी ते वेळीं। पार्थ वीर स्फुंदत। पार्थाचिया कानीं। हळूच बोले अभिमन्यू वाणी। "मी पडिलों घोर रणीं। याचा खेद वाटेना। मी निश्चेष्टित पडिलां येथें। मज लत्ताप्रहार केला जयद्रथें। तेणें सर्वांग तिडकते। हे मज दुःख अतिभारी"। ऐसे ऐकून वचन। संबोखून बोले अर्जुन। 'तुझे उसनें मी घेईन। कांही खेद न करावा'।

( २ ) **कृष्णदयार्णव** ( इ. स. सुमारें १७४०. )

मंगलोत्साह घरोघरीं। शोभा आनंद नगरोनगरीं। दुःखशोक दोषदरिद्रीं। सुखसागरीं बुडाले॥ हृदयशल्यें विरोनि गेलीं। ब्रह्मानंदें मनें निवालीं। सुहृद्भावें प्रेमाथिलीं। भूतें भूतळीं परस्परें॥

( ३ ) **बाळाजी बाजीराव पेशवे** यांचें पत्र ( इ. स. १७४६. )

"तुमचा व मल्हारजी होळकर यांचा परस्पर पेंच वाढला आहे म्हणोन वर्तमान बहुतांमुखें ऐकिले जाते. ऐशास आपलें घरात सरदारांत काडीमात्र द्वैतभाव नसावा हा उत्तम पक्ष आहे. तथापि घर आहे तेथें बोलीचाली आहेच; परंतु परस्पर कुरसता कोणी बाळगीत नव्हते. सर्वेहि एकचित्ते करून ज्यात धन्याचें हित व नक्ष तोच मनसुबा करीत गेले. श्रीकृपें व वडिलांचे पुण्येंकरून जें ज्यांणीं चित्तांत आणिलें ते सिद्धीतें पावत गेले. यशावह कर्मे तुम्हींच संपादिलीं. नक्ष लौकिक लोकोत्तर म्हणावा तैसा जहाला. सर्व प्रकारें या दौलतीचे तुम्ही स्तंभच आहा ...

( ४ ) **मोरोपंत** इ. स. १७८०.

पाय धरूनि पार्थ म्हणे ब्रह्मांडी अघन माय बा पाहे
तूंचि हरी पंक हरिल अमृताचा न घन माय बापा हे॥
नमुनि क्षमस्व म्हणता, प्रकट करुनि रूप वाहुनी कवळी
अधराप्रति स्मितानें स्वयशानें त्रिभुवनासही धवळी॥

( ५ ) **भाऊसाहेबांची बखर.**

भाऊसाहेब यांचें तोंडास खरस आली. हाणा मारा म्हणावयाचे राहिले. तोंडापुढे कोणी ओळख्या आला तरी तोंडानें मात्र हुंकार देऊन मानेचे संज्ञेनें

दाखऊं लागले. अंगावरी ब्रह्मांड येऊन कोसळलें. परंतु हिंमत हरिली नाहीं. भाऊसाहेब याजप्रमाणें पराक्रमी दुसरा होणे हें असाध्य गोष्ट. पूर्वी युद्धांत अतिरथी महारथी झुंजले; त्याप्रमाणें भाऊसाहेबीं विरथीपणें शर्थ केली.

५. **आंग्लकालीन मराठी** :—शेवटचा कालखंड आंग्लकालीन हा होय. ह्याची मर्यादा १८५० पासून ते सध्याच्या कालापर्यंत आहे. पुनः ह्या कालांतहि पोटभेद पडण्यासारखे आहेत. मुख्य स्थूलभेद दोन—एक चिपळूणकरांच्या पूर्वीची मराठी आणि दुसरी नंतरची असे पडतात. सध्या जी मराठी भाषा आपण वापरतां तिचें बरेचसें स्वरूप अव्वल इग्रजीच्या अमदानींत ठरलें. पूर्वीच्या कालांत मराठी भाषेंत फारसी व अरबी शब्दाचा जो बेसुमार भरणा झाला, तो ह्या कालांत कमी झाला, व त्याऐवजीं संस्कृत शब्द वापरण्यांत येऊं लागले. संस्कृतच्या आश्रयाने मराठीला भारदस्त व पोक्त असें स्वरूप प्राप्त झालें.

ह्या काळांत विठोबा आण्णा दप्तरदार, ज्योतीपंत हे कवि, प्रभाकर, होनाजी-बाळा, सगनभाऊ वगैरे शाहीर हे होऊन गेले. हरि शंकर, मोरोबा कान्होबा, हरि केशवजी, जांभेकर, छत्रे, दादोबा, मंडलीक, जनार्दन आप्पाजी गाडगीळ हे लेखक इंग्रजी अमदानीच्या अव्वल काळांत उदयास आले. ह्या काळांत मराठी भाषेचीं दोन स्पष्ट वळणे दिसून येतात. एक मुंबईवळण व दुसरें संस्कृतवळण. पहिल्या मुंबईवळणाच्या मराठींत साधी, सरळ, सोपी वाक्यरचना, आटोपशीर छोटीं वाक्यें आणि साधे रोजच्या वापरातील शब्द, ह्या गोष्टी दिसतात. दुसऱ्या संस्कृत वळणांत पोक्त, अभिजात असे संस्कृत शब्द, लांब मोठीं वाक्यें ह्या गोष्टी दिसून येतात. हें वळण बऱ्याच अंशी चिपळूणकराच्या लेखांमुळें लागलें असें म्हणावयास हरकत नाहीं.

ह्या काळांतील शेवटचा भाग म्हणजे सध्यांचा आधुनिक काळ येतो. ह्याची मर्यादा गेल्या महायुद्धापासून सुरू होते. ह्या आधुनिक मराठीचे जनक श्री. न. चिं. केळकर हे होत असें म्हणावयास हरकत नाहीं.

( १ ) **इसापनीति**—छत्रे—१८२९.

एक साधाभोळा गावढेकरी उंदीर होता. त्याच्या घरीं दर्शनसंतोष पुष्ट असा एक नगरकरी उंदीर आला. त्याची याची जुनी ओळख होती. त्यावरून गांवढेकऱ्यानें त्याचा फारच पाहुणचार केला.



मराठी भाषा
प्रांतिक भेद
दर १०००पैकी बोलणार लोकांची संख्या
८५०० - ९५००
७५०० - ८५००
७५०० चे खाली.
अन्य भाषांचा प्रदेश
पश्चिम हिंदी
पूर्व हिंदी
राजस्तानी
गुजराती
नेमाडी
खानदेशी
ना ग पु री
तेलगु
कानडी
हळबी
नागपूर
वर्धा
चांदा
सिवनी
बतूल
वाशीम
बीड
बार्शी
नासीक
औरंगाबाद
अहमदनगर
पुणे
सातारा
पंढरपूर
सोलापूर
अक्कलकोट
बिजापूर
सांगली
कोल्हापूर
दमण
वसई
मुंबई
ठाणा
जंजिरा
रत्नागिरी
गोवा
पणजी
कारवार

( २ ) **हरि केशवजी**—१८४१.

नंतर खिस्ती कांहींसा एकीकडेस होऊन आपल्या आशावान् सोबत्यास बोलतो, ‘ अहो, हा गृहस्थ तर मला मधुरवाणीपुरांतील कृत्रिमहेतुक दिसतो; आणि हा जर तोच गृहस्थ असला तर एथें जे सोदे आहेत त्यांमध्ये यापेक्षा कोणी मोठा सोदा नाहीं.’

( ३ ) **ज्ञानप्रकाश** १८५४.

आपल्या मुंबईचा नवा गवर्नर लॉर्ड एल्फिन्स्तन, हा मागील पेशवाई राज्याच्या अखेरीस येथें होता व ज्याणे मोठें नांव संपादन केलें आणि जो अद्यापपावेतों एतद्देशीय लोकांच्या स्मरणातून गेलेला नव्हे जो मोर स्टुआर्ट एल्फिन्स्तन ज्यास अलफिष्टन साहेब या नांवानें ओळखतात त्याचा हा पुतण्या लागतो.

( ४ ) **विष्णुशास्त्री चिपळूणकर**—निबंधमाला.

आमच्या पुस्तकाचा दुसरा मोठा विशेष हा होय कीं त्यांत लौकिक विषयांवर कधींहि विवरण असत नाहीं. जगांत घडणाऱ्या घडामोडींविषयीं किंवा सामान्यतः आढळणाऱ्या लोकस्थितीविषयीं निबंधरचना करणें झाल्यास ते काम सुलभतेचें आहे हें उघड आहे.

**७ मराठीचे प्रांतिक भेद**:—मराठी भाषा उत्पन्न झाल्यापासून आजपर्यंतच्या तिच्या आयुष्यांत तिचें स्वरूप कितीवेळां पालटलें व त्यामुळें तिचे किती भेद पडले हें येथवर मराठीचे ‘ कालिक भेद ’ ह्या प्रकरणांत सांगितले. आतां तिचे प्रांतवार झालेले भेद पाहूं.

मराठी भाषा ज्या प्रांतांत बोलली जाते त्या प्रांताचें क्षेत्रफळ अजमासें एक लाख चौरस मैल आहे. ह्या एवढ्या मोठ्या प्रदेशांत एकच भाषा बोलली जाणें व तिचें स्वरूप एकच असणें हें अगदीं अशक्य आहे. दर बारा कोसांवर भाषा बदलते असें म्हणतात. भाषेतील उच्चार, शब्द, वाक्यें, प्रयोग, म्हणी इत्यादि बाबींत थोडेफार फरक झाले म्हणजे त्या भाषेला निराळें स्वरूप प्राप्त होतें. ती एक निराळी बोलीच तयार होते.

मराठी भाषेचे असे मुख्य तीन भेद आहेत. एक पुणें, सातारा ह्या प्रांतांतील भाषा. ह्या स्वरूपाला आपण ‘ मध्यमराठी भाषा ’ असें म्हणूं. दुसरा भेद

वऱ्हाड–नागपूर वगैरे उत्तरेकडील प्रांतांत सुरू आहे. ह्या स्वरूपाला नांव 'वऱ्हाडी' असें आहे. तिसरा भेद दक्षिणेकडील व विशेषतः दक्षिण कोंकणांतील भेद. ह्या भेदाला 'कोंकणी' असे म्हणतात. मराठी भाषेचे हे असे प्रांतावरून झालेले तीन मुख्य प्रांतिक भेद आहेत. १ **मध्यमराठी,** २ **वऱ्हाडी,** ३ **कोंकणी.**

ह्या तिन्हींपैकीं मध्यमराठीचे स्वरूप व तिचें व्याकरण ह्या पुस्तकांत इतरत्र सर्व ठिकाणीं दिलें आहे. त्याच भाषेचा ह्या पुस्तकांत विचार केला आहे. मराठी भाषा बोलणारे लोकही पुणें–साताराकडील मध्यमराठीच भाषा ग्रंथ वगैरे लिहितांना वापरतात. तीच भाषा सर्वमान्य झाली आहे व शुद्ध व शिष्ट समजली जाते; व त्यामुळें त्याच भाषेचा विचार ह्या पुस्तकात केला आहे. वऱ्हाडी व कोंकणी हे जे तिचे मुख्य भेद त्यांचें थोडक्यांत स्वरूप खालीं सांगतों.

वऱ्हाडी व कोंकणी ह्या दोन जरी मुख्य बोली सांगितल्या तरी ह्या बोलींचें किंवा इतर असे मराठी भाषेचे सूक्ष्म भेद पुष्कळ आहेत. कोल्हापुर वगैरे दक्षिण महाराष्ट्रातील मराठी भाषा थोडी निराळी आहे. खानदेशी भाषा तर बरीच निराळी वाटते; कोंकणांत तर थोड्या थोड्या अंतरानें भाषा बदलतांना आढळते. उत्तर कोंकणांतील ठाणे जिल्ह्यांतील भाषा थोडी निराळी आहे. बाणकोटी, दमणी, मालवणी, चित्पावनी, संगमेश्वरी, कुडाळी, कोंकणी, कारवारी असे सूक्ष्म भेद त्या त्या प्रांतांवरून पडलेले आहेत. ह्याशिवाय आगरी, भंडारी, धनगरी, कऱ्हाडी, किरिस्तांव, कोळी, कुणबी, परभी, ठाकरी, ह्या असल्या त्या त्या जातीप्रमाणे बोली पडल्या आहेत. ह्या सर्वांत कांहीं थोडे उच्चारात व व्याकरणाच्या रूपांत फरक आहेत.

संगमेश्वरी कोंकणी भाषेत सर्वनामे हा, तो, जो ह्याबद्दल हा ता जा अशीं रूपं वापरतात. 'असणें' ह्या क्रियापदाचीं रूपें हॉय, हॉव, हॉयस, हाय अशीं होतात. मी मारतांय, मारतांव; तूं मारतायस, मारताव; तो मारतॉय, ते मारतायत अशीं रूपें वापरतात.

कोळी नांवाच्या कोंकणी भाषेंत असेंच फरक असून 'न' बद्दल 'र' व 'ल' बद्दल 'न' असे फरक होतात. 'राग' बद्दल 'नाग' असा शब्द होतो. तसेंच श, ष, स ह्या तिन्हींबद्दल 'स' वापरतात.

वाडवल कोंकणींत 'च' वर्णाबद्दल 'स' किंवा 'श' वापरतात; चाकर, चार ह्या शब्दांचीं साकर व सार, शार, अशीं रूपें होतात.

चित्पावनी कोंकणी भाषेत 'व' बद्दल 'य' येतो. करय, फिरायला, चालयली, जेय, ठेय अशीं रूपें त्या भाषेंत आढळतात. शब्दाचीं रूपें—घोडो, भोपळो, चौथरो, पायल्यो, पोथ्यो, शहाणो. नामाचीं रूपें—केळां, सोनां, भांडां, फुलां, गवतां, पांढरा, तांबडा. सर्वनामाचीं रूपें—ह्यो, त्यो, ज्यो, तां, जां. क्रियापदाचीं रूपें—आयलो, बोलल्यो, हवो, ठेयलो, गेल्यां, म्हटलां, हवा, बोलल्यां अशीं होतात.

कोंकणामध्यें 'कुडाळी' म्हणून एक भाषा प्रचलित आहे. तिला कोंकणी भाषेची पोटभाषा समजतात. ही भाषा उत्तर कोंकण व दक्षिण कोंकण ह्या दोन प्रांतांच्या बरोबर मध्यें असलेल्या कुडाळ प्रांतांत बोलली जाते. ह्या भाषेत पुण्या-मुंबईकडील मराठी शब्द फार येतात. त्या शब्दांना कोंकणी भाषेचे प्रत्यय जोडलेले दिसतात. ह्या भाषेत आंबो, मुळो, गरो, कृष्णो अशीं ओकारान्त नामें येतात. द्वितीयेचा प्रत्यय 'क', तृतीयेचा 'न', पंचमीचा 'हून, सून', षष्ठीचा 'चो, ची, चा' असे प्रत्यय नामांना लागतात. 'तो चालत जात आसात,' 'तो वाचीत बसलो आसात,' 'तो माका भय घालता' अशा प्रकारचे वाक्याचे प्रयोग त्या भाषेत होतात.

कोंकणांतील प्रमुख भाषा म्हटली म्हणजे कोंकणी ही होय. ही भाषा दक्षिण कोंकणांत-राजापूरपासून तों कारवारच्या दक्षिण टोंकापर्यंतच्या प्रांतात बोलली जाते. असा हा ह्या भाषेचा प्रदेश मोठा असल्यामुळें ह्या भाषेचे पुनः बारदेसकरी, कुडाळी, मालवणी, असे पोटभेद उत्पन्न झाले आहेत. ह्या भाषेंत नाकांतून उच्चार फार केले जातात. व्यंजनांत शब्द नाहींत. मध्यवर्ती पुणे-साताऱ्याकडील मराठीपेक्षा ही कोंकणी भाषा उच्चारांत, प्रत्ययांत व प्रयोगांत फार निराळी आहे. इकडील लोकाना ही भाषा सहजगत्या समजत नाहीं. भाषेचें स्थूल स्वरूप पुढें दिलेल्या उताऱ्यावरून समजून येईल.

**( १ ) चित्पावनी भाषा.**

माणसान घे म्हटलें आपलेपण सोडूं नये. दुसरेंचा चक्षोट सेलतां घेवां. पण उठले सुटले दुसरेच्या सगळ्योच तऱ्हा घेणा अगदीं वाईट. आताशा

पुरुष बायको धाकटी बघेवी ती अगदीच आपली शिळपत दिसचत. दिवसान दिवस सगळ्याच गोष्टींत भिकारपण नि दुबळेपण वाढत चाललां.

( २ ) **कुडाळी भाषा.**

नवशीं वर्साच्या सुमारास देवसर्मो नावाचो आदगौड बामण भागीरथीच्या वडीवरसुन दकशिन कोकनांत इलो, आणी हिंदळ्याजवळच कुणकेस म्हादेवाचां सैम थळ आसा तेची शेवाचाकरी तेना केली. तेच्या करपेन त्या बिरामनाचो येलइस्तार बरोच वाडलो.

( ३ ) **गोमंतकी कोंकणी.**

आमच्या गावचे काय खेळगडी सगळ्या जात्राच्यो वारी करतात. जशे पळै पंढरेचे वारकरी नेमान जात्रेच्या दिसांत पंढरेंत वतात तशेच हे लोक चुकनास्तना गोयच्यो सोगळ्यो जात्रा काले शिमगे करतात. तो दिस १९२० लो. सांगावेल्या काल्याक तांचे बरोबर हांवय गेलो. २०–२५ रुपया म्हाका मेल्ले.

## वऱ्हाडी भाषा.

ज्या प्रमाणें मराठी भाषेच्या मध्य केंद्रवर्ती प्रदेशाच्या दक्षिणेकडील पोटभाषा कोंकणी आहे, त्याप्रमाणें उत्तरेकडील पोटभाषा ‘ वऱ्हाडी ’ ही होय. वऱ्हाडी भाषेचा प्रदेश बराच मोठा आहे. हिनें उत्तर खानदेश, वऱ्हाड-नागपुर व निजाम–हैद्राबाद पैकीं उत्तरेकडील मुलुख इतका प्रदेश व्यापिला आहे. वऱ्हाडी भाषेचे वऱ्हाडी, नागपुरी, बालाघाटी वगैरे पोटभेद आहेत. ‘ हळबी ’ म्हणून एक निराळाच वऱ्हाडी भाषेचा पोटभेद आहे.

वऱ्हाडी भाषेंत दीर्घ स्वर ऱ्हस्व रीतीने उच्चारिले जातात त्याप्रमाणें ‘ ए ’ बद्दल ‘ अ ’ किंवा ‘ इ ’ हे स्वर योजतात.

उदा.—मी बद्दल मि. माहा बद्दल महा. सांगितलें, असेल बद्दल सांगितल, असल. दिल, दिल्ल, घ्यल्ल; इळ, येळ, राह्यला, अशीं रूपें होतात. ‘जवळ’ बद्दल ‘जोळ,’ ‘उडविला’ बद्दल ‘उडोला’ असे शब्द येतात. ‘उ’ चा उच्चार ‘र’ असा होतो. ‘ळ’ चा उच्चार ‘र’ किंवा ‘य’ असा करतात. डोळा—डोया, जवळ—जोय, माळी—मायी, मारी—माई असे

उच्चार होतात. मज, मजले, मले; तुवा, त्वा, त्या; माहा, तुहा, अशीं सर्वनामाचीं रूपें होतात.

ह्या भाषेत बऱ्याच वेळां पुल्लिंगी व स्त्रीलिंगी रूपें सारखींच होतात. ‘ तूं राहतेस, तो येते, तो करत्ये, ते करतेत, ते जातेत ’ इत्यादि चमत्कारिक प्रयोग होतात. त्यानें केलेन, केलेनि, सांगितलेनि अशीं निकारान्त रूपें आढळतात.

वऱ्हाडी भाषेचा ‘ हळबी ’ म्हणून जो एक पोटभेद आहे तिच्यात मराठी, ओढिया, छत्तिसगडी अशा तीन भाषांचें मिश्रण झालें आहे.

**खानदेशी :—**वऱ्हाडीप्रमाणे खानदेशी हा आणखी एक मराठी भाषेचा महत्त्वाचा पोटभेद आहे. ही नाशिक उत्तरभाग, खानदेश, व बऱ्हाणपुरापर्यंतचा उत्तरभाग ह्या प्रदेशांत बोलली जाते. हिला अहिराणी असे दुसरेंहि एक नाव आहे. ह्या भाषेंत गुजराती भाषेच्या खुणा पुष्कळ आढळून येतात, म्हणून हिला गुजराथी भाषेचा पोटभेद समजतात. भिल्लांच्या भाषेच्याहि खुणा ह्या भाषेत आढळतात.

ह्या भाषेंत ‘ळ’ बद्दल ‘य’ येतो. ‘ मी करून राह्यलो, चालून राह्यलो, वाचून राह्यलो, ’ असे प्रयोग आढळून येतात. तसेच बोलण्यांत आंडोर, डिक्री, कुदीखाणे, अश्राप, बश, अखोर, कठे, तठे, खेसर, जोइजे असे शब्द वापरले जातात. ‘भाऊ’ ‘बारे’ हीं संबोधनें तर खानदेशी बोलण्यांत पदोपदीं येतात. ह्यां प्रांतिक भेदांचे नमुने खालीं दिले आहेत :—

**( १ ) वऱ्हाडी भाषा.**

कोन काई म्हनल तरी मानसान आपलपय सोडु नये. दुसऱ्याच चागल चोखट असल त घ्याव. पर उठल्या सुटल्या दुसऱ्याच सारच्या सारच घेन म्हणजे बिलकुल खराब. आता आता पाहाव त मानुस बायको कोनी पाहा, लहान पाहा, मोटी पाहा, सगळेच्या सगळेच आपले बहेताल. दिसंदिस साऱ्याच गोष्टींत भिकारीपन अन् दुब्बळपन वाढत चालला आहे.

**( २ ) नागपुरी भाषा—**

चिंधु दिवसभर खळ्यावर होता. जेवायास घरि गेला नाहीं. संध्याकाळीं त्याचि सासु बलाऊ आलि पर गेला नाहीं. भुक नाहि म्हून सांगितलें. त्या

रात्री खळ्यावर निजला. त्याच्या अंगावर सोन्याच कड, चादिच कड, करदोडा, आनि सोन्याच्या छल्ला इतक होत.

( ३ ) **खानदेशी**—अहिराणी भाषा—

उत्तर हिंदुस्थानमां आयोध्या नावन यक सहेर शे. तठे येक राजा होई ग्या. त्यान्ह नाव दसरथ व्हत. तो धला होई ग्या. पन त्याले पोर सोर झाय्र नी. तव्हय त्यानी काय के, की त्यान्हा जो ब्राह्मन गुरु व्हता त्याले बलाइसन आन अन ' डिकरानी कांही तजवीज आमले दखाडा ' अशा त्याना रावन्या किध्यात.

**८ मराठीवर इतर भाषांचा परिणाम**:—मराठी भाषेच्या जन्मापासून आतांपर्यंत मराठी भाषेच्या स्वरूपांत काय काय बदल कसकसे होत गेले व तिला सध्याचे आधुनिक स्वरूप कसे प्राप्त झालें हें मागील उताऱ्यांवरून कळून येईल. सध्याच्या काळापर्यंत मराठी भाषेचा इतर पुष्कळ भाषांशीं संबंध आला व त्यामुळें त्या भाषांचा मराठीवर पुष्कळ परिणाम झाला आहे. ह्या सर्व भाषांपैकीं संस्कृत ही प्रमुख होय. प्राकृत अपभ्रंश भाषांपासून मराठी उत्पन्न झाल्यानंतर संस्कृत भाषेनें ह्या सर्व बोलींवर आपलें वर्चस्व गाजविलें. संस्कृत भाषा ही पंडितांची, जाणत्यांची भाषा होती. संस्कृत भाषेस शुंग, काण्व, गुप्त वगैरे राजांचा चांगला आश्रय असल्यामुळें व संस्कृत भाषा, संस्कृत वाङ्मय व एकंदर आर्यांची संस्कृति ह्या सर्वांचे पुनरुज्जीवन ह्या राजांच्या पुरस्कारानें झालें व ह्या सर्वांचा परिणाम प्राकृत, अपभ्रंश व त्यापासून उत्पन्न झालेल्या हिंदी, गुजराती, बंगाली वगैरे भाषांवर झाला व त्याबरोबर मराठी भाषेवरहि झाला. हेमाद्री, शहाजी, शिवाजी ह्या महनीय व्यक्तींनीं तर सहेतुक संस्कृत भाषेचा आधार घेतला. वेदांत, भक्ति, योग, सांख्य वगैरे वेदविद्या मराठींत आणताना संस्कृत भाषेचा आधार घ्यावाच लागला. कथा, आख्यानें, शब्द, कल्पना, अलंकार, पारिभाषिक शब्द, छंदवृत्तें वगैरे कितीतरी बाबींत संस्कृतचें ऋण मराठीनें घेतले आहे. ज्ञानेश्वर, एकनाथ, वामनपंडित, मोरोपंत, हे कवि व चिपळूणकर, केळकर हे गद्य-लेखक ह्यांनीं आपल्या लेखनांत संस्कृतचा बराच आश्रय केलेला दिसतो.

संस्कृत भाषेसारखा इतर आर्य बोलींचाहि मराठीवर थोडाबहुत परिणाम झाला आहे. गुजराती, व्रज, हिंदी ह्या भाषांचा साधुसंतांच्या मराठीवर

परिणाम झालेला दिसतो. नाभाजी, प्रियदास, कबीर, शेखमहमद, नामदेव, मिराबाई, विसाखेचर, नरसीमेहता, रामदास, महीपति, ह्या कवींच्या लेखनांत इतर भाषांचे शब्द व प्रयोग आढळून येतात.

ह्या पौर्वात्य आर्य भाषा झाल्या. इतर पाश्चिमात्य आर्यभाषांचाहि मराठीवर परिणाम झालेला दिसतो. ह्या भाषांपैकीं पोर्चुगीज, फ्रेंच व इंग्लिश ह्या मुख्य होत. ह्या भाषांमधून कांहीं शब्द आले एवढेंच. प्रयोगांत फारशी ढवळाढवळ झाली नाहीं. डच लोकांचा वलंदेज, फ्रेंचांचा फिरंगी व पोर्चुगीजांचे शिरपेंच, कुडतें, फालतु, काडतूस, घमेले, पिस्तुल, परात, साबण, मेस्त्री, फर्मे हे शब्द मराठींत येऊन बसले. इंग्रजांचे टेबल, बुक, टाईम, ठेसन, स्टूल, स्क्रू असे कितीतरी रोजच्या व्यवहारांतील शब्द मराठींत आले आहेत.

इतर भाषांपैकीं कानडी, फारशी ह्या दोन भाषांचा परिणाम मराठीवर विशेष झालेला दिसतो. मूळ कानडी भाषेच्या प्रातांतच मराठी स्थायी होऊन बसली असे कांहीं विद्वानांचें मत आहे. ह्यामुळे बरेच कानडी शब्द व प्रयोग मराठींत रूढ होऊन बसले आहेत. कालवण, गोंधळ, कोड, कोलती, खड्डा, गाडी, गुण्डा, गुच्छा, गुञ्ज, जीन, सडा, झड, आघळ, आगरू, आड, आपट, गडगणेर, ओगर, उडव, काटवट, कडसण वगैरे वगैरे कितीतरी कानडी शब्द मराठी भाषेंत एकरूप होऊन बसले आहेत. ‘ त्यानें काम केलें ’ ह्या प्रयोगाऐवजीं तो काम केला, ‘तो मला सांगितला असे कानडीच्या धर्तीवर केलेले विचित्र प्रयोग दक्षिण महाराष्ट्रांत आढळतात.

अशा रीतीनें मराठी भाषेवर इतर भाषांचा परिणाम झालेला दिसतो; परंतु ह्या सर्वांत फारशी भाषेनें जो परिणाम केला त्याची सर इतर कोणत्याही भाषेस यावयाची नाहीं. फारशी आणि मराठी ह्यांचा संबंध ४०० वर्षें कायम होता. रोजच्या व्यवहाराच्या प्रत्येक बाबींत फारशी शब्दांचें लोण येऊन भिडले आहे. राज्याचीं खातीं, दरबार, कारागिरी, अठरा कारखाने, धंदे, फौजफाटा, पोषाख, अन्न, खाण्याचे पदार्थ, चैनीचे जिन्नस असे कितीतरी फारशी शब्द मराठींत आले. नुसतें शब्दांचेंच तेवढे लोण आलें असे नव्हे तर कित्येक प्रत्यय व प्रयोगहि फारशी भाषेच्या वळणावर होऊं लागले. निरनिराळ्या प्रकारचे शब्द खालीलप्रमाणें वापरात येऊं लागले.

नामें :—इनाम, तारीख, मजकूर, वजीर, मालक, खुर्द, बुद्रुक, माहे, इसम, मुशाहिरा, जिन्नस, रास, बाब, मिळकत, दानत, सरकार, किल्ला, वगैरे.

विशेषणं :—वजा, बाकी, माफक, आदा, अस्सल, फलाणा, इ.

शब्दयोगी अव्ययें :—देखील, ते, ऐवजीं, बद्दल, शिवाय, नजीक, बरहुकुम.

उभयान्वयी अव्ययें :—व, मगर, सबब, लेकीन.

उद्गारवाचक अव्ययें :—बस्, हा, अलबत, बेशक, खूप, वाहवा, शाबास, हाय.

क्रियाविशेषणें :—हंमेश, बिलकूल, वारंवार, पेस्तर, यंदा, मुस्कील, जलद.

क्रियापदें :—दम घेणें, खरेदी घेणं, नजर राखणं, जादु करणें इत्यादि.

जोडशब्द :—नजरचूक, अंगचोर, राजरस्ता, बाजारभाव, जगजाहीर, खरेदी-खत, गैरमर्जी, कर्जेदलाल, चीजवस्त, धनदौलत, पांढरासफेत, बंदागुलाम, पिवळाजर्द, बाजारहाट, मोलमजुरी, अक्कलहुशारी, अलंदुनिया, ऐषआराम, फंदफितुरी, नफातोटा, जमीनअस्मान, इत्यादि.

फारशी प्रत्यय—इ, गी, दार, गार, खोर, जी, खाना, दाणी, बे, इत्यादि.

**९ मध्यवर्ती मराठी भाषा**—मराठी भाषेचे प्रांतिक पोटभेद व इतर पोटभेद हे येथवर सांगितले. ह्या भेदांपैकीं मध्यवर्ती म्हणून जें मराठीचें रूप आहे ते अधिक महत्त्वाचे आहे. प्रांतिक पोटभेद हे त्या त्या प्रांतांत बोलण्यांत वापरतात, तीं रूपे लिहिण्यात किंवा ग्रंथांत वापरत नाहींत. ग्रंथाची व लिहिण्याची भाषा ही निराळी आहे. तिचें स्वरूपहि निराळें असतें. ह्या रूपाला ग्रांथिक किंवा अभिजात, किंवा शिष्ट, किंवा मध्यवर्ती आदर्श अशीं नांवें आहेत. ह्या भाषेत इतर प्रातिक पोटभेदांपेक्षां कांहीं अधिक गुण असतात म्हणून ती ग्रंथ लिहिताना वापरतात. ग्रंथाच्या भाषेंत जे विशेष गुण आढळून येतात ते खालीं दिले आहेत.

( १ ) **शब्दसमूह** :—प्रांतिक भेदात शब्दसमूह थोडका असतो. ग्रांथिक भाषेंत शब्दांचा समूह मोठा असतो. वाटेल तो पदार्थ, विचार किंवा भावना दाखविणारा शब्द असतो. शब्दाची उणीव कधीं भासत नाहीं.

( २ ) **शब्दांचा योग्य विनियोग:**—प्रत्येक शब्दाला योग्य व स्पष्ट अर्थ व प्रत्येक अर्थाला तद्दर्शक योग्य शब्द अशी स्थिति ग्रंथांच्या भाषेंत असते. अर्थासंबंधीं शब्दाशब्दांत कधीं घोटाळा होत नाहीं.

( ३ ) **वाक्यरचनेची विविधता:**—मध्यवर्ती शिष्ट भाषेत एकच विचार निरनिराळ्या वाक्यांच्या साहाय्यानें आपणांस प्रदर्शित करतां येतो. निरनिराळ्या प्रकारची वाक्यांची रचना आपणांस करता येते. इतर पोटभेदांत अशी रचना करतां येत नाहीं.

( ४ ) **उच्चाराचे चढउतार**—आपण ज्या वेळेस एखादे व्याख्यान देतों त्या वेळेस आपण थोडी निराळी भाषा वापरतों. व्याख्यानांतील भाषा ही जवळ जवळ ग्रंथाच्या भाषेसारखी असते. तेव्हां बोलताना ह्या शिष्ट भाषेंत उच्चाराचे चढउतार आपणांस करता येतात, तसाच उच्चाराचा स्पष्टपणाहि भाषेच्या शिष्ट स्वरूपांत आढळून येतो.

( ५ ) शब्दांच्या अर्थांत निरनिराळ्या छाया असतात. ह्या बारीक सारीक अर्थांच्या छटा दाखविणारे निरनिराळे शब्द ह्या शिष्ट भाषेंत असतात.

## अभ्यास

१. मराठी भाषेचे कालखंड कोणकोणते पडतात ? प्रत्येक कालखंडांतील मराठी भाषेच्या मुख्य खुणा सांगा.

२. पुस्तकांत जे कालखंड पाडले आहेत त्यांपेक्षां निराळे कालखंड तुम्ही कोणते पाडूं शकाल ? त्यांचीं कारणें द्या.

३. "मराठी भाषेचा मूळ सांगडा प्राकृत किंवा देशी भाषांपासूनच बनलेला आहे" ह्या विधानाची सत्यता सिद्ध करा.

४. मराठीच्या घटनेंत संस्कृतचा हातभार कितपत आहे तें दाखवा.

५. मराठी भाषेंत परकी भाषेचे कोणते अवशेष दिसून येतात ?

६. कोणकोणत्या परकी भाषांचे परिणाम मराठी भाषेवर झाले आहेत ? व ते कोणकोणत्या क्षेत्रांत दिसून येतात ?

७. फारशी भाषेच्या मराठीवरील परिणामांचीं कारणें व त्यांचीं उदाहरणें द्या.

८. सध्याच्या मराठीवर इंग्रजी भाषेचा काय परिणाम होत आहे ? तो कोण-कोणत्या क्षेत्रांत व कोणत्या स्वरूपांत दृष्टीस पडतो ?

९. पोटभाषा म्हणजे काय ? मराठीच्या पोटभाषा कोणत्या व त्यांचा प्रदेश कोणता ?

१०. मराठीचें आद्य स्वरूप कोणतें ? अपभ्रंश भाषेचा मराठीशीं काय संबंध आहे ?

११. मराठीच्या निरनिराळ्या प्रत्ययांचें त्यांच्या मूळ भाषावार वर्गीकरण करा.

१२. संस्कृतनें मराठी भाषेस अभिजात कशी केली तें सविस्तर स्पष्ट करा.

---

# २ प्राचीन मराठी वाङ्मय

**मुकुंदराज** :—मराठी भाषेंतील पहिला कवि मुकुंदराज असें विद्वानांचें मत आहे. मुकुंदराजानें लिहिलेले ‘ विवेकासिंधु ’ आणि ‘ परमामृत ’ असे दोन ग्रंथ उपलब्ध आहेत. विवेकसिंधूच्या कांहीं पोथ्यांमध्ये त्या ग्रंथाच्य रचनेचा काल दिला आहे. “ शके अकरा दाहोत्तरू । साधारण संवत्सरू । राजा शारंगधरू । राज्य करू ॥ ” यावरून शके १११० म्हणजे इ. स. ११८८ मध्यें हा ग्रंथ रचिला असें अनुमान करतां येतें. ज्ञानेश्वराच्या पूर्वी सुमारे १०० वर्षें हा कवि झाला असावा. विवेकसिंधूमध्येंच “ नृसिंहाचा वल्लाळ । तयाचा कुमर जयंतपाळ। तेणें करविला गदारोळ। ग्रंथरचनेचा ॥” अशी एक ओवी आहे. जयंतपाळ राजाच्या सांगण्यावरून हा ग्रंथ रचिला असे दिसतें. पण हा जयंतपाळ राजा कोठला होता, केव्हां होऊन गेला यासंबंधीं इतिहासांत माहिती सांपडत नाहीं. तथापि मुकुंदराजाचा काल इ. स. ११८८ च्या सुमाराचा धरून चालण्यास कांहीं प्रत्यवाय दिसत नाहीं. विवेकसिंधु आणि परमामृत हे दोन्ही ग्रंथ अद्वैतपर असून ओवीबद्ध आहेत. विवेकसिंधूचे पूर्वार्ध आणि उत्तरार्ध असे दोन भाग असून एकंदर ओवी संख्या १६७१ आहे. परमामृतांत अद्वैतपर अशीं छोटीं छोटीं प्रकरणें असून त्यांतील ओवी संख्या ३०३ आहे. या दोन्ही ग्रंथांची भाषा सरळ, सुबोध आणि प्रासादिक आहे. भाषेचें स्वरूप जुनें असलें तरी ज्ञानेश्वरीच्या भाषेइतकें तें जुनें दिसत नाहीं. तें बरेंच अर्वाचिनीलें असावें.

**नाथसंप्रदाय** :—मुकुंदराजानें आपली गुरुपरंपरा विवेकसिंधूमध्यें दिली आहे त्यावरून तो नाथसांप्रदायी असावा असें दिसतें. इ. स. १२०० चे सुमारास महाराष्ट्रांत नाथसांप्रदाय पुष्कळ पसरलेला होता. ज्ञानेश्वरादि संतहि याच नाथसांप्रदायांतील आहेत. पुढें वारकरी संप्रदायाचा प्रसार झाल्यानंतर हा नाथसांप्रदाय पाठीमागें पडला. या नाथसांप्रदायांतील मच्छिंद्रनाथ, गोरक्षनाथ, गैनीनाथ वगैरे संत विशेष प्रसिद्ध आहेत. नाथसांप्रदायी लोक

शिवभक्त असून त्यांच्यामध्यें हठयोगाचा अभ्यास विशेष चाले. या नाथ-सांप्रदायी लोकांनीं कांहीं वाङ्मय लिहिलें आहे. हा पंथ उत्तरहिंदुस्थानांतून महाराष्ट्रांत आला. या पंथाचें बरेंचसें वाङ्मय त्यामुळें साहजिकच हिंदीभाषेंत आहे. परंतु मराठींत कांहीं रचना झालेली उपलब्ध आहे. गोरक्षनाथांनीं 'अमरनाथसंवाद' आणि 'गोरक्षगीता' अशीं दोन प्रकरणें लिहिलेलीं सांपडतात. या प्रकरणांतून योगाचा अभ्यास कसा करावा व त्यांत कोणते अनुभव येतात याचेंच वर्णन प्रामुख्यानें आहे. ज्ञानेश्वराच्या पूर्वीच्या काळांत महाराष्ट्रांत या नाथसांप्रदायानें पुष्कळच धर्मजागृति केलेली होती. योग, वैराग्य आणि अद्वैत सिद्धांत हीं या सांप्रदायाचीं मुख्य तत्त्वे होतीं. या सांप्रदायांतूनच पुढें भागवतधर्म उर्फ वारकरी सांप्रदाय निघाला, आणि सर्व सामान्य लोकांना सुलभ अशा भक्तिप्रधान भागवतधर्माचा प्रसार महाराष्ट्रांतील संतांनीं केला.

**महानुभाव पंथ**—ज्ञानेश्वराच्या पूर्वी महाराष्ट्रांत ज्याप्रमाणें नाथ सांप्रदाय धर्मजागृतीचें कार्य करीत होना, त्याचप्रमाणें त्यावेळीं महानुभावी पंथ हाहि नुकताच स्थापन होऊन त्याचा प्रसार चालू होता. महानुभावीय पंथांतील लोकांनीं धर्मप्रसाराकरितां लिहिलेलें सर्व वाङ्मय मराठींत असल्यामुळें जुन्या मराठीच्या अभ्यासाच्या दृष्टीनें तें अत्यंत महत्त्वाचें आहे. आपल्या पंथा-बाहेरील लोकांना हें वाङ्मय समजूं नये म्हणून त्यांनीं तें 'सकळा' व 'सुंदरी' नांवाच्या सांकेतिक लिपीमध्यें लिहून ठेविले होतें. परंतु राजवाडे, भावे, य. खु. देशपांडे, नेने वगैरे संशोधकांच्या प्रयत्नानें आणि महानुभावीय महंतांच्या साहाय्यानें या सांकेतिक लिपींचा उलगडा झाला असून यापैकीं पुष्कळसें वाङ्मय हल्लीं छापून प्रसिद्ध झालें आहे. ह्यांपैकीं कांहीं ग्रंथ ज्ञानेश्वराच्या पूर्वीचे आहेत. मराठी वाङ्मयांतील जुन्यांतले जुने ग्रंथ म्हणून त्यांची योग्यता विशेष आहे.

**चक्रधर**—महानुभव पंथाचे मूळ पुरुप गोविंद प्रभु हे वऱ्हाडांतील ऋद्धिपूरक्षेत्रीं इ. स. ११८८ च्या सुमारास राहत असत. हे मोठे तपस्वी आणि कृष्णभक्त होते. त्यांचा अनुग्रह चक्रधराला झाला आणि या चक्रधरानें महानुभावपंथाची स्थापना केली. चक्रधर मूळचे गुजराथेंतील. भडोच येथें राज्य करणाऱ्या मल्लदेवराजाचा विशालदेव नांवाचा एक प्रधान होता. त्याचा मुलगा चक्रधर. चक्रधर पुढें राजा झाला. त्यानें कित्येक लढाया मारल्या आणि दोन तीन लग्नें करून राजैश्वर्य भोगिलें. परंतु त्याला पुढें उपरति झाली

आणि तो यात्रेस निघाला. यात्रा करीत असतांना ऋद्धिपूर येथें गोविंद प्रभूची गांठ पडली आणि त्यांच्यावर निष्ठा बसून तो त्यांचा पट्टशिष्य बनला. चक्रधराचें मूळचें नांव हरिपाल. पण गुरूकडून अनुग्रह मिळाल्यानंतर त्याचें चक्रधर असें नांव ठेविलें. चक्रधरानेच हा नवा संप्रदाय स्थापिला. कृष्ण आणि दत्त हीं दोन दैवतें या पंथांत मुख्य होतीं. स्त्रिया आणि शूद्र यांनादेखील संन्यासाची दीक्षा तो देत असे. चक्रधराला थोड्याच अवधींत पुष्कळ अनुयायी मिळाले. नागदेवाचार्य म्हणून चक्रधराचा पट्टशिष्य होता. त्यानें चक्रधराच्या पश्चात् या पंथाचा पुष्कळच प्रसार केला.

**महानुभाव ग्रंथ**—चक्रधरानें वेळोवेळीं आपल्या शिष्यांना जो उपदेश केला तोच त्याच्या शिष्यांनीं पुढें संग्रहित केला. हीं वचनें केशवराजसूरी यानें एकत्रित केलीं. या संग्रहास ‘ सिद्धान्तसूत्रपाठ ’ असें नांव आहे. या पंथाचा हाच मुख्य ग्रंथ होय. या ग्रंथांत एकंदर १६०९ वचने म्हणजे सूत्रें आहेत. चक्रधराचा शिष्य महींद्रव्यास उर्फ महीभट्ट यानें लीळाचरित्र म्हणून एक ग्रंथ रचिला आहे. त्यांत चक्रधराच्या १५०० लीळा वर्णन केल्या आहेत. हा ग्रंथहि महानुभावी लोक पूज्य मानतात. हे दोन्ही ग्रंथ गद्यामध्यें आहेत. बहुतेक जुने मराठी वाङ्मय पद्यांत असल्यामुळें गद्यभाषेचें स्वरूप समजण्यास कोणतेंच साधन उपलब्ध नव्हतें. या ग्रंथांतील कांहीं भाग छापून प्रसिद्ध झाल्यामुळें ज्ञानेश्वराच्या पूर्वीं मराठी गद्यभाषेचें स्वरूप कसें होतें हे समजणें आतां शक्य झालें आहे. हे ग्रंथ धार्मिक असल्यामुळें आणि महानुभावीय लोकांनीं विशेष दक्षता घेतली असल्यामुळें त्यामध्यें पूर्वीची भाषा जशीच्या तशी कायम राहिली आहे. जुन्या मराठी गद्यभाषेचें स्वरूप समजण्यास या ग्रंथांचे बहुमोल साहाय्य होतें.

**साती ग्रंथ**—या दोन ग्रंथांच्या खालोखाल महानुभाव पंथांत ‘ साती ग्रंथ ’ म्हणजे सात ग्रंथ पूज्य मानतात. या ग्रंथाच्या लेखकांपैकीं बरेचजण चक्रधराचे समकालीन होते. सामान्यतः इ. स. १२५० ते इ. स. १३५० पर्यंतच्या शंभर वर्षांच्या कालांत ही सर्व रचना झाली आहे. हे ग्रंथ मात्र गद्यांत लिहिलेले नसून ओवीबद्ध आहेत. कवीश्वर भास्कर याचें “ शिशुपालवध ” व “ एकादश स्कंद ”, दामोदर पंडित याचें “ वत्सहरण ”, नरेंद्र कवि याचें “ रुक्मिणी—स्वयंवर ” हीं चार काव्यें श्रीकृष्णाच्या चरित्रपर

आहेत. "ज्ञानबोध", "सह्याद्रिवर्णन" आणि "ऋद्धिपूरवर्णन" हे सांप्रदायिक ग्रंथ अनुक्रमें विश्वनाथ बाळापूरकर, रवळो व्यास, आणि नारो व्यास यांनीं लिहिलेले आहेत. या मुख्य वाङ्मयाखेरीज आणखीहि कित्येक लहानमोठे ग्रंथ महानुभाव पंथांतील लोकांनीं लिहिले आहेत.

**महदंबा:**—चक्रधराचा पट्टशिष्य नागदेवाचार्य याची चुलतबहीण महदंबा म्हणून होती. ही मराठींतील पहिली कवियित्री समजण्यास हरकत नाहीं. विवाहाच्या उत्सवप्रसंगीं म्हणावयास योग्य अशीं श्रीकृष्णविवाहगीतें तिनें रचिलीं आहेत. त्यांस धवळे म्हणतात. महदंबेचे हे धवळे श्रीकृष्णाच्या भक्तीनें ओथंबलेले आहेत, आणि काव्य या दृष्टीनें ते सरस आहेत. या धवळ्यांची रचना कांहींशीं अभंगासारखी आहे. प्रत्येक धवळ्याचे चार चरण असतात, परंतु चारी चरणांत अक्षरें सारखींच असतात असा नेम नाहीं. पूर्वार्धांत ८७ आणि उत्तरार्धांत ६४ मिळून १५१ धवळे आहेत आणि रुक्मिणी–स्वयंवराची कथा या धवळ्यांत महदंबेनें गायिली आहे. नमुना म्हणून एक धवळा खालीं देत आहे.

**"रुखुमिणी भीमकातें भणे ताता राज्यछत्रधरा :**
**मिया नवसिली असे आद्य अंबिकायात्रा :**
**तंव रावो वदे वेगु करा गुढरू घाला वारू पालाना :**
**आरूढैली गजस्कंधीं दृढ धरियले श्रीकृष्णाचिया चरणा :"**

चरणाच्या शेवटीं अन्त्य यमक मात्र साधलें आहे हे लक्षांत ठेविण्याजोगें आहे.

चक्रधराच्या शिष्यमंडळापैकीं भावेव्यास नामक एक अधिकारी शिष्य होता. त्यानें पूजावसर हा ग्रंथ लिहिला आहे. हा ग्रंथहि चक्रधराच्या चरित्रपर असून त्यांत चक्रधराची दिनचर्या वर्णिलेली आहे. केशवसूरीचा मूर्तिप्रकाश हा ग्रंथहि अशाच स्वरूपाचा आहे.

महानुभाव पंथ स्थापन झाल्यापासून सुमारें १०० वर्षांत जें वाङ्मय निर्माण झालें त्यांतील प्रमुख व महत्त्वाच्या ग्रंथांचा निर्देश आतांपर्यंत केला. यांपैकीं कांहीं वाङ्मय गद्यांत असल्यामुळें जुन्या मराठी भाषेचा अभ्यास करण्याच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचें आहे. शिवाय या ग्रंथांतील मूळची जुनी

भाषा कायम ठेविण्याची दक्षता घेतली गेल्यामुळें भाषेचें मूळ स्वरूप त्यांत पहावयास सांपडते. हे सर्व वाङ्मय अलीकडेच प्रसिद्ध होऊं लागलें आहे. महानुभाव पंथासंबंधीं कांहीं गैरसमज प्रचलित होते. परंतु त्यांचें निराकरण हें वाङ्मय प्रसिद्ध झाल्यामुळें होत आहे.

ज्ञानेश्वराच्या पूर्वी मराठी भाषेंत अशा तऱ्हेनें वाङ्मयरचना होत असली तरी भाषेचें प्राचीनत्व, विषयाचें गांभीर्य, प्रतिपादनाचें कौशल्य, वाणीचें माधुर्य, भक्तिभावाचें उत्कटत्व इत्यादि दृष्टीनें ज्ञानेश्वराचा ज्ञानेश्वरी ग्रंथ मराठींतील आद्यग्रंथ समजला जातो आणि मराठींतील पहिला मोठा कवि म्हणून ज्ञानेश्वराचा नामनिर्देश करावा लागतो.

**ज्ञानेश्वर**—पैठणपासून सुमारें ८ मैलांवर गोदावरीतटाकीं आपेगाव म्हणून एक गांव आहे. ज्ञानेश्वराचें घराणें या आपेगावचें. त्याचे वडील विठ्ठलपंत. आळदीच्या सिधोपंत कुळकर्णी यांची मुलगी त्याना दिली होती. विठ्ठलपंत धार्मिकवृत्तीचे असून प्रथमपासूनच त्यांचा कल वैराग्याकडे होता. तीर्थयात्रा करीत करीत ते काशीस गेले आणि तेथेंच त्यांनीं संन्यासाची दीक्षा श्रीपादस्वामीकडून घेतली. हे श्रीपादस्वामी यात्रेच्या निमित्तानें आळंदीस आले असतां रुक्मिणीनें—म्हणजे विठ्ठलपंताच्या पत्नीनें—त्यांना वंदन केलें आणि त्यांनींहि " पुत्रवती भव " असा आशीर्वाद दिला. रुक्मिणीच्या पतीनें आपल्यापासूनच संन्यासदीक्षा घेतली हें त्यांना नंतर कळलें. तेव्हां त्यांनीं विठ्ठलपंतास पुनः गृहस्थाश्रम स्वीकारण्याची आज्ञा केली. याना एकंदर निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान आणि मुक्ताबाई अशीं चार अपत्यें झालीं. संन्यासाश्रमांतून परत गृहस्थाश्रमांत आल्यानंतर हीं मुलें झालीं म्हणून याना जातिबहिष्कृत करण्यांत आलें. ज्ञानेश्वरादिकांनीं चमत्कार करून दाखविल्यानंतर हे अवतारी पुरुष आहेत अशी पैठणच्या ब्रह्मवृंदाची खात्री झाली आणि त्याना पुनः जातीत घेतलें अशी आख्यायिका आहे.

**ज्ञानेश्वरी**—त्यावेळीं महाराष्ट्रांत प्रसृत असलेल्या नाथपंथाचे अनुयायी हीं सर्व भावंडें होतीं. ज्ञानेश्वरांना गुरूपदेश त्यांच्या वडील भावापासून म्हणजे निवृत्तिनाथापासून मिळाला होता. ज्ञानेश्वरांनीं ' ज्ञानेश्वरी ' व ' अमृतानुभव ' असे दोन ग्रंथ लिहिले आहेत. त्याशिवाय त्यांचे अभंगहि आहेत. ' ज्ञानेश्वरी '

ही भगवद्गीतेवर टीका असून तिचें मूळ नांव 'भावार्थ–दीपिका' असें आहे. या ग्रंथाला वारकरी संप्रदायांत फार मान असून त्याला ते 'आई' असें संबोधितात. ज्ञानेश्वरांनीं ज्ञानेश्वरी नेवाशास लिहिली. श्रोतृवृंदाच्या मध्यभागीं आपले गुरु निवृत्तिनाथ बसले आहेत आणि गीतेवर व्याख्यान करीत आहों अशी कल्पना करून ग्रंथ रचिला आहे. ज्ञानेश्वरीची भाषा जुनी असल्यामुळें ग्रंथ कांहींसा दुर्बोध वाटतो. परंतु त्या भाषेशीं परिचय झाला म्हणजे त्यातील काव्यरसाचा अनुभव येतो. उपमा व दृष्टांत देण्याची ज्ञानेश्वरांची हातोटी अवर्णनीय आहे. एकच कल्पना उपमादृष्टान्तादींनीं ज्ञानेश्वर इतकी खुलवून सागतात कीं विषय कठीण व रुक्ष असून देखील वर्ण्यविषयाशीं वाचक तन्मयता पावतो. गीतेंतील तत्त्वज्ञानाचा सामान्य वाचकांना परिचय करून देण्याच्या हेतूनें मुख्यतः जरी ज्ञानेश्वरीची रचना झाली असली तरी काव्यदृष्ट्या-सुद्धां ज्ञानेश्वरीची योग्यता फार मोठी आहे. ज्ञानेश्वरीनें वारकरी संप्रदायाचा पाया घातला आणि तो संप्रदाय वाढीस लाविला. ज्ञानेश्वराच्या कांहीं प्रतींत 'शके बाराशे बारोत्तरे । तैं टीका केली ज्ञानेश्वरें । सच्चिदानंद बाबा आदरें । लेखक् जाला' ॥ अशी ओवी सांपडते. त्यावरून शके १२१२ म्हणजे इ. स. १२९० सालीं ज्ञानेश्वरी लिहिली असें दिसतें. ज्ञानेश्वरीचे अध्याय गीतेप्रमाणेंच १८ असून ओवीसंख्या सुमारें ९००० आहे.

ज्ञानेश्वराचा दुसरा ग्रंथ 'अमृतानुभव' हा स्वतंत्र असून वेदान्तपर आहे. हा ग्रंथ फार कठीण असल्यामुळें ज्ञानेश्वरीइतका लोकप्रिय झाला नाहीं. शिवाय काव्यदृष्ट्याहि ज्ञानेश्वरीची गोडी यात नाहीं. ज्ञानेश्वराच्या नांवावर आणखीहि लहान लहान प्रकरणें मोडतात. परंतु तीं ज्ञानेश्वरांचींच आहेत याबद्दल विद्वानांत एकवाक्यता नाहीं. ज्ञानेश्वराचीं पदे व अभंग प्रसिद्ध आहेत.

ज्ञानेश्वराप्रमाणंच निवृत्तिनाथ, सोपानदेव आणि मुक्ताबाई यांनींहि मराठींत थोडीबहुत रचना केली आहे. मुक्ताबाईनें अभंग, पदें, कल्याणपत्रिका आणि हरिपाठ अशी रचना केली आहे. इतक्या लहान वयांत ती परमार्थाचा विचार करूं शकली याचें कारण ज्ञानेश्वरादिकांचा सहवास. 'निवृत्तीने दिली शक्ति । चित्त पावले विश्रांती ।' या अभंगचरणा-

वरून तिलाहि निवृत्तिनाथापासून गुरूपदेश मिळाला असें दिसतें. तिच्या अभगांत प्रेमळपणा भरपूर आढळतो.

ज्ञानेश्वरांनीं आपली इहलोकची यात्रा वयाच्या २२ व्या वर्षी संपविली. बाकीचीं भावंडेंहि अल्पवयांतच हें जग सोडून गेलीं. ज्ञानेश्वरांनीं ज्ञानेश्वरीसारखा तत्त्वज्ञानप्रचुर असा अलौकिक ग्रंथ निर्माण करून मराठी भाषेचें सामर्थ्य व्यक्त केलें. ज्ञानेश्वरापूर्वी मराठींत फारसें वाङ्मय लिहिलें गेलें नसलें तरी मराठी भाषा प्रगल्भ अवस्थेला पोहोचली होती हें उघड दिसतें. सामान्य व्यवहार तर मराठी भाषेत तत्पूर्वी कित्येक शतकें होत होता. पण तत्त्वज्ञानांतील कठीण विचार व्यक्त करणे, निरनिराळ्या भावनांचा आविष्कार करणें आणि विविध प्रकारच्या विपुल अलंकारांचे लेणें लेवून शरीर विभूषित करणें इत्यादि गोष्टी करण्यास भाषेमध्यें जी क्षमता व सामर्थ्य लागतें तें ज्ञानेश्वराच्या काळीं मराठी भाषेत आलें होतें असेंच ज्ञानेश्वरीच्या रचनेवरून म्हणावें लागतें.

ज्ञानेश्वर ज्या काळात होऊन गेले त्याच काळात इतर आणखी पुष्कळ साधुसंत होऊन गेले. नामदेव व त्याचे सर्व कुटुंब, गोरा कुंभार, सावता माळी, विसोबा खेचर, नरहरी सोनार, बंका महार, चोखा मेळा, परसा भागवत, कान्होपात्रा, सेना न्हावी, सजन कसाई इत्यादि कवींचीं नांवें पाहिलीं म्हणजे वारकरी संप्रदाय समाजांतील सर्व जातींमध्ये कसा पसरत होता हें दिसून येतें. ह्यांतील विशेष उल्लेख करण्यासारखा कवि आणि संत म्हटला म्हणजे नामदेव हा होय.

**नामदेव**—नामदेव हा जातीनें शिंपी असून त्याच्या वडिलाचें नांव दामाशेट व आईचे नांव गोणाई असें होते. याचा जन्म इ. स. १२७० मध्यें नरसी ब्राह्मणी या गावीं झाला. मोंगलाईतील नरसी ब्राह्मणी हें गांव नामदेवाच्या पूर्वजांचें ठिकाण असें कित्येक म्हणतात तर कऱ्हाडनजीक कृष्णातीरीं असलेले नरसी ब्राह्मणी हें गांव नामदेवाचें होय असें कांहींचें मत आहे. याच्या कुळांत पंढरीच्या विठोबाची भक्ति व वारी पहिल्यापासून होती. याचें बालपणहि पंढरपुरास गेलें. त्यामुळें बालपणापासूनच त्याला विठ्ठलभक्तीचा छन्द लागला. विसोबा खेचर ह्यांनीं नामदेवाला गुरूपदेश दिला. इ. स.

१२९१ मध्यें आळंदीस ज्ञानेश्वरादि भावंडांच्या बरोबर याचा परिचय झाला आणि त्याजबरोबर त्यानें तीर्थयात्रा केली. भरतखंडांतील प्रसिद्ध ठिकाणीं तीर्थयात्रा करीत असताना त्यानें भागवतधर्माचा प्रसार केला. पंजाबांत तर नामदेवाने विशेष कार्य केले. नामदेवाचे कित्येक अभंग शिखाचा आदिग्रंथ जो ग्रंथसाहेब त्यामध्यें सांपडतात. पंजाबांतील वारकरी वैष्णव अद्यापिहि नामदेवाची जन्मतिथि आणि पुण्यतिथि मोठ्या भक्तिभावानें पाळतात.

**नामदेवाचे अभंग**—नामदेवाची सर्व रचना अभंग स्वरूपाची आहे. नामदेवाचे अभंग म्हणजे अंतःकरणाची खळबळ व्यक्त करणारीं भावगीतें आहेत. देवाच्या भेटीबद्दल लागलेली उत्कण्ठा कित्येक अभंगांत प्रतिबिंबित झाली आहे. चुकलेल्या पाडसाने आईचा धांवा मांडावा त्याप्रमाणें आर्तवाणीनें नामदेवांनीं देवाची करुणा भाकली आहे. नामदेवानीं लिहिलेल्या आत्मनिरीक्षणपर अभंगात त्याच्या मनात वेळोवेळीं उद्भूत झालेल्या भक्तिभावनाचें सम्यक् उद्घाटन झालेले आहे. अभंगाचा एवढ्या मोठ्या प्रमाणावर उपयोग प्रथम नामदेवांनींच केला. ओवी-छन्द लोकप्रिय करण्याचें श्रेय जसें ज्ञानदेवाचें तसेंच अभंग-छन्दाचा सार्वत्रिक प्रचार करण्याचें श्रेय नामदेवाचे. गाण्याच्या सोयीकरितां ओवीचे रूपातर अभंगात झाले. भक्तिमार्गीय संतकवींना उफाळून येणाऱ्या भावना व्यक्त करण्यास अभंगरचना हें उत्कृष्ट साधन सापडलें. भक्तिभावनेची तीव्रता व आर्तता अभंगांत जशी व्यक्त झाली आहे तशी इतर कोणत्याहि वृत्तांत होऊं शकली नाहीं. नामदेवाच्या मागून तुकारामांनीं अभंगाची लोकप्रियता आणि प्रचार यांमध्ये भर घातली.

नामदेवापासून त्याच्या कुटुंबांतील इतर मंडळींनाहि काव्य करण्याची स्फूर्ति मिळाली. नामदेवाची आई, पत्नी, मुलें इतकेंच काय पण जनी दासीसुद्धां या सर्वांनीं अभंग रचिले आहेत. जनाबाईचे अभंग भक्तीच्या ओलाव्याने ओथंबलेले आहेत. नामदेवाचे समकालीन असे पुष्कळ सत त्यावेळीं होऊन गेले, आणि ते भिन्न भिन्न जातीचे होते. वर्णभेद विसरून जाऊन भागवतधर्माच्या झेंड्याखालीं सर्वांना एकत्रित आणण्याचें कार्य नामदेवांनीं केलें. सर्वांना सारखे हक्क, एकत्र बसावें, खावें, प्यावें व नामसंकीर्तनांत तल्लीन होऊन जावें. विठोबाच्या भक्तीपुढें सर्व भेदभावाचा लय झाला होता. पंडितवर्गाच्या घरीं असणाऱ्या काव्यदेवतेस चंद्रभागेच्या

वाळवंटात आणिलें व सर्वसामान्य जनतेच्या तोंडीं तिला रुळावयास लाविलें हें भागवतधर्माचे मोठें कार्य म्हणतां येईल. इ. स. १३५० सालीं ८० वर्षांच्या वयात नामदेवांनीं देह ठेविला.

नामदेवाच्या निर्याणानंतर सुमारें दोनशें वर्षांनीं एकनाथमहाराजांचा जन्म झाला. या दोनशें वर्षांच्या काळांत पुष्कळ संत आणि कवि होऊन गेले. परंतु वाङ्मयदृष्ट्या त्यांची कामगिरी फार मोठ्या स्वरूपाची दिसत नाहीं. नामदेवाच्या समकालीन संतकवींचा नामनिर्देश वर केलाच आहे. महानुभावपंथामध्येहि ग्रंथकार निर्माण होत होते. परंतु हे सर्व वाङ्मय केवळ त्या पंथामध्येच प्रसार होण्याच्या दृष्टीनें लिहिले जात असल्यामुळें सामान्य जनतेला त्याची वार्ताहि नव्हती. या पंथामध्यें भीष्माचार्य नांवाचा एक प्रख्यात असा पंडित होऊन गेला. यानें इतर वाङ्मयाबरोबर पंचवार्तिक नांवाचा एक व्याकरणग्रंथ लिहिला आहे. हेंच मराठी भाषेचें आद्य व्याकरण. ह्या महानुभावी वाङ्मयाप्रमाणेच सनातनी हिंदुधर्मीय संतकविदेखील या काळांत उदयास आले. वटेश्वर चांगा या कवीने तत्त्वसार नांवाचा एक वेदान्तपर काव्यग्रंथ लिहिला आहे. काव्यदृष्टीनें सुंदर असा चोंभाकवीचा ‘ उषाहरण ’ हा काव्यग्रंथ आहे. कथाभाग अत्यंत रम्य असून रसाळ रीतीनें वर्णिला आहे.

**मुसलमानांचा दक्षिणेंत प्रवेश**—या कालांतील महत्त्वाची गोष्ट म्हणजे मुसलमानांचा दक्षिणेंत प्रवेश. ज्ञानेश्वरीच्या नंतर मुसलमानांच्या स्वाऱ्या दक्षिणेंत होऊं लागल्या होत्या. देवगिरीच्या जाधवांचें राज्य लयाला गेलें. विजयनगरच्या साम्राज्याचीहि पुढें तीच वाताहात झाली. महाराष्ट्र स्वातंत्र्याला मुकला आणि मुसलमानी अंमल दृढमूल होऊं लागला. याचा परिणाम भाषेवर आणि वाङ्मयावर झाल्याविना राहिला नाहीं. मुसलमान आपला धर्म आणि भाषा राजकीय सत्तेच्या जोरावर पसरवूं लागले. मराठीभाषेंत यावनी शब्द भराभर घुसले. राज्यकारभार, समाजव्यवहार वगैरे ठिकाणीं मुसलमानी वर्चस्व दिसूं लागलें. त्यामुळें वाङ्मयालाहि उतरती कळा लागली असें दिसतें. जाधवांचें राज्य इ. स. १३१२ मध्यें समाप्त झालें. बहामनी राज्य इ. स. १३४७ मध्यें सुरू होऊन १४९० पर्यंत चाललें. पुढें त्याचीं

पांच शकलें झालीं. बहामनी कारकीर्दींत प्रथम प्रथम हिंदुधर्म, मराठी भाषा आणि मराठी साधुसंत यांचे हाल झाले. लोकांची गांजणूक झाली. राजकीय परिस्थितीमुळें व परकीय सत्तेच्या जुलुमामुळें लोक हवालदील झाले. या परिस्थितीचा ठसा तत्कालीन वाङ्मयावरहि उमटलेला दिसतो. बहामनी बादशाहांपैकीं कांहीं बादशाहा, तसेंच निजामशाही, कुतुबशाही व आदिलशाही यांपैकीं कांहीं सुलतान हे हिंदूंचे कैवारी निघाले व त्यांनीं मराठ्यांना व मराठी भाषेला आपल्या दरबारीं वाव दिला. कांहींनीं मराठी साधुसंतांचें व पंढरीच्या विठोबाचें शिष्यत्व पत्करिलें. इ. स. १५५५ सालीं इब्राहिम आदिलशाहा विजापूरच्या तक्तावर बसला. मराठी भाषेबद्दल त्याला इतका आपलेपणा वाटत असे कीं दरबारांत सर्रास मराठी भाषा त्यानें सुरू केली. तथापि एकंदरींत मराठी वाङ्मयाची या कालांत मुसलमानी वर्चस्वामुळें पिछेहाटच झाली.

**दत्तसंप्रदाय**—एकनाथाच्या पूर्वी महाराष्ट्रांत अशा तऱ्हेनें मुसलमानी वर्चस्व सगळीकडे दिसत असतांना नृसिंहसरस्वती आणि जनार्दनस्वामी या साधुवर्यांचा उदय झाला. यांनीं दत्तोपासना ही नवीनच उपासना महाराष्ट्रांत सुरू केली. नृसिंहसरस्वतीची एकहि वाङ्मयकृति आज उपलब्ध नाहीं. परंतु त्यांच्या शिष्यांपैकीं एकानें म्हणजे गंगाधर सरस्वती यानें लिहिलेला "गुरुचरित्र" हा ग्रंथ मात्र फार प्रसिद्ध आहे. या ग्रंथाचीं दत्तोपासकांनीं आजवर किती पारायणे केलीं असतील त्याला गणतीच नाहीं. वारकरी संप्रदायांत ज्ञानेश्वरीला जो मान तोच दत्तोपासकांमध्यें गुरुचरित्राला मान. गुरुचरित्र या ग्रंथामध्यें नृसिंहसरस्वती व त्याचे अगोदरचे श्रीपाद श्रीवल्लभ यांना दत्ताचे अवतार समजून त्यांच्या अनेक लीला वर्णन केल्या आहेत. हा एका संप्रदायाचा मुख्य उपासनाग्रंथ असल्यामुळे त्यांत उपदेश, आचारधर्म, परंपरा, चमत्कार वगैरे सर्व कांहीं प्रकार आले आहेत. त्यावेळच्या समाजाच्या धार्मिक समजुती, सामाजिक व्यवहार, राजकीय परिस्थिति याचेहि उल्लेख क्वचित् क्वचित् आले आहेत. वाङ्मयदृष्ट्या किंवा भाषेच्या दृष्टया हा ग्रंथ फार उच्च दर्जाचा आहे असें नाहीं. पण एका संप्रदायाचा मुख्य ग्रंथ म्हणून त्याला पूज्य मानतात. त्याचा रचनाकाल सुमारें स. १४५८ असावा.

**एकनाथ**—यानंतरच्या कालांत एकनाथ महाराजांचा अवतार झाला. यांचा जन्म केव्हां झाला हें निश्चित नाहीं. पांगारकर नाथांचा जन्मशक शके

१४५५ म्हणजे इ. स. १५३३ असा देतात. नाथांचा समाधिशक मात्र १५९९ असा आतां निश्चित झाला आहे. नाथांचे आईबाप लहानपणींच वारले. त्यांचें पालनपोषण त्यांचे आजे चक्रपाणी यांनीं केलें. बारा वर्षांचे असतांना आजाचीहि अनुज्ञा न घेतां ते देवगडावर जनार्दनस्वामी यांजकडे गेले. तेथे त्यांनीं गुरूची सेवा मनोभावें केली. ज्ञानेश्वरी, अमृतानुभव इत्यादि मराठी ग्रंथांचें आणि रामायण, महाभारत, भागवत इत्यादि संस्कृत ग्रंथांचें उत्तम अध्ययन त्यांनीं केलें. सहा वर्षें तपश्चर्या करून योगविद्येचा अभ्यास केला आणि कांहीं वर्षें तीर्थयात्रा करण्यांत घालविल्यावर गुरूच्या आज्ञेनें पैठणास परत आले. विजापूर येथील गिरिजाबाई नांवाच्या मुलीशीं लग्न करून नाथांनीं गृहस्थाश्रम स्वीकारला.

नाथांचें आयुष्य म्हणजे साधुत्वाचा आदर्श. एकनाथांच्या अंगीं वसत असलेल्या निरनिराळ्या गुणांसंबंधीं पुष्कळ आख्यायिका प्रचलित आहेत. मनाचा समतोलपणा, सहिष्णुता, विश्वव्यापी प्रेम, सहानुभूति, षड्रिपूंचें दमन, दयालुत्व इत्यादि गुणांच्या द्योतक अशा अनेक आख्यायिका आहेत. त्यांचें ऐतिहासिक प्रामाण्य सिद्ध झालें नाहीं तरी त्यावरून लोकांना एकनाथमहाराज कसे भासत होते हें व्यक्त होतें. ‘ बोले तैसा चाले ’ या कोटींतील थोर भगवद्भक्त म्हणून एकनाथांचा लौकिक गाजत होता.

**एकनाथांचे ग्रंथ**—एकनाथांची वाङ्मयनिष्पत्ति विपुल आहे. त्यांतील मुख्य म्हणजे चतुःश्लोकी भागवत टीका, एकनाथी भागवत, रुक्मिणीस्वयंवर आणि भावार्थरामायण हीं होत. भावार्थरामायणाचीं पहिलीं पांच कांडें आणि युद्धकांडांतील ४४ अध्याय लिहिल्यावर नाथ समाधिस्थ झाले. त्यापुढील १२५ अध्याय एकनाथाचे शिष्य गावबा यांच्या हातचे आहेत. एकनाथी भागवताच्या २० हजार ओव्या आणि रामायणाच्या २५ हजार ओव्या आहेत. त्यावरून ग्रंथांच्या विस्तृततेची कल्पना येईल. याखेरीज शुकाष्टक, आनंदलहरी, गीतासार, प्रल्हादविजय, अभंग, पदें, भारुड अशी किती तरी रचना त्यांनीं केली आहे.

एकनाथ आणि ज्ञानेश्वर यांच्या काव्यांत भाषेचें व कल्पनांचें बरेंच साम्य आढळतें. ज्ञानेश्वरांच्या काव्याचा एकनाथांवर विशेष परिणाम झालेला दिसतो.

एकनाथांनींच ज्ञानेश्वरीचें संस्करण केलें. तत्कालीन लोकांना भाषेच्या प्राचीनत्वामुळें ज्ञानेश्वरी ग्रंथ दुर्बोध झाल्यामुळें ज्ञानेश्वरीला आपल्या काळच्या भाषेचें स्वरूप एकनाथांनीं दिलें आणि ही दुर्बोधता काढून टाकली.

संस्कृताचे अभिमानी लोक नाथांच्या वेळीं होते. त्यांना मराठींत रचना करणें कमीपणाचें व हीन दर्जाचें वाटे. विद्वान् लोकांत मानमान्यता मिळावी म्हणून एकनाथ लिहीत नव्हते. तर ज्या बहुजनसमाजाला संस्कृतचा गंधहि नव्हता त्यांच्यापर्यंत वेदान्त तत्त्वज्ञानाचें आणि भागवतधर्माचें लोण पोंहोचावें एवढ्याकरितां ही आटाआटी होती. काशीच्या विद्वान् मंडळीपुढें मातृभाषेच्या तर्फेनें एकनाथांनीं वकिली केली आणि त्यांत ते विजयी झाले. मराठी भाषेच्या गौरवपर असे उद्गार नाथांनीं ठिकठिकाणीं काढले आहेत. ‘संस्कृत वंद्य प्राकृत निंद्य। हे बोल काय होती शुद्ध’॥ ‘माझी मराठी भाषा चोखडी। परब्रह्में फुळली गाठी,’ यावरून मराठी भाषेबद्दल एकनाथांना किती जाज्वल्य अभिमान होता हें दिसून येतें.

संस्कृत भागवतावर एकनाथांनीं केलेली मराठी टीका महाराष्ट्रांत वंद्य समजली जाते. वारकरी संप्रदायांत ज्ञानेश्वरीच्या खालोखाल एकनाथी भागवताबद्दल लोकांस पूज्यबुद्धि वाटते. एकनाथांच्या कवित्वाचा प्रकर्ष भागवतांत पहावयास सांपडतो. विषय व विचार मूळ संस्कृतांतील आहेत. परंतु ज्ञानदेवाप्रमाणेंच एकनाथांचें स्वातंत्र्य विषय सुगम करण्याकरितां त्यांनीं उपयोगांत आणिलेल्या उपमा, रूपक, दृष्टान्त इत्यादि गोष्टींत सांपडतें. सामान्य जनतेच्या आध्यात्मिक कल्याणाकरितां त्यांनीं आपलें भागवत रचिलें असलें तरी ती रचना करण्यांत एकनाथांची वाङ्मयविषयक दृष्टि दिसून येते. एकनाथ महाराज जातिवंत कवि होते. त्यांची विद्वत्ता, साधुवृत्ति आणि अज्ञ बांधवाविषयीं वाटणारी सहानुभूति यांमुळें त्यांचें कवित्व अधिकच खुललें आहे. एकनाथी भागवतांत मधून मधून उत्कृष्ट काव्याचे नमुने सांपडतात. एकनाथ ज्यावेळीं आपल्या गुरूचें वर्णन करितात किंवा भक्तीचा स्वानुभूत अनुभव सांगतात किंवा ईश्वराच्या सगुण रूपाचा महिमा गातात त्यावेळीं त्यांची काव्यशक्ति बहरते, भाषेला ओज चढतें आणि ओवीच्या रचनेंत सफाई व नादमधुरता येते.

**दासोपंत**—एकनाथांचा समकालीन असा दुसरा नामांकित संतकवि म्हटला म्हणजे दासोपंत. यांचा जन्म इ. स. १५५१ सालीं नारायणपेठ नामक गांवीं झाला. हे दत्तसांप्रदायांतील होते. ह्यांच्या इतकी काव्यसंपत्ति फारच थोड्या कवींची असेल. यांनीं लहानमोठे एकंदर ४६ ग्रंथ लिहिले असून त्याखेरीज त्यांचीं स्तोत्रें, पदें, मंत्र, पूजा, वृत्ति, कवचें, इत्यादि रचना आहेच. त्यांच्या ग्रंथांमध्यें मुख्य म्हणजे गीतार्णव आणि पदार्णव हे दोन ग्रंथ होत. प्रत्येकांत सव्वा लाख ओवींची संख्या आहे. ते आपल्या ग्रंथांना अर्णव म्हणजे समुद्र म्हणतात त्यावरून त्या ग्रंथांच्या अफाटपणाची कल्पना येईल. हे सर्व ग्रथ अद्यापि छापून प्रसिद्ध झाले नाहींत. गीतार्णव ही गीतेवर टीका आहे. त्यापैकीं अध्याय एक, दोन, बारा आणि तेराव्या अध्यायाचा कांहीं भाग छापून प्रसिद्ध झालेला आहे. सुमारें सव्वालाख ओवींपैकीं फक्त तेरा हजार ओवी छापली गेली आहे. हा ग्रंथ मोठा असला तरी समजण्यास सोपा आहे. भाषेचा ओघ सहज व अखंड आहे. "लिहितां लिहितां ग्रंथ लिहिला" आहे. व्यवहारज्ञान व वेदान्तज्ञान ह्या दोहोंची सांगड दासोपंतांनीं आपल्या "ग्रंथराज" नांवाच्या ग्रंथांत घातल्यामुळें ह्या ग्रंथाला रामदासाच्या दासबोधाचा पूर्वावतार म्हणतात. दासोपंतांच्या सर्व काव्यग्रंथांचा अभ्यास अद्याप झाला नाहीं. इतर कवींच्या मानानें त्यांचे काव्य मागेंच पडलें आहे. दासोपंतांचें निधन इ. स. १६१५ सालीं झालें. त्यांची समाधि जोगाईच्या आंब्यास नृसिंहतीर्थाजवळ आहे.

पांच पांच कवींचा एकेक गट करून त्याला पंचायतन अशी संज्ञा दिलेली असते. ज्ञानेश्वराच्या वेळीं जे कवि होऊन गेले त्यांचें पहिलें पंचायतन. यामध्ये ज्ञानेश्वर, निवृत्तिनाथ, सोपानदेव, मुक्ताबाई आणि नामदेव (किंवा चांगदेव) हे येतात. एकनाथ पंचायतन म्हणून दुसरा एक पांच कवींचा गट आहे. त्यांतील एकनाथ व दासोपंत हे मुख्य होत. ह्याशिवाय रामाजनार्दन, जनीजनार्दन व विठारेणुकानंदन हे तिघे या दुसऱ्या पंचायतनांतील कवि होत. रामदासस्वामींच्या काळीं तिसऱ्या पंचायतनांतील कवि होऊन गेले त्याला दासपंचायतन म्हणतात.

**त्र्यंबकराज**—एकनाथांचे समकालीन आणि नंतरच्या शंभर वर्षांत कांहीं कवि होऊन गेले. त्यापैकीं कांहीं कवींचा निर्देश केला पाहिजे. त्र्यंबकराज

नांवाच्या कवीचा बालबोध हा वेदान्तपर ग्रंथ आहे. ह्या कवीचा जन्म नाशकास झाला. बालबोध ग्रंथाचे आद्यखंड, मध्यखंड व उत्तरखड असे तीन खंड असून ओवीसंख्या ५२४० आहे. या ग्रंथांत ओंकाराची उपासना सांगितली असून योगमार्गाचें विवेचन यांत केलें आहे. या ग्रंथाचा लेखनकाल शके १५०२ म्हणजे इ. स. १५८० असा दिला आहे.

**शिवकल्याण**—याच सुमारास शिवकल्याण नांवाचा नाथसंप्रदायी संत कवि होऊन गेला. हा दौलताबादेकडील राहणारा. नित्यानंद नांवाच्या गुरूनें याला उपदेश दिला. ज्ञानेश्वराच्या अमृतानुभव या ग्रंथावर यानें ओवीबद्ध टीका लिहिली आहे. या ग्रंथास त्यानें आपल्या गुरूच्या नांवावरून "नित्यानंदैक्यदीपिका" असें नांव दिले आहे. याखेरीज श्रीकृष्णजन्म, रासपंचाध्यायी, ब्रह्मस्तुति आणि वेदस्तुति असे ग्रंथ त्याने लिहिले आहेत. त्याचा काळ १५६८ ते १६३८ पर्यंत असला पाहिजे.

**रमावल्लभदास**—रमावल्लभदास हा दक्षिण महाराष्ट्राकडील कवि आहे. त्याचें पूर्वाश्रमींचें नांव तुकोपंत. तुकोपंताचे वडील अंबाजीपंत, एका मुसलमान सरदाराचे कारभारी होते. तुकोपंतानींहि हा कारभार काहीं वर्षे केला. गुरूपदेश घेतल्यानंतर त्यांनीं रमावल्लभदास असें नांव घेतलें. याचा काल इ. स.१५८८ ते १६४८ असावा. दक्षिण महाराष्ट्रांत कृष्णभक्तीचा प्रसार रमावल्लभदासांनीं केला. त्यांनीं प्रसंगोपात्त कृष्णवर्णनपर अशीं पदें केलीं आहेत. परंतु त्यांचा मुख्य ग्रंथ म्हणजे गीतेवरील टीका. तिचे नांव "चमत्कारी टीका" असे त्यांनीं ठेविलें आहे.

**मुक्तेश्वर**—एकनाथमहाराजांना गोदा व गंगा अशा दोन मुली होत्या. थोरली मुलगी गोदावरी पैठणच्या मुद्गल घराण्यांतील चितामणिशास्त्री याला दिली होती. ह्यांच्या पोटीं मुक्तेश्वराचा जन्म झाला. एकनाथ हे आपल्या मुलीला लडिवाळपणानें लीला म्हणून म्हणत आणि चिंतामणिशास्त्री यांचेहि विश्वंभर असे दुसरें नांव होते. म्हणून आपल्या मातापितरांचा उल्लेख 'लीलाविश्वंभर' या नांवानें मुक्तेश्वर आपल्या काव्यांत करतो. आपल्या गुरूचा निर्देश करतानाहि मुक्तेश्वर कधीं विश्वंभर तर कधीं लीलाविश्वंभर असें लिहितो. यावरून आपल्या वडिलाकडूनच त्याला गुरूपदेश मिळाला होता असें दिसतें. मुक्ते-

श्वराचे वंशज कुरुंदवाड शेजारील तेरवाड गांवचे इनामदार आहेत. तेथें मुक्तेश्वराची समाधि बांधलेली आहे. मुक्तेश्वराचा काळ १६०० ते १६५० च्या सुमारास असावा. निश्चित जन्मशक किंवा मृत्युशक उपलब्ध नाहीं.

**मुक्तेश्वरी महाभारत**--मुक्तेश्वराने केलेल्या काव्यापैकीं महाभारताचीं आदि, सभा, वन, विराट आणि सौप्तिक अशीं पांच पर्वें उपलब्ध आहेत. त्याखेरीज श्लोकबद्ध संक्षेप रामायण त्यानें रचिलें आहे. हरिश्चंद्राख्यान, भगवद्गीता, शुकरंभासंवाद इत्यादि स्फुट प्रकरणेंहि रचिलीं आहेत. मुक्तेश्वरानें सबंध महाभारत मराठींत रचिलें असून त्याचीं फक्त पांचच पर्वें मिळालीं आहेत का त्याने तेवढींच रचिलीं आहेत याचा निर्णय लागत नाहीं. मुक्तेश्वराच्या सर्व काव्यग्रंथांत भारताचीं पहिलीं चार पर्वें अत्यंत लोकप्रिय आहेत, व त्यांनींच त्याचे नांव अजरामर करून ठेविलें आहे. मुक्तेश्वरी भारतासंबंधीं राजवाडे लिहितात, "इतर अनेक कवींनीं ओवीछन्दात भारतें रचिलीं आहेत, परंतु मुक्तेश्वराची धीरगंभीर रचना त्याना साधलेली नाहीं." पांगारकरांचाहि अभिप्राय असाच आहे. ते लिहितात, "मुक्तेश्वराची प्रतिभा, कल्पना, वर्णन-चातुर्य, सृष्टिनिरीक्षण, बुद्धीची व्यापकता, व राष्ट्रीयभावना हे गुण अनन्यसाधारण असल्यामुळें मुक्तेश्वराची कवित्त्वाच्या दृष्टीनें कोणताहि मराठी कवि बरोबरी करूं शकणार नाहीं. मुक्तेश्वराच्या वाणींत लोकोत्तर प्रसाद, दिव्य ओजस्विता, व सृष्टिसौंदर्यवर्णनाची अनुपम शोभा हीं दृष्टीस पडतात." मुक्तेश्वराच्या भारतांत जितकीं रसाळ अशीं सृष्टीचीं वर्णनें सांपडतात तितकीं तीं कोठेंहि आढळत नाहींत. त्यांचें भाषेवरील प्रभुत्वहि वाखाणण्यासारखें आहे. त्याला आपल्या भाषेचा, देशाचा व धर्माचा मोठा अभिमान होता.

जुनी मराठी कविता प्रायः वेदान्तपर आणि धार्मिक स्वरूपाची असल्यामुळें काव्यशक्तीचा अप्रतिहत उत्कर्ष तीमध्ये पाहावयास सांपडत नाहीं. त्रुटित अशी आख्यानपर रचना कांहीं कवींनीं केलेली आहे. परंतु मुक्तेश्वराने आख्यानपर वाङ्मयाचा पाया घातला. वेदान्ताच्या परिभाषेच्या मगरमिठींतून जुन्या कवितेची सुटका करून केवळ काव्यदृष्टीने लौकिक रचना केली त्यामुळें त्याच्या प्रतिभेचा पूर्ण विलास महाभारतांत दिसून येतो. ज्ञानेश्वरानें संतवाङ्मयाचा पाया घातला असे म्हटलें तर मुक्तेश्वरानें लौकिक वाङ्मयाला सुरवात केली

असें म्हणावें लागेल. संस्कृतमधील अक्षरगणवृत्तांचाहि मोठ्या प्रमाणावर उपयोग मुक्तेश्वरानें आपल्या संक्षेप रामायणांत करून आख्यानपर रचना करणाऱ्या पुढील कवींना रचनेचा नवीन मार्ग दाखविला आहे.

**तुकाराम**--यापुढील काल म्हणजे स्वराज्याचा उषःकाल. छत्रपति शिवाजी महाराजाच्या नेतृत्वाखालीं महाराष्ट्रानें स्वातंत्र्यसंपादनाचा प्रचंड उद्योग आरंभिला. या प्रारंभींच्या काळांत मराठी वाङ्मयाच्या क्षितिजावर तुकाराम आणि रामदास या संतकवींचा उदय झाला. इ. स. १६०८ या एकाच वर्षी दोघांचाहि जन्म झाला. तुकाराम महाराजांची अवतारसमाप्ति इ. स. १६५० सालीं झाली. स्वराज्याचें तोरण बांधलेलें तुकारामांनीं पाहिलें; पण स्वराज्याचे मंदिर उभारलेलें पाहण्याचे भाग्य रामदासस्वामींना लाभलें. तुकाराम, रामदास आणि शिवाजी हे समकालीन होते. पुण्याजवळ देहू गांव इन्द्रायणी नदीच्या कांठीं वसलें आहे. या देहू गावीं तुकारामाचा जन्म झाला. तुकारामाच्या वडिलाचे नांव बोल्होबा आणि आडनांव आंबिले. ते जातीनें शूद्र म्हणजे कुणबी असून वाण्याचा धंदा करीत. तुकारामाच्या कुळांत विठ्ठलभक्ति बरेच दिवस चालू होती. तुकारामाखेरीज बोल्होबांना सावजी व कान्होबा असे दोन मुलगे होते. तुकारामाचीं दोन लग्न झालीं. पहिली बायको आजारी असल्यामुळें दुसरें लग्न केलें. या दुसऱ्या बायकोचें नांव जिजाई उर्फ आवडी. बापाच्या पाठीमागें सर्व संसाराचा भार तुकारामावर पडला. परतु ईश्वरभक्तीकडे लक्ष असल्यामुळें संसाराची घडी नीट बसेना. धंद्यात ठोकर बसली. त्याच्या कुटुंबातील बरींच माणसें लागोपाठ मृत्युमुखीं पडलीं. दुष्काळ पडला. त्यांत त्यांचे व कुटुंबातील इतर मंडळींचे फार हाल झाले. या आपत्तीमुळें तुकारामाचे मन अधिकच वैराग्याकडे झुकलें.

तुकारामाचें सर्व वाङ्मय अभंगांत आहे. नामदेवानंतर विपुल अभंगात्मक रचना तुकारामानींच केली. वारकरी संप्रदायाचें तत्त्वज्ञान, सामान्य नीतितत्त्वे, जगाची रहाटी, ईशभक्ति इत्यादि विविध विषयांवर तुकारामाचे अभंग आहेत. तुकारामाचे कित्येक अभंग मराठी भाषा बोलणारांच्या तोंडीं रुळलेले आहेत. कित्येक अभंगचरण मराठींत म्हणीवजा होऊन बसलेले आहेत. समाजातील दांभिकपणाचा आणि अनीतीचा परिस्फोट करतांना तुकारामाची

भाषा प्रसंगानुसार कठोर बनते तर परमेश्वरविषयक अभंगांत भक्तिभावेनचा ओलावा भरपूर आढळतो. व्यवहारांतील दाखले देऊन अभंगात सर्वमान्य नीतितत्त्वें गोंवण्याची कला तुकारामांना चांगली साधली होती.

तुकारामाच्या हयातींत कांहीं पंडितांकडून त्यांचा छळ झाला. त्यांना आपले अभंग इंद्रायणीच्या डोहांत बुडवावे लागले; पण ईशकृपेनें ते त्यांना परत मिळाले. तुकाराम महाराज सदेह वैकुंठास गेले अशी भाविक भक्तांची समजूत आहे. त्यांच्या निर्याणाचा काल इ. स. १६५० हें साल होय.

**रामदास** ( १६०८–१६८१ इ. स. )—सतराव्या शतकांतील महाराष्ट्रांत ज्याप्रमाणें शिवाजी महाराज आपल्या शौर्यानें व तेजानें चमकले त्याप्रमाणें रामदास हेहि आपल्या साधुत्वानें चमकले. ह्यांचा जन्म गोदावरी नदीवरील जांब गांवीं इ. स. १६०८ सालीं झाला. ह्यांच्या वडिलांचे नांव सूर्याजीपंत असें होतें. हे देशस्थ ब्राह्मण व कुळकर्णी होते. लहानपणीं त्यांची वृत्ति थोडी हूड होती. लग्नाच्यावेळीं ते समारंभांतून पळून गेल्याचें सांगतात. पुढें त्यांनीं तपश्चर्या करून पुण्य संपादन केलें. सर्व तीर्थयात्रा करून नंतर ते महाराष्ट्रांत आपलें कार्य करण्यास आले. शिवाजीची व त्याची गांठ पडून शिवाजीनें त्यांचा उपदेश घेतला होता असें म्हणतात. त्यांच्याविषयीं पुष्कळ चमत्कार प्रसिद्ध आहेत. ह्यांचें दैवत राम होतें. ह्यांना मारुतीचा अवतार समजतात. ह्यांचीं वस्तीचीं ठिकाणें साताऱ्याजवळील परळी व चाफळ हीं होतीं. त्यांनीं महाराष्ट्रांत व इतरत्र पुष्कळ रामदासी मठ स्थापून आपलें प्रचारकार्य केलें. इतर सर्व संत वारकरी भक्तिमार्गी होते. रामदास हे रामोपासक व व्यवहारज्ञान सांगणारे उपदेशक होते. त्याकाळच्या लोकांत स्वधर्म व स्वदेश ह्यांचें उत्कट प्रेम उत्पन्न झाले तें रामदासांच्या शिकवणुकीमुळेंच होय. ह्यांचे काव्य पुष्कळ आहे. त्यांत दासबोध हा मुख्य ग्रंथ होय.

दासबोध हा सर्व ग्रंथ एकदम एकाच वेळीं लिहिला गेला नाहीं असें विद्वानांचें मत आहे. पहिले सात दशक लिहूनच रामदासानें हा ग्रंथ पुरा केला व त्यानंतरचे सर्व दशक नंतर लिहून जोडले. पहिले सात व नंतरचे तेरा दशक ह्या दोन्ही भागाच्या मांडणींत व त्यांमध्यें विवेचिलेल्या विषयांत अंतर आहे.

हा एकंदर ग्रंथ मोठ्या अनुभवाच्या, चौकस स्वभावाच्या, चतुर निरीक्षकानें लिहिला आहे असें तो ग्रंथ वाचल्यानतर वाटते. ठिकठिकाणीं त्यांत अनुभवाचे बोल सांगितले आहेत. हा ग्रंथ इतर साधुसंतांच्या ग्रंथांसारखा निवृत्तिमार्गाचा उपदेश करीत नाहीं. दासबोधांत प्रवृत्तिमार्गाचा उपदेश आहे. लोकांनीं अगोदर आपला संसार चांगला नीटनेटका करावा, त्यांतच त्याला मुक्ति मिळते, असें ह्या ग्रंथाचे सार आहे. इतर साधुसंत व रामदास ह्या दोहोंत हाच मोठा भेद आहे. इतर साधुसंत वैराग्याचा उपदेश करतात. परंतु रामदास संसाराचा, प्रवृत्तिमार्गाचा उपदेश करतो. ह्या भेदाचें मुख्य कारण म्हटले म्हणजे त्या कालची परिस्थिति हें होय. त्यावेळीं मुसलमानांचे वर्चस्व महाराष्ट्रावर असल्यामुळें हिंदुधर्माच्या लोकांचे हाल होत, व त्या हालांविरुद्ध रामदासानें चळवळ केल्यामुळे त्यांच्या ग्रंथांत तो उपदेश आला आहे. शिवाजीच्या राज्यस्थापनेच्या कामांत महाराष्ट्रातील सर्व लोकांनीं जी त्याला मदत केली व सहानुभूति दाखविली त्याचें कारण रामदासांनीं दिलेली ही प्रवृत्तिमार्गाची शिकवणूक हें होय.

दासबोध ह्या ग्रंथांतील भाषा ओबड-धोबड स्वरूपाची आहे. त्या भाषेंत नीटनेटकेपणा नाहीं. नेहमींच्या वापरात नसलेले शब्द दासबोधात आढळतात. त्याचप्रमाणे विचित्र किंवा खेडवळ उच्चाराचे शब्दहि आढळतात. व व्याकरणाचे अशुद्ध प्रयोगहि वापरलेले आहेत. भाषा व्याकरणाच्या दृष्टीने थोडीफार अशुद्ध आहे. भाषा जरी अशुद्ध आहे तरी तीमधील विचार फार जोरदार आहेत. त्यांच्या काव्यरचनेत नियम फारसा नाहीं. जे मनांत येईल तें ते बोलत व जें बोलत ते ते लिहीत.

दासबोधाशिवाय रामदासांचें इतर लिखाणहि पुष्कळ आहे, व तें सामान्य वाचकाच्या परिचयाचे आहे. "मनाचे श्लोक" हें प्रकरण ज्याला माहीत नाहीं असा मनुष्य विरळा. ह्या श्लोकांतहि नेहमींच्या रोजच्या व्यवहारांत उपयोगीं पडणारा उपदेश आहे. रामदास हे रामभक्त असल्यामुळें त्यांनीं रामायणांतील सुंदरकाण्ड व युद्धकाण्ड हीं दोन काण्डें मराठींत लिहिलीं आहेत. त्यांचें "आनंदभुवन". म्हणजे महाराष्ट्र ह्या प्रांताचें वर्णनपर असें एक सुंदर काव्य आहे. त्याशिवाय करुणाष्टकें, पंचीकरण, आरत्या, ओव्याचीं

चौदा शतकें अशीं काव्यें आहेत. 'दासगीता' ह्या नांवाचें त्यांनीं संस्कृतमध्यें एक काव्य लिहिलें आहे.

रामदासांनीं साताऱ्याजवळ परळी सज्जनगडावर माघ व॥ ९ स. ( १६८१ सनांत ) समाधि घेतली.

रामदासांच्या वेळेस महाराष्ट्रांत आणखीहि कांहीं नांवाजलेले कवि होते. त्यामध्यें वडगांवचे जयरामस्वामी, निगडीचे रंगनाथस्वामी, ब्रह्मनाळचे आनंदमूर्ति व हैद्राबादचे केशवस्वामी हे प्रमुख होत. ह्या सर्वांस मिळून 'दासपंचायतन' असें म्हणत असत. ह्या प्रत्येकानें मराठींत कांहीं थोडीशी काव्यरचना केली आहे. जयरामस्वामीचे भागवत दशमस्कंध, रुक्मिणी-स्वयंवर, सीतास्वयंवर व अपरोक्षानुभव हे ग्रंथ आहेत. हे जातीने ब्राह्मण असून ह्यांची हयात १५२१–१५९४ ( शक ) आहे.

रंगनाथस्वामी हे लष्करी व उमद्या वृत्तीचे होते. ते नेहमीं एका अबलक घोड्यावर बसत. त्यांच्या घोड्याचें नांव 'मनोहर' असें होतें. ह्यांनीं गजेंद्रमोक्ष, गुरुगीता, सुदामचरित्र, पंचीकरण वगैरे ग्रंथ लिहिले आहेत. योगवासिष्ठहि ह्यांनीं दहा प्रकरणांत भाषांतरित केलें आहे. ह्यांचे अभंग व पदें लोकांच्या नित्याच्या पाठांत आहेत. हे जातीनें ब्राह्मण असून निगडी ( सातारा ) गांवचे होते. ह्यांची हयात शके १५३४–१६०६ ही होय. आनंदमूर्ति व केशवस्वामी ह्यांची कविता फारशी उपलब्ध नाहीं.

रामदास व दासपंचायतनांतील कवींबरोबर कांहीं स्त्रियाहि महाराष्ट्रात प्रसिद्ध होत्या. ह्या स्त्रियांत वेणाबाई व बहिणाबाई प्रसिद्ध होत्या. महाभारत, रामायण, भागवत, योगवासिष्ठ वगैरे ग्रंथ ह्या स्त्रियांच्या वाचनांत असत. त्या स्वतां पुष्कळ वेळां पदें, ओव्या, गीतें, अभंग वगैरे स्वरूपाची रचना करीत.

**वामन पंडित** हा निजामशाहींतील नांदेड ह्या गांवचा राहाणारा होता. त्यांचें आडनांव शेषे. हा अत्यंत बुद्धिवान् असून ह्यानें संस्कृत भाषेचें चांगलें अध्ययन केलें होतें. त्या अध्ययनाच्या जोरावर त्यानें सर्व हिंदुस्थानभर हिंडून विद्वानांकडून अजिंक्यपत्रें घेतलीं. ह्या सर्व विद्येच्या अध्ययनानें व अजिंक्यपत्रांनीं त्याचें मनाचें समाधान न झाल्यामुळें त्यानें साधु-

संतांचा उपदेश घेण्याचे ठरविले. अखेर त्याला एका यतीचें दर्शन होऊन त्याने त्याला उपदेश केला.

वामनपंडितांचा मुख्य ग्रंथ म्हटला म्हणजे यथार्थदीपिका हा होय. हा ग्रंथ भगवद्गीतेवरील टीका आहे. ज्ञानेश्वरांनीं गीतेवर भावार्थदीपिका नांवाची एक टीका लिहिली व वामनपंडितानें ही टीका लिहिली. ह्या ग्रंथांत वामन-पंडितांची असामान्य विद्वत्ता दिसून येते.

परंतु सामान्य लोकांत विशेष प्रसिद्ध म्हणजे वामनाचे श्लोकच आहेत. हे आबालवृद्धाच्या तोंडीं आहेत. ह्या श्लोकांत सर्व रसांचा परिपोष केला आहे. व त्यांत व्यवहारिक अनुभवहि पदोपदीं ओतलेला दिसतो. त्यांतील बरेच श्लोक संस्कृत श्लोकांचीं मराठी भाषांतरें आहेत.

ह्या विद्वत्ताप्रचुर ग्रंथाखेरीज भावनाप्रचुर ग्रंथचरनाहि वामनपंडितानें केली आहे व ती सर्व कृष्णभक्तिप्रधान आहे. ह्यामध्यें गजेंद्रमोक्ष, सीतास्वयंवर, कात्यायनीव्रत, वनसुधा, राधाविलास हीं प्रकरणे मुख्य होत.

वामनपंडितांच्या सर्व काव्यांत वर्णनशैली, शब्दांची योजना, वृत्तांची योजना वाखाणण्यासारखी आहे. ज्या प्रकारचा अर्थ असेल त्याला योग्य असे शब्द त्यानें योजिले आहेत. त्याचप्रमाणें कोणत्या भावनेला कोणतें वृत्त उपयोगी पडतें हें पाहून नंतर रचना केली आहे.

वामनपंडितांचे समकालीन व त्यांच्या सारखेच श्लोक रचणारे दोन कवि होते; एक नागेश व दुसरा विठ्ठल. नागेशानें व विठ्ठलानें सीतास्वयंवर, रुक्मिणी-स्वयंवर, हीं काव्ये रचिलीं आहेत. ह्याशिवाय त्यांची इतरहि रचना आहे.

मराठशाहींतील महत्त्वाचे कवि म्हटले म्हणजे रामदास, तुकाराम, आणि वामन पंडित हे होत. इतर कांहीं कवींना ह्यांच्यापासून स्फूर्ति प्राप्त झाली. त्यांपैकीं कांहीं कवि वर सांगितले. ह्याशिवाय मराठशाहींत छत्रपतींचा आश्रय उपभोगणारे काहीं कवि होते. शहाजीनें ज्यावेळीं कर्नाटकात राज्य स्थापिलें त्यावेळीं महाराष्ट्रीय कवि व विद्वान् लोक त्याच्याबरोबर गेले व त्यांना शहाजीनें व त्याच्यामागून आलेल्या राजांनीं उदार आश्रय दिला. शहाजी राजाच्या पदरीं प्रसिद्ध जयराम पिंडे हा कवि होताच. त्यानें आपल्या धन्याचें वर्णन राधा-माधवविलास चंपू ह्या काव्यांत निरनिराळ्या भाषांत केलें आहे.

शहाजी राजांच्या पदरीं कितीतरी कवि होते व त्यांनीं पुष्कळ काव्यें केलीं असें पिंडे सांगतो. शहाजी, व्यंकोजी, ह्यांनीं पुष्कळ कवींना आश्रय दिला. ह्यांत आनंदतनय व रघुनाथपंडित हे मुख्य होते. आनंदतनय हा कर्नाटकांतील ‘अरणी’ ह्या गांवाचा रहिवासी. व शहाजीस पकडण्याने पादशहास पाठविलेल्या ‘वेदोभास्कर’ ह्याच्या बरोबर आनंदतनयाचा बाप गोपाळराव होता. त्याच्या वंशांतील हा आपणास अरणीचा शिपाई असें म्हणवितो. ह्याच्या मुलाला रघुनाथ पंडितानें आपली मुलगी दिली होती.

**रघुनाथपंडित** हा आपल्या नलदमयंतीस्वयंवर ह्या काव्यामुळे प्रसिद्ध आहे. संस्कृत काव्यांत ज्याप्रमाणें रघुवंश, कुमारसंभव, किरातार्जुनीयम् वगैरे काव्यांनीं जी प्रसिद्धि मिळविली व लोकांच्या मुखीं झाली तीच स्थिति ह्या काव्याची. हें काव्य कल्पना व भाषा ह्या दोन्ही दृष्टींनीं रम्य आहे. ह्या एका काव्यानेच रघुनाथ पंडिताचे नाव कायमचें केले आहे. असा एकहि मराठी प्रबुद्ध वाचक सांपडणार नाहीं कीं ज्याने हे काव्य एकदा तरी वाचिले नसेल. प्रतिभेचा उठाव जरी तितकासा नसला तरी भाषेचा उठाव मोठा चटका लावतो. कवीनें घेतलेले परिश्रम काव्यात पदोपदीं जाणवतात. नलदमयंतीची गोष्ट सर्वांस आवडणारी, ललितवाङ्मयातील श्रेष्ठ, हृद्य अशीच असून रघुनाथपंडिताने ती मोठ्या कौशल्यानें सांगितली आहे. आज ती आबालवृद्धांच्या मुखांत आहे. रघुनाथपंडित हा दक्षिणेकडील तंजावरचा होता कीं काय, हा शिवाजीच्या अष्टप्रधानापैकीं होता कीं काय वगैरे बाबींचा अद्याप सर्वमान्य निकाल लागला नाहीं.

मराठशाहींतील पहिले कवि हे झाले. पुढें शाहूमहाराजांच्या वेळीं कचेश्वर बावा, निरंजन माधव, सामराज हे मुख्य कवि होत. **कचेश्वर बावा** तर शाहूचे गुरु होते. त्यांनीं लिहिलेलीं गजेंद्रमोक्ष, सुदामचरित्र, द्रौपदीवस्त्रहरण हीं काव्यें प्रचलित आहेत. **निरंजन माधव** हा बनाजी माधव ह्या नांवानें प्रसिद्ध असून त्यानें बाजीराव, नानासाहेब ह्याच्या कारकीर्दींत नासीरजंग, ताराबाई ह्यांच्या दरबारीं राजकारण केलें. निरंजन माधवाचे सांप्रदायपरिमळ, निरोष्ठरामायण, व कांहीं वृत्तावरील ग्रंथ हे काव्य प्रसिद्ध आहे. **सामराज** हा सातारायेथील राजोपाध्ये घराण्यांतील होता. त्याचें रुक्मिणीहरण हें काव्य प्रसिद्ध आहे. त्यानें मुद्गल आख्यान नांवाचें दुसरें एक काव्य लिहिलें आहे. सातारा

जिल्ह्यांतील कोपरड्याचा कृष्णदयार्णव हा कवीहि त्याच वेळीं होऊन गेला. ह्यानें ‘ उत्तम श्लोक ’ नांवाचा ग्रंथ लिहिला.

ह्या सर्वांपेक्षां सामान्य माणसांच्या आवडीचा कवि म्हटला म्हणजे **श्रीधर** हा होय. महाराष्ट्रांत असें एकहि गांव नाहीं कीं जेथें श्रीधर कवीच्या ग्रंथांचा सप्ताह वर्षातून एकदां तरी चालत नाहीं. श्रीधराचे ग्रंथ ओवीबद्ध आहेत. पांडवप्रताप, हरिविजय, रामविजय, शिवलीलामृत हे त्याचे मुख्य ग्रंथ होत. ह्यांची भाषा रसाळ, सरळ, साधी, सोपी अशी असल्यामुळें तिची गोडी लागून ती आबालवृद्धाना व स्त्रियांना सुद्धां समजते. श्रोत्यांना काय दिलें असतां त्यांच्या मनाची पक्कड आपल्यास मिळेल हें तो पूर्ण जाणतो. मल्लयुद्धें, लढाया, कृष्णाच्या क्रीडा, खेळ, उत्सव, संसाराचीं वर्णनें, प्रेमाचीं वर्णनें इत्यादि समाजांत नेहमीं आढळणाऱ्या गोष्टी श्रीधरानें मोठ्या बहारीनें वर्णिल्या आहेत.

श्रीधर हा पंढरपूर जवळील नाझरे येथील राहणारा. ह्याच्या वंशांत बरेच साधू व कवि होऊन गेले. रंगनाथस्वामी निगडीकर हे ह्याच वंशांतील. श्रीधराचें जन्मवर्ष नक्की माहीत नाहीं. इ. स. १६७८ सालीं तो जन्मला असावा असें म्हणतात. श्रीधराला त्याच्या वडिलांपासून—ब्रह्मानंदापासून उपदेश झाला. त्याच्या बायकोचें नांव पार्वती व आईचें नांव सावित्री. त्यानें हरिविजय इ. स. १७०२ सालीं, रामविजय १७१३ सालीं, पाडवप्रताप १७१२ सालीं व शिवलीलामृत १७१८ इ. सनांत असे ग्रंथ लिहिले.

श्रीधरासारखाच सामान्य सर्व लोकांच्या आवडीचा दुसरा त्याच सुमाराचा कवि **महिपति** हा होय. हा नगरजिल्ह्यांतील ताहराबाद येथील राहणारा. ह्याचें आडनांव कांबळे. हा जातीनें देशस्थ ब्राह्मण. ह्यांच्या वडिलांचें नांव दादोपंत व आईचें नांव गंगाबाई. हे दोघे ईश्वरभक्तिपरायण होते. महीपतीचा जन्म इ. स. १७१५ सालीं झाला. ह्यानें महाराष्ट्रात व इतरत्र होऊन गेलेल्या सर्व संतांचीं मोठ्या प्रेमळपणाने चरित्रे लिहिलीं आहेत. भक्तविजय, संतलीलामृत, भक्तलीलामृत, संतविजय इत्यादि त्याचे मुख्य ग्रंथ आहेत. व ह्या ग्रंथांचीं पारायणे स्त्री–पुरुष प्रत्येक गांवांत करीत असतात. संतांचीं चरित्रें लिहिण्याचा नाद ह्याला नाभाजी व सूरदास ह्या उत्तरेकडील कवींच्या ग्रंथांपासून लागला. निरनिराळ्या कवींची माहिती, त्यांचें चरित्र, त्यांचे चमत्कार वगैरे मोठ्या

चौकसपणानें मिळवून मोठ्या रसाळपणानें सोप्या ओवीबद्ध भाषेत महिपतीनें सांगितलीं आहेत.' महिपती इ. स. १७९० सालीं मरण पावला.

पेशवाईतील मुख्य कवि **मोरोपंत** हे होत. ह्याचा जन्म पन्हाळगडावर इ. स. १७२९ सालीं झाला. हे जातीनें कऱ्हाडे ब्राह्मण असून ह्याचें आडनांव पराडकर, वडिलाचे नाव रामचंद्र व आईचे नांव लक्ष्मीबाई. ह्याचे बालपण पन्हाळगडींच गेलें. तेथें असतांना केशव पाध्ये ह्यांच्याजवळ त्यांचे शिक्षण झाले. पुढे ह्यांचा बारामतीचे नाईक जोशी ह्या घराण्याशीं संबंध आला. बारामतीकर जोशी हे त्या काळचे प्रसिद्ध सावकार असून पेशव्यांचे ते व्याही होते. बाबूजी नाईक बारामतीकर हे त्यावेळीं एक प्रसिद्ध योद्धे व मुत्सद्दी होते. त्यानीं कर्नाटकांत शाहू छत्रपतीच्या वेळीं चांगली मर्दुमकी केली. ह्याच्या बंधूंना आबूजी नाईक ह्यांना पहिल्या बाजीराव पेशव्याची बहीण जिऊबाई दिली होती. मोरोपंत ह्या घराण्यांत पुराण सांगण्याचे काम करीत असे.

मोरोपंतांनीं काव्यरचना पुष्कळ केली आहे. भारत, भागवत, रामायण हीं सर्व त्यांनीं मराठींत लिहिलीं आहेत. भारत व रामायण हीं निरनिराळ्या पद्धतीने लिहिलीं. त्यांच्या काव्याचें मुख्य वृत्त 'आर्या' आहे. आर्येच्या प्रत्येक ओळींत कांहीं तरी विशिष्ट अक्षर किंवा शब्द घालून निरनिराळी रचना केली आहे. परंतुरामायण, मंत्ररामायण, अशीं एकशेंआठ रामायणें रचिलीं असे म्हणतात. भारत, रामायण ह्यातील कांहीं कांहीं प्रसग फार बहारीचे वर्णिले आहेत. ह्याच्या कवितेत यमक, प्रास, अनुप्रास वगैरे शब्दालंकाराची रेलचेल आहे. उपमा, दृष्टांत वगैरे अर्थालंकारहि कांहीं कमी नाहींत. युद्ध, संवाद, प्रेमाचे प्रसंग, वात्सल्याचे प्रसंग, दुःखकारुण्याचे प्रसंग, क्रीडा वगैरे वाचून आल्हाद होतो. मोरोपंत हे नामदेव–तुकारामाप्रमाणे सामान्य लोकाचे कवि नसून समाजातील वरच्या दर्जाच्या लोकांचे कवि होत. ह्यांची कविता उच्च वर्गातील भारदस्त लोकांकरिता आहे. ह्याच्या भाषेत संस्कृत शब्दहि बरेच आहेत. ह्याचें महाभारत १७७२–१७८२ सालांत तयार झाले. ह्यांचे बहुतेक काव्य संस्कृत आख्यानावरून लिहिले आहे. तरी पण संशयरत्नमाला, केकावलि वगैरे स्वतंत्रहि रचना आहे. ईश्वराच्या स्तुतिपर असलेलें 'केकावलि' हें काव्य वाचण्यासारखें आहे. मोरोपंत हे १७९४ इ. स. या सालीं वारले.

पेशवाईच्या उत्तरकाळांत आणखी पुष्कळ लहान मोठे कवि होऊन गेले. नारायण कवि, दाजीबा जोशीराव, रामचंद्र बडवे, रघुनाथपंत कोशे, साहिरोबानाथ आंबिये, जोतीपंतदादा महाभागवत, हरिदास इत्यादि कवि त्यांतल्या त्यांत प्रमुख होत. साहिरोबानाथ हे सारस्वत, गोव्याकडील असून बक्षींच्या मार्फत शिंद्यांच्या दरबारीं होते. त्यांचा महदनुभवेश्वरी हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. त्यांची रचना वेदान्तपर आहे. जोतीपंत हे खटावाकडील असून देशस्थ ब्राह्मण देशपांडे होत. ते पंढरपूरचे भक्त असून त्यानीं विठोबाचीं साडेसातशें देवालयें बांधलीं. त्यानीं भागवत दशमस्कंधावर टीका केली आहे.

## शाहिरी वाङ्मय

शाहिरी वाङ्मय म्हणजे पोवाडे व लावण्या. ज्या शाहिरांनीं पोवाडे रचिले त्यांनींच लावण्याहि केलेल्या असल्यामुळें या दोन्ही काव्यप्रकारांचा एकदमच विचार करणें आवश्यक आहे. सामान्यतः पोवाडे हे ऐतिहासिक विषयावर असतात तर लावण्या शृंगारपर परंतु समाजस्थितिदर्शक असतात. लावण्यांतूनहि ऐतिहासिक कालासंबंधीं कांहीं माहिती उपलब्ध होते. क्वचित् लावण्यांतूनहि ऐतिहासिक व्यक्तींचे आणि प्रसंगांचे उल्लेख येतात.

पोवाडे किंवा लावण्या यांची रचना महाराष्ट्रांत कित्येक शतकें होत असली पाहिजे. गोंधळी लोक पोवाडे म्हणत तर तमाशातून लावण्यांचा प्रचार असे. या शाहिरी वाङ्मयापैकीं बरेंचसे वाङ्मय कालाच्या उदरांत गडप झालेलें आहे. बहुतेक पोवाडे किंवा लावण्या गोंधळी किंवा तमासगीर यांच्या पठनांत असल्यामुळे त्या जतन करून ठेवण्याची काळजी पूर्वी घेतलेली नाहीं. आज जें काहीं शाहिरी वाङ्मय उपलब्ध आहे तें बहुतेक सर्व उत्तर पेशवाईतील आहे.

आज उपलब्ध असलेल्या पोवाड्यांची संख्या सुमारें ३०० आहे. शिवकालापासून तों शाहूच्या कारकीर्दीपर्यंतचे सात, पेशवेकालीन दीडशें, आणि बाकीचे अव्वल इंग्रजींतले म्हणजे इ. स. १८०० च्या पुढचे अशी त्यांची कालखंडाच्या दृष्टीनें वर्गवारी करतां येईल. शिवकालांतील पोवाड्यांपैकीं अज्ञानदासाचा 'अफझलखानाच्या वधाचा पोवाडा' आणि तुळशीदासाचा 'तानाजी मालुसऱ्यावरील पोवाडा' हे फार प्रसिद्ध आहेत. या पोवाड्यांतून

आलेली ऐतिहासिक माहिती इतर ऐतिहासिक प्रमाणांनींही सिद्ध होत असल्यामुळें हे पोवाडे रचणारे शाहीर शिवाजीच्या कालचे असून त्यांनीं प्रत्यक्ष पाहिलेली हकिकतच पोवाड्यांत ग्रथित केली आहे असें वाटतें. तुळशीदासाचा पोवाडा बराच विस्तृत असून त्याचे ५५ चौक आहेत.

दुसऱ्या कालखंडांतील म्हणजे १७०७ पासून ते १७९५ पर्यंतच्या कालांतील सुमारें १५० पोवाडे उपलब्ध आहेत. यापैकीं बरेचसे पोवाडे पानिपतच्या आणि खर्ड्यांच्या लढाईसंबंधीं आहेत. इ. स. १८१८ त महाराष्ट्राच्या स्वातंत्र्य सूर्यास खग्रास ग्रहण लागलें. महाराष्ट्राचें तेज लोपलें, पराक्रम नाहींसा झाला. प्रतिकार करण्याची शक्ति खुंटली. ही परिस्थिति अव्वल इंग्रजींतील पोवाड्यामध्यें प्रतिबिंबित झालेली दिसून येते.

शाहीर लोकांना पदरीं बाळगण्याची पद्धत पूर्वापार आहे. बंदीजन म्हणून यांचा उल्लेख संस्कृत वाङ्मयांत येतो. भाट, चारण वगैरे लोक रजपूतकालांतहि होते. शहाजी आणि शिवाजी यानीहि गुणिजनांना आश्रय दिल्याचे उल्लेख आहेत. परंतु या गुणिजनांची नांवापलिकडे फारशी माहिती उपलब्ध नाहीं. शाहूच्या कारकीर्दीपासून तों दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दीपर्यंत या शाहीरांना बक्षिसें देण्यांत आल्याची नोंद सांपडते. त्यावरून या कालांत शाहीरांची बरीच चलती होती असें दिसते. उत्तर पेशवाईमध्यें जे शाहीर झाले त्यासंबंधीं मात्र थोडीबहुत माहिती उपलब्ध आहे.

**रामजोशी**—या सर्व शाहीरात विद्वत्तेच्या आणि कवित्वाच्या दृष्टीनें रामजोशी सोलापुरकर हा श्रेष्ठ होय. पुराण सांगणें किंवा कीर्तन करणें हा धंदा रामजोशांच्या कुळातच होता. रामजोशांचा थोरला भाऊ पुराणिक व कीर्तनकार होता. रामजोशाचा जन्म इ. स. १७५८ च्या सुमारास झाला असावा. त्यानें पंढरपुरास बाबा पाध्ये यांचेजवळ अध्ययन केलें. प्रसिद्ध मराठी कवि मोरोपंत यांजबरोबरहि त्याचा प्रत्यक्ष परिचय होता आणि त्यानें मोरोपंती आर्यांचा आपल्या कीर्तनामधून प्रसार केला. लावणी व तमाशा ह्यांवरून त्याचें मन कीर्तनाकडे मोरोपंताच्या सांगण्यावरून लागलें असें सांगतात. रामजोशानें कीर्तनावर पैसाहि भरपूर मिळविला. परंतु त्याचा स्वभाव रंगेल व व्यसनी असल्यामुळें नेहमीं पैशाची त्याला कमतरताच पडे. रामजोशी इ. स. १८१२ मध्यें पुणें मुक्कामीं वारला.

रामजोशी याच्या लावण्यामध्यें शृंगाररसच प्रमुख आहे. परंतु कांहीं लावण्या वैराग्यपरहि आहेत. स्वतः विद्वान् असल्यामुळें संस्कृत साहित्यांतील कांहीं सुंदर कल्पना आणि संस्कृतमधील नादमधुर शब्द यांची पेरणी त्याच्या कृतींत झाली आहे. शृंगारपर वर्णनांत उत्तानता आणि मर्यादातिक्रम हे दोष प्रामुख्यानें आहेत.

**अनंतफंदी**—अनंतफंदीचा जन्म सन १७४४ सालीं झाला. बाप लहानपणींच वारल्यामुळें त्याचें बालपण उनाडक्या करण्यांत गेलें. लहानपणापासूनच तो लावण्या करीत असे. तरुणपणीं तर त्यानें तमाशाचा फड काढिला आणि तेंच त्याच्या चरितार्थाचें साधन झालें. सवाई माधवरावाच्या कारकीर्दींत हा पुण्यास आला आणि तेथेंच त्याचा बोलबाला झाला. त्यानें सवाई माधवरावाच्या मृत्यूवर "माधवनिदान" नावाचें ओवीबद्ध काव्य लिहिलें आहे. दुसऱ्या बाजीरावानें याला आश्रय दिला होता. 'माधवनिदान' काव्याखेरीज सातआठ पोवाडे आणि २५।३० लावण्या अनंतफंदीच्या म्हणून उपलब्ध आहेत. परंतु त्यानें याखेरीज बरीच रचना केलेली असावी असें त्याच्या समकालीन लौकिकावरून वाटतें.

**होनाजी**—होनाजीबाळा हा जातीनें गवळी होता. बाळा हा त्याचा चुलता. या दोघांनीं मिळून लावण्या केल्या. सवाई माधवराव आणि दुसरा बाजीराव याच्या कारकीर्दींत होनाजीला राजाश्रय चागलाच मिळाला होता. दुसरा बाजीराव तमासगीर लोकाचा मोठाच शोकी होता. आणि होनाजीप्रमाणें इतरहि तमासगार मंडळी त्याच्या पदरीं होती. रागदारींत म्हणण्याजोग्या शृंगारपर लावण्या या तमासगीरांनीं रचाव्या आणि दुसऱ्या बाजीरावाने त्या ऐकून त्यांना इनामे बक्षिसे द्यावींत असा क्रम त्यावेळीं चालू होता. होनाजीला कवित्वशक्ति चागल्यापैकीं होती, आणि काव्यदृष्टीनें पाहतां त्याच्या पुष्कळ लावण्या सरस आहेत. पण उत्तान शृंगाररस हा दोष सर्वच लावण्यांत असल्यामुळें होनाजीच्या लावण्याहि त्याला अपवाद नाहींत.

**सगनभाऊ**—हा जातीनें शिकलगार मुसलमान होता. पेशवाई गेल्यानंतर जी स्थिति महाराष्ट्रांत निर्माण झाली त्याचें हृदयद्रावक चित्रण त्यानें आपल्या लावण्यांत केले आहे. पेशवाई नष्ट झाल्यावर सगनभाऊ साताराच्या छत्रपतींच्या आश्रयाला गेला. साताराचें राज्यहि नष्ट झाल्याचें पाहण्याचें

त्याच्या नशिबीं आलें आणि त्यानें पदच्युत प्रतापसिंह छत्रपति यावर पोवाडे केले आहेत. सगनभाऊ १८४० च्या सुमारास वारला.

**प्रभाकर**—प्रभाकर हा जातीनें कोंकणस्थ ब्राह्मण असून त्याचें आडनांव दातार असें होतें. त्याचा जन्म १७५४ च्या सुमारास झाला असावा. प्रभाकराचे वडील कोंकणांतून देशावर आले आणि पेशवे सरकारच्या फडांत कारकून म्हणून राहिले. प्रभाकर हा पंधरा सोळा वर्षांचा असल्यापासून लावण्या करूं लागला आणि त्यावेळीं पुण्यास गंगू हैबती याचा तमाशाचा फड होता त्यामध्ये त्या म्हटल्या जात. सवाई माधवराव आणि दुसरा बाजीराव या दोघावरहि त्याने पोवाडे रचिले आहेत. बाजीरावाची त्याच्यावर विशेष मर्जी होती. त्याने कमाईहि पुष्कळ केली पण त्याचे उत्तर वय दारिद्र्यात गेलें. तो १८४३ सालीं मरण पावला.

**परशराम**—पेशवाईच्या पडत्या काळांतील आणखी एक शाहीर म्हटला म्हणजे परशराम. याच्याविषयीं फारशी माहिती उपलब्ध नाहीं. हा जातीनें शिंपी असून अहमदनगर जिल्ह्यांतील राहणारा होता. याच्या सुमारे १५० लावण्या छापून प्रसिद्ध झाल्या आहेत. परशरामाच्या लावण्यांत मर्यादित शृंगाररस आहे. देवादिकासंबंधीं, परमार्थपर आणि उपदेशपर अशा लावण्याच त्यानें बऱ्याचशा केल्या आहेत. कवित्वाच्या दृष्टीनें याची रचना होनाजीबाळा किंवा प्रभाकर यांच्या तोडीची नाहीं.

पोवाडे किंवा लावण्या हें गेय वाङ्मय आहे. तत्कालिन परिस्थितीचे पडसाद या वाङ्मयांत उमटले असल्यामुळें त्यावेळच्या समाजाच्या चालीरीतींची कल्पना या वाङ्मयावरून येते. रचना धांवती असल्यामुळें त्यामध्यें बांधेसूदपणा कमी असतो. लावण्यामध्यें पुनरुक्ति फार सांपडते. याचें कारण एकच शृंगारपर विषय.

---

# ३. अर्वाचीन मराठी वाङ्मय

## ( १ ) १८१८ पासून मुंबई विश्वविद्यालयाच्या स्थापनेपर्यंत

इ. स. १८१८ मध्यें पेशवाई बुडाली व महाराष्ट्रात ब्रिटिशांची कारकीर्द सुरू झाली. तेथून महाराष्ट्रांत एका नव्या युगाला सुरवात झाली. ब्रिटिशाबरोबर आपला जो वाढता परिचय होऊं लागला त्याचे राजकारण, समाजकारण आणि वाङ्मय यांमध्यें प्रतिबिंब पडण्यास थोडासा कालावधि लागणें अपरिहार्यच होतें. ब्रिटिश अमदानीबरोबर इंग्रजी शिक्षणहि सुरू झालें आणि सुशिक्षितांची ही पहिली पिढी तयार होईपर्यंत अस्सल देशी वाङ्मयाला प्रारंभ झाला नाहीं हें खरें; तथापि त्याचीं चिन्हें मात्र अगोदरपासूनच दृग्गोचर होऊं लागलीं. वाङ्मयाच्या प्रांतांत प्रारंभीं जे प्रयत्न झाले त्यांमध्ये मिशनरी लोकांचा बराच हात होता आणि सरकारचेंहि त्याना भरपूर साहाय्य मिळत होतें. ख्रिस्ती धर्माचा हिंदुस्थानांत प्रसार करावयाचा झाल्यास तो देशी भाषेंतूनच केला पाहिजे हें तत्त्व मिशनऱ्यांना पटलें. धर्मोपदेशकांना एतद्देशीय भाषा शिकणें सोपें जावें म्हणून हिंदुस्थानांतील निरनिराळ्या भाषांचीं व्याकरणें, कोश किंवा क्रमिक पुस्तकें तयार करण्याचा प्रथम प्रयत्न मिशनरी लोकांनीं केला. इ. स. १८१० सालीं म्हणजे पेशवाई नष्ट होण्याच्या पूर्वी आठ वर्षें डॉ. विल्यम कॅरे या मिशनरी पंडितानें श्रीरामपुर ( बंगाल ) येथें मराठी–इंग्रजी कोश छापून प्रसिद्ध केला. हा कोश तयार करतांना वैद्यनाथ नांवाच्या देशी पंडिताचें त्याला साहाय्य झालें. याच सुमारास मुंबई येथें गणपत कृष्णाजी नांवाच्या गृहस्थांनीं एक छापखाना काढला आणि कांहीं किरकोळ मराठी ग्रंथ छापले.

१८२० मध्ये मुंबई इलाखा इंग्रजांच्या सर्वस्वीं अमलाखालीं आला आणि मौंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन यांची मुंबईचे गव्हर्नर म्हणून नेमणूक झाली. एल्फिन्स्टन साहेब हे स्वतः विद्वान् ग्रंथकार होते. हिंदुस्थानची सुधारणा होण्यास शिक्षणाचा प्रसार करणे अत्यवश्य आहे असें त्यांचे ठाम मत होतें. नवीन तऱ्हेचें शिक्षण देण्यास देशी भाषेंत भरपूर ग्रंथ नाहींत असे दिसून येतांच त्यानीं ग्रंथोत्पत्तीस उत्तेजन देण्याकरितां एक संस्था स्थापिली. या संस्थेमध्यें

काम करणाऱ्या मंडळींत मोल्सवर्थ, कँडी, जर्व्हीस इत्यादि युरोपियन व जगन्नाथ शंकरशेट, सदाशिव काशिनाथ उर्फ बापू छत्रे, बाळशास्त्री जांभेकर इत्यादि महाराष्ट्रीय मंडळी होती. यानीं प्रसिद्ध केलेलीं पुस्तकें बहुतेक शालोपयोगी अशींच आहेत. छत्रे यांनीं भाषांतर केलेलीं बाळमित्र व इसापच्या नीतिकथा हीं पुस्तकें विशेष प्रसिद्ध आहेत. व्याकरण, अंकगणित, भूमिति, पदार्थविज्ञान, कोश इत्यादि विषयांवर बरींचशीं भाषांतरित व कांहीं स्वतंत्र अशीं पुस्तकें प्रसिद्ध झालीं. तथापि यावेळीं जे प्रयत्न झाले त्यांत नमूद करण्याजोगे म्हटले म्हणजे मोल्स्वर्थचा कोश व दादोबा पांडुरंग यांचें व्याकरण हे होत. मोल्स्वर्थचा कोश अनेक पंडितमंडळींच्या साहाय्यानें तयार झाला आहे. त्याला सरकारची मदत व सहानुभूति पूर्ण होती आणि आजमितीसहि हा कोश प्रमाणभूत समजला जातो. दादोबा पांडुरंग यांचें महाराष्ट्र भाषेचें व्याकरण १८३६ मध्यें प्रसिद्ध झालें. कोश व व्याकरण यामुळें भाषेला स्थैर्य येत अर्वाचीन मराठी वाङ्मयाच्या सुरवातीलाच मराठीच्या ह्या दोन्ही अंगांची सिद्धता झाली.

ब्रिटिशांची कारकीर्द सुरू होऊन १८५६ मध्यें मुंबई विश्वविद्यालयाची स्थापना होईपर्यंतचा काल म्हणजे अर्वाचीन मराठी वाङ्मयाच्या इतिहासांतील अरुणोदय म्हणता येईल. या कालांतील प्रयत्नांची दिशा थोडक्यात वर दिली आहे. वाङ्मयवृद्धीकरितां ज्या देशी पंडितानीं या कालांत परिश्रम केले त्यांची थोडक्यात माहिती खालीं देत आहें.

( १ ) **सदाशिव काशिनाथ उर्फ बापू छत्रे** :—याचा जन्म १७८८ त मुंबईस झाला. हे प्रथम इंजीनिअर खात्यांत नोकर होते. यांनीं बाळमित्र, इसापनीति हीं पुस्तके इंग्रजीवरून लिहिलीं. याची भाषा सोपी व रसाळ आहे. हे इ. स. १८३० मध्यें निवर्तले.

( २ ) **बाळशास्त्री जांभेकर** :—( जन्म १८१० ) बाळशास्त्री हे छत्रे यांचे साहाय्यकारी होते. बाळशास्त्री हे विद्वान् आणि बुद्धिमान् होते. गणित, व्याकरण, रसायनशास्त्र इत्यादि विविध विषयांत त्यांची गति अकुंठित चालत असे. बाळशास्त्री यांनीं निरनिराळ्या विषयांवर सुमारें १५ पुस्तके लिहिलीं आहेत त्यावरून त्यांच्या चौरस बुद्धिमत्तेची कल्पना येईल.

( ३ ) **हरि केशवजी** ( ज. १८०४; मृ. १८५८ ):—यांचा जन्म मुंबईस झाला. यांची नोकरी न्यायखात्यांत झाली व चीफ ट्रान्स्लेटरच्या हुद्यापर्यंत ते चढले. १८३३ मध्यें सिद्धपदार्थविज्ञान ग्रंथ इंग्रजीवरून त्यानीं लिहिला. तो इतका सुबोध वठला आहे कीं तो मूळचाच मराठी ग्रंथ असावा असें वाचणारास वाटतें. इंग्लंडचा वृत्तांत या नांवाचा एक पत्ररूप ग्रंथ त्यांनीं १८३८ मध्यें प्रसिद्ध केला. Bunyan's Pilgrim's Progerss या प्रसिद्ध इंग्रजी ग्रंथाचें यात्रिक–क्रमण म्हणून त्यानीं केलेले भाषांतर सुरस आहे.

( ४ ) **दादोबा पांडुरंग** ( ज. १८१४; मृ. १८८२ ):—दादोबा पांडुरंग यांनीं आपलें आत्मचरित्र लिहून ठेविले आहे; व त्यांतील कांहीं भाग श्री. पांगारकर यानीं प्रसिद्ध केला आहे. त्यावरून दादोबाच्या काळचें यथायोग्य चित्र आपणास काढतां येतें. दादोबांचे घराणे मूळचें वसईकडील राहणारें. दादोबाचा जन्म मुंबईस झाला. त्याचे शिक्षण कांहीं घरीं व कांहीं खाजगी शाळेंत झाले. शिक्षण संपल्यावर मुंबईस एल्फिन्स्टन विद्यालयांत शिक्षकाचे कामावर त्याची नेमणूक झाली; व पुढे जांभेकरशास्त्री वारल्यानंतर त्याना शाळेचे मुख्याध्यापक नेमले. त्यानीं मराठी भाषेचें व्याकरण लिहिले ( १८३६ ). त्याची सुधारून वाढविलेली दुसरी आवृत्ति १८५० मध्ये प्रसिद्ध केली. मोरोपंताच्या केकावलि या काव्यावर यशोदापांडुरंगी नांवाची एक विस्तृत टीका त्यांनीं लिहिली आहे. एवढीच त्यांची ग्रंथनिष्पत्ति. ही फार अल्प असली तरी त्यावेळच्या इतर लेखकाप्रमाणें भाषांतरित नसून स्वतंत्र आहे. शिवाय त्यांची भाषाशैलीहि उच्च दर्जाची होती, याचें प्रत्यंतर त्याचे आत्मचरित्र वाचतांना येते. मराठींतील पहिले स्वतंत्र ग्रथकार म्हणून त्यांचा निर्देश करतां येण्याजोगा आहे.

( ५ ) **परशरामपंत तात्या गोडबोले** ( ज. १७९९; मृ. १८७४ ):— यांचा जन्म वाईस झाला. यांनीं संस्कृत वाङ्मय व जुनी मराठी कविता यांचा चांगलाच अभ्यास केला होता. मराठी कोश तयार करण्याकरितां ज्या शास्त्रीमंडळीचें साहाय्य घेण्यांत आलें त्यांत परशरामपंत

तात्या हे प्रमुख होते. त्यांची सर्व नोकरी सरकारी शिक्षणखात्यांत झाली. त्यांनीं शाकुंतल, उत्तररामचरित्र, मृच्छकटिक वगैरे प्रसिद्ध संस्कृत नाटकाचें मराठींत भाषांतर केलें. छंदःशास्त्रावर वृत्तदर्पण नावाचा सुबोध ग्रंथ लिहिला. त्यांचा विशेष लोकप्रिय झालेला ग्रंथ म्हणजे नवनीत. यात ज्ञानेश्वर, तुकाराम, रामदास, श्रीधर, मोरोपंत इत्यादि प्राचीन कवींच्या काव्यांतील रसाळ वेचे संग्रहित केले आहेत. प्राचीन मराठी कविता छापून प्रसिद्ध होण्याचे कार्य यावेळीं होऊं लागलें तेव्हां परशरामपंत तात्यानीं सर्वतोपरी मदत केली. त्याच्या नवनीतामुळे प्राचीन मराठी कवींची माहिती सामान्य वाचकांना झाली, व प्राचीन काव्य हें टाकाऊ नसून अभिमानास्पद आहे, अशी जाणीव सुशिक्षितांना होऊं लागली.

वाङ्मयवृद्धीला पोषक अशा इतर प्रयत्नामध्ये छापखाने व नियतकालिकें यांचा उल्लेख केला पाहिजे. मराठींतील अगदीं पहिलें पुस्तक जरी बंगालमध्यें छापले गेलें तरी मुंबईमध्यें छापखान्याला सुरवात होण्यास फार कालावधि लागला नाहीं. मुंबई व पुणे येथें निरनिराळे छापखाने या सुमारास अस्तित्वांत आले; आणि त्यामुळें वाङ्मयाच्या निष्पत्तीस व प्रसारास चांगलीच चालना मिळाली. छापखान्याबरोबर नियतकालिकें—वर्तमानपत्रे व मासिकें—हींहि आलींच. मुंबईस दर्पण, प्रभाकर, दिग्दर्शन, ज्ञानचंद्रोदय इत्यादि नियतकालिकें प्रकाशित होऊं लागलीं. पुण्यास १८४८ सालीं ज्ञानप्रकाश पत्र सुरू झालें. १८५२ मध्यें विचारलहरी नांवाचें मासिक कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनीं काढलें.

या कालांतील वाङ्मयाचें वैशिष्ट्य थोडक्यांत असें सांगतां येईल :—

( १ ) वाङ्मयनिर्मितीस मिशनरी व सरकार यांचें केवळ साहाय्यच होतें असें नव्हे तर त्यानी त्यांत प्रामुख्यानें भाग घेतला होता.
( २ ) बहुतेक वाङ्मय शालोपयोगी व भाषांतरित असें होते.
( ३ ) जुनी कविता प्रकाशित होण्यास सुरवात झाली होती.
( ४ ) कोश व व्याकरण या शाखेमध्यें महत्त्वाचे ग्रंथ तयार झाले.
( ५ ) आरंभींच्या या प्रयत्नात पुण्यापेक्षां मुंबईकडील लेखक विशेषें-करून भाग घेत होते.

**(२) मुंबई विश्वविद्यालयाच्या स्थापनेपासून तों निबंधमालेच्या उदयापर्यंत** ( १८५७ ते १८७४ )

प्रस्तुत कालखंडांत जे वाङ्मयसेवक म्हणून पुढें आले त्यांचे स्थूलमानानें दोन वर्ग पडतात. जुन्या पद्धतीनें संस्कृताचें अध्ययन केलेले शास्त्री यांचा एक वर्ग आणि इंग्रजी विद्या व वाङ्मय यांच्याबरोबर परिचय घडून आलेल्या आग्लशिक्षितांचा दुसरा वर्ग. तसेंच वाङ्मयविषयक कार्य मुंबईप्रमाणे पुणें येथें सुरू झालें व जोमाला लागलें. या पूर्वीच्या कालांतील वाङ्मय बहुतांशीं शालोपयोगीं होतें. परंतु या कालांतील वाङ्मयाची दृष्टि अधिक विस्तृत झालेली आहे. वाङ्मय हें ज्ञानप्रसाराचें जसें साधन आहे तसेंच तें शुद्ध व सात्त्विक आनंद मिळवून देणारी एक कलाहि आहे. काव्य, नाटक व कादंबरी हे वाङ्मयप्रकार अशा तऱ्हेचा आनंद वाचकांना मिळवून देतात. या वाङ्मयप्रकारांचा आश्रय घेऊन मराठीमध्ये रचना होण्यास याच वेळीं सुरवात झालेली आपल्याला दिसते. ही रचना कांहीं स्वतंत्र तर कांहीं भाषांतरित अशा स्वरूपाची आहे. तथापि पुढील ऊर्जस्वल वाङ्मयाचा पाया घालण्यास त्याची मदत झाली हे खास !

परशुरामपंत तात्या गोडबोले यांनीं संस्कृत नाटकाचीं मराठींत भाषांतरें केलीं होतीं. हीच प्रथा **कृष्णशास्त्री राजवाडे** यांनीं पुढें चालविली. विक्रमोर्वशीय, मालतीमाधव आणि मुद्राराक्षस या राहिलेल्या संस्कृत नाटकांचीं भाषांतरें त्यांनीं केलीं. याखेरीज उत्सवप्रकाश म्हणून त्यांचें एक स्वतंत्र व सरस असें काव्य आहे. हे इ. स. १९०० मध्यें निवर्तले.

**गणेशशास्त्री लेले त्र्यंबककर** हे नाशिककडले राहणारे. जानकी-परिणय, विद्धशालभंजिका, कर्पूरमंजिरी या नाटकांचे भाषांतर त्यांनीं केलें. हीं नाटकें मूळ संस्कृतमध्यें सुद्धा तितकीं रसाळ नाहींत; त्यामुळे त्याच्या भाषांतराला जितकी प्रसिद्धि मिळावी तितकी मिळाली नाहीं. कालिदासाच्या रघुवंश आणि कुमारसंभव या काव्याचें त्यांनीं केलेलें भाषांतर अधिक सरस आहे. त्यांनीं इंग्रजीवरून कांहीं ग्रंथांचें भाषांतर केलें आहे. कुकचा वृत्तांत म्हणून एक त्यांचे पुस्तक आहे. कोलंबसाचे चरित्रहि त्यानीं एका इंग्रजी ग्रंथावरून लिहिलें आहे. त्याची गद्यभाषा ओबडधोबड व संस्कृतप्रचुर आहे. परंतु पद्यांतील भाषा मात्र

निरागस व रसाळ आहे. त्यांच्या रघुवंशाच्या भाषांतराला ५०० रु. चें बक्षिस मिळालेले होतें.

या काळच्या सर्व शास्त्रीमडळींत बुद्धीनें व कर्तृत्वाने श्रेष्ठ म्हणजे **कृष्ण-शास्त्री चिपळूणकर** होत. यांचा जन्म १८२४ मध्ये झाला. त्याचें सस्कृत अध्ययन पुणे येथील पाठशाळेंत झालें. विद्यार्थिदशेंतच त्याची बुद्धिमत्ता सर्वांच्या निदर्शनास आली होती. त्याचे गुरुजी त्यांना कौतुकाने बृहस्पति असें म्हणत. संस्कृतप्रमाणें त्यांनीं इंग्रजी भाषेचें अध्ययन केलें आणि त्या भाषेवर स्पृहणीय प्रभुत्व मिळविलें. सरकारी शिक्षणखात्यात त्यांची नोकरी झाली. पुणें पाठशाळेंत ते मराठीचे प्रोफेसर होते. पुढे ते पुणें ट्रेनिंग कॉलेजचे प्रिन्सिपॉल झाले. ट्रेनिंग कॉलेजचे प्रिन्सिपॉल असतांना ते शाळापत्रक नांवाचें मासिक चालवीत असत. त्यामध्ये त्यांनीं मराठी व्याकरणावर अत्यंत विचारप्रवर्तक व उद्बोधक असे लेख लिहिले आहेत. मिशनरी लोकांच्या चळवळीला पायबंद घालण्याकरितां म्हणून 'विचार–लहरी' नांवाचें पत्र त्यांनीं १८५२ चे सुमारास सुरू केलें. हिंदुधर्मावरील मिशनऱ्यांचे हल्ले परतविण्याचें कार्य या पत्रानें कांहीं दिवस केलें.

कृष्णशास्त्री चिपळूणकर यानीं गद्य व पद्य अशी दोन्ही प्रकारची वाङ्मय-निर्मिति केली आहे. प्रसिद्ध इंग्लिश लेखक डॉ. जॉन्सन याच्या रासेलस या कादंबरीचें भाषांतर त्यानीं केलं आहे. उत्कृष्ट भाषातराचा नमुना म्हणून या ग्रंथाकडे बोट दाखविण्यास हरकत नाही. अनेकविद्यामूलतत्त्वसग्रह नावाचा विविध विषयावर स्फुट लेख असणारा ग्रथ त्यांनीं १८६१ मध्ये प्रसिद्ध केला. अरेबिअन् नाइट्स या लोकप्रिय ग्रंथाचे भाषांतर करण्यास त्यानीं सुरवात केली होती. हे भाषातर त्याचे चिरंजीव निबंधमालाकर्ते विष्णुशास्त्री चिपळू-णकर यानीं पूर्ण केलें. साक्रेतिसाचें चरित्र एखाद्या विशिष्ट पुस्तकाचें भाषातर नसले, तरी त्याला इंग्रजी पुस्तकांचाच आधार आहे. त्यांची काव्यरचना 'पद्यमंजिरी' या पुस्तकात संकलित केली आहे. कालिदासाच्या मेघदूताचें भाषांतर तसेंच जगन्नाथ पंडिताच्या करुणविलासाचें भाषातर हीं दोन्ही प्रकरणें फारच सरस उतरलीं आहेत. संस्कृत सुभाषितांच्या आधारे 'अन्योक्ति' सारखी कांहीं स्फुट काव्यरचना केलेली वरील पुस्तकांत सांपडते. मराठी भाषेवर शास्त्रीबोवांचें

अनुपम प्रभुत्व होतें. वाईट एवढेच वाटतें कीं, त्यांच्या हातून स्वतंत्र म्हणण्याजोगी एकही कृति लिहून झाली नाहीं. मराठी भाषेचें शुद्ध स्वरूप व साधेपणाचें सौंदर्य त्याच्या लेखनांत आढळते.

संस्कृत वाङ्मय मराठींत आणण्याचा उपक्रम जसा शास्त्रीमंडळींनीं केला तसाच इंग्रजींतील वाङ्मयरत्नांना मराठी भाषेच्या कोंदणात बसविण्यास आंग्लशिक्षित लोक पुढे सरसावले. यापैकीं पहिला प्रयत्न **महादेवशास्त्री कोल्हटकर** यांचा (१८२२–१८६५). याचे अध्ययन पुणे येथील पाठशाळेंत झालें व इंग्रजी भाषेचा अभ्यास त्यानीं प्रौढवयात कृष्णशास्त्री चिपळूणकरांप्रमाणें केला. महादेवशास्त्री हे विद्याखात्यात नोकरीस लागून डेप्युटी इन्स्पेक्टरच्या जागेपर्यंत चढले. त्याच्याकाळीं महाराष्ट्रात ते लोकोत्तर वक्ते म्हणून गाजले. त्याच्या वक्तृत्वाची निबंधमालाकारानीं सुद्धा वाखाणणी केली आहे. शेक्सपिअरच्या प्रसिद्ध अथेल्लो नाटकाचें सुरस भाषांतर त्यांनी केलें. मूळचे नाटक अगोदर कठीण. शेक्सपिअरची प्रतिभा अत्युच्च कोटीला गेली होती त्यावेळीं त्याने ते लिहिलेले. विषयहि इकडील रीतिरिवाजास प्रतिकूल. अशा नाटकाचे समर्पक भाषांतर करणे म्हणजे साधे काम नव्हते. परंतु महादेवशास्त्र्यानीं हे सर्वमान्य भाषांतर करून आपले कौशल्य प्रकट केलें. देवलाच्या भाषांतराला या भाषांतराचा बराच उपयोग झालेला आहे.

मराठी भाषेतील पहिलें स्वतंत्र व सरस नाटक याचवेळी लिहिलें गेलें. **विनायक जनार्दन कीर्तने** यांनीं आपल्या विसाव्या वर्षी "थोरले माधवराव पेशवे" नावाचें नाटक लिहून डॉ. भाऊ दाजी, महादेवशास्त्री कोल्हटकर इत्यादि तत्कालीन विद्वान् मंडळींकडून वाहवा मिळविली. हें नाटक लहान म्हणजे केवळ ५७ पानाचे आहे. ऐतिहासिक दृष्टीनें पहाता त्यांत काही चुका सांपडण्याचा संभव आहे. परंतु नाट्यकृति या दृष्टीनें प्रस्तुतचे नाटक अप्रतिम आहे. लेखकाजवळ नाट्यरचनायोग्य अशी प्रतिभा ( Dramatic Genius ) होती याची साक्ष प्रत्येक प्रवेश वाचताना पटते. माधवराव, रमाबाई, रामशास्त्री इत्यादि पात्रांचें स्वभावरेखन उत्कृष्ट साधलें आहे. कीर्तने यांचे दुसरें नाटक जयपाळ. हें एका हिब्रू कथेच्या आधारें लिहलें आहे. परंतु पहिल्या नाटकाच्या मानानें हें हीणकसच ठरतें. विनायकराव यांची नौकरी इंदूर व बडोदें या संस्थानांत

झाली. संस्थानी राजकारणात शिरल्यामुळें त्यांना वाङ्मयाकडे लक्ष देण्यास फुरसत मिळाली नाहीं असे दिसते. मराठीवरील त्याची भक्तीच उडालेली दिसते. ते इंदूरहून पुण्यास आले व १८९१ मध्यें मधुमेहाच्या असाध्य रोगाला बळी पडले.

या नाटकाखेरीज सामाजिक व पौराणिक विषयावर नाटके होतच होतीं आणि हींच नाटकें तत्कालीन मराठी रंगभूमीवर लोकप्रिय झालेलीं असत. परंतु वाङ्मयाच्या दृष्टीने त्यांची योग्यता फारशी नाहीं. उत्तान अश्लीलपणा फार. सामाजिक नाटकांमध्ये सुधारक व सुशिक्षित याजवर टीका केलेली असावयाचीच. कलेच्या दृष्टीनेंहि या नाटकांचा दर्जा अगदींच सामान्य असल्यामुळें तीं वाङ्मयांत फार दिवस राहूं शकलीं नाहींत.

नाटकांप्रमाणें या कालांत स्वतंत्र व भाषांतरित अशा कादंबऱ्याहि लिहिल्या गेल्या. एकेकाळीं बरीच प्रसिद्धीस आलेली ' घाशीराम कोतवाल ' ही कादंबरी **मोरोबा कान्होबा** यांनीं १८६३ मध्ये लिहून प्रसिद्ध केली. या पुस्तकाला कादंबरी म्हणण्यापेक्षां एकाच विषयासंबंधीं लिहिलेल्या कथांचा कलाप म्हणणेंच युक्त होईल. नाना फडणवीसाच्या विशेष मर्जींतला कनोजी ब्राह्मण घाशीराम हा पुण्याचा कोतवाल असताना त्यानें लोकांना कसें छळलें व अखेरीस तोच स्वतः लोकांच्या क्षोभाला कसा बळी पडला याचें भडक चित्र प्रस्तुत ग्रंथांत रंगविलें आहे. ग्रंथ चटकदार वठला असून अद्यापिहि वाचकांचे मनरंजन करण्यास समर्थ आहे.

याच सुमारास एका विशिष्ट प्रकारच्या कादंबऱ्या बऱ्याच लिहिल्या गेल्या. मजुघोषा ( लेखक—ना. स. रिसबूड ); मुक्तामाला ( ले.—हळबेशास्त्री ); वगैरे कादंबऱ्या या प्रकारांत येतात. " जेवढे पुरुष तेवढे मदनाचे पुतळे, जेवढ्या स्त्रिया तेवढ्या तिलोत्तमा; प्रत्येक शोकस्थलीं मरणासारखा शोक व आनंदस्थलीं स्वर्गासारखा आनंद, वर्णनाची रेलचेल "—असाच प्रकार बहुतेक सर्व कादंबऱ्यांत आढळावयाचा. अद्भुत प्रसंग फार, नायक-नायिकांवरील संकटपरंपरा, त्यांची ताटातूट, त्यांचीं साहसकृत्यें, शेवटीं अकल्पित रीतीनें त्यांची भेट होऊन आनंदीआनंद झालेला अशा ठराविक चाकोरींतून थोड्याफार फरकानें कादंबरीलेखनाचा प्रवाह चालला होता. संस्कृतमधील दशकुमारचरिताच्या धर्तीं-

वर कांहीं कादंबऱ्या लिहिलेल्या आहेत. विचित्रपुरी, सुलोचना या कादंबऱ्या त्यांपैकीं म्हणतां येईल.

"यमुनापर्यटण" या नांवाची कादंबरी **बाबा पद्मजी** या खिस्ती लेखकानें याच सुमारास लिहिली आहे. बाबा पदमजीचा जन्म १८३१ मध्यें झाला व ते १९०६ सालीं ख्रिस्तवासी झाले. हे बेळगांवकडील राहणारे आणि तेथेंच मिशनस्कुलांत त्यांचे शिक्षण झाले. मिशनऱ्यांच्या सहवासाचा व शिकवणीचा त्यांच्या मनावर परिणाम होऊन त्यांनीं ख्रिस्तधर्म स्वीकारला. 'यमुनापर्यटण' या कादंबरींत यमुना ही नायिका आहे व विनायकराव हा नायक आहे. या जोडप्याची हिंदुधर्मावरील श्रद्धा उडून ते ख्रिस्तपदीं कसे लीन होतात याचें निरनिराळ्या प्रसंगांच्या आधारें प्रस्तुत कादंबरींत वर्णन केले आहे. यांतील वर्णन बरेच उथळ व अत्युक्तिपूर्ण आहे आणि कथेमध्ये चटकदारपणा तर बिलकुल नाहीं. बाबा पदमजींनीं ख्रिस्तीधर्मासंबंधीं वाङ्मय पुष्कळ लिहिले आहे. बायबलाचें मराठी भाषांतर हे त्याच्याच परिश्रमाचें फळ आहे. याखेरीज लहानमोठीं शंभरपर्यंत पुस्तके त्यांनीं लिहिलीं आहेत. वर्तमानपत्रांतील लेखनहि त्याचे अखेरपर्यंत चालू होतें; परंतु ख्रिस्ती नसलेल्या लोकांना त्याचीं दोनच पुस्तकें विशेष महत्त्वाचीं व वाचनीय वाटतील. एक त्यांचा मराठी भाषेचा संक्षिप्त कोश व दुसरें त्याचें आत्मचरित्र. "बाबांची भाषापद्धति खरोखरच फार गोड आहे. त्यांत भक्तीचा जिव्हाळा आहे. समाजसुधारणेची तळमळ आहे. वाक्यें शुद्ध, साधीं, सरस व चटकदार आहेत. शब्द वेचक आहेत, वळण जरा कोंकणी आहे." बाबाची गणना मराठींतील उत्कृष्ट लेखकात करण्यास हरकत नाहीं.

या काळांतील प्रमुख गद्यलेखक म्हटले म्हणजे रावबहादूर गोपाळ हरि देशमुख हे होत. यांनीं आपलें सर्व लिखाण 'लोकहितवादी' या टोपण नांवानें प्रसिद्ध केलें आहे. यांचा जन्म पुण्यास इ. स. १८२३ सालीं झाला. शिक्षण संपल्यानंतर त्यांनीं न्यायखात्यांत सरकारी नौकरी धरली. डिस्ट्रिक्ट जज्ज म्हणून त्यांना मुंबई इलाख्यांतील बऱ्याच ठिकाणीं जावें लागलें. ते कांहीं वर्षें कायदे कौन्सिलचे सभासद होते. रतलाम संस्थानच्या दिवाणपदावरहि त्यांची नेमणूक झाली होती. ते इ. स. १८९२ मध्यें निवर्तले.

लोकहितवादी यांनीं तत्कालीन सामाजिक प्रश्नांसबंधीं पुष्कळच लिहिले आहे. पुढील पिढीमध्यें जें कार्य आगरकरांनीं केलें तेंच जागृतीचे कार्य लोकहितवादी यांनीं अगोदरच्या पिढीमध्ये केलें. लोकांना उद्देशून त्यानीं शंभर पत्रे लिहिलीं असून तीं त्यावेळच्या निरनिराळ्या वर्तमानपत्रात प्रसिद्ध झालीं आहेत. त्याचीं कित्येक मतें त्यावेळींहि मान्य नव्हतीं आणि आजहि मान्य होण्यासारखीं नाहींत. आणि म्हणून विष्णुशास्त्री चिपळूणकरांना निबंधमालेतून त्यांच्यावर हल्ला चढवावा लागला आहे. तथापि देशहितासंबंधीं त्याची तळमळ प्रत्येक वाक्यागणीक दिसून येत आहे. आपली संस्कृति, समाज व धर्म यामधील व्यंगें भडक रंगात दाखविण्याकडे लोकहितवादींचा कल होता. भाषेतील जोम व सरळपणा वाखाणण्यासारखा आहे. या शतपत्रांखेरीज पृथ्वीराज चव्हाण याचें चरित्र व ऐतिहासिक गोष्टींचे तीन भाग अशीं त्यांनीं पुस्तकें लिहिलीं आहेत. शतपत्रें लिहिण्याच्या हेतूसंबंधीं लोकहितवादी म्हणतात, " लोकहितवादीनें कोणाची मजुरी पत्करली नाहीं, कशाची अपेक्षा, आशा किंवा इच्छा धरली नाहीं. कोणाचे सांगण्यावरून किवा शिकविल्यावरून कृत्रिम वर्णन केलें नाहीं. लाभावर किंवा द्रव्यावर नजर देऊन कीर्ति व्हावी या हेतूने लिहिलें नाही. इतके श्रम जे केले ते फक्त लोकास त्याची वास्तविक स्थिति कशी आहे ती कळावी, त्यांनीं सुधारावे, त्यास इहलोकीं सुखवृद्धि व्हावी, परलोकाचें साधन घडावें व आपले बहुत काळापासून दृढ ग्रह झाले आहेत त्यांपैकीं कांहीं अविचारानें व कांहीं मूर्खपणानें जडलेले आहेत ते कमी व्हावे किवा नाहींसे व्हावे इतक्याच हेतूनें मी यथामति व स्वइच्छेने वेतनावांचून श्रम केले आहेत; व जितके लिहिलें आहे ते अक्षरशः खरें खरें निवडून विचार करून काळजीनें लिहिलें आहे. हें सर्व लोकांस नजर आहे." यावरून लोकहितवादींची कळकळ व्यक्त होत आहे.

या काळांतील वाङ्मयाचा साकल्याने विचार केला तर आपणाला असें दिसून येईल कीं मराठीचा भाषांतराचा पांगुळगाडा हळुहळू सुटूं लागला. थोडी थोडी स्वतंत्र रचना होऊं लागली. शालोपयोगी पुस्तकाच्या वरच्या दर्जाचें वाङ्मय लेखक लिहूं लागले. नाटक, कादंबरी या वाङ्मयप्रकाराशीं प्रथम परिचय होऊं लागला. लोकजागृतीचें साधन म्हणून भाषेचा उपयोग मराठी लेखकांना चांगलाच पटूं लागला. इतिहास, काव्य, चरित्र या शाखामध्यें

फारशी भर पडली नाहीं. परंतु जुनी कविता उजेडांत आणण्याचा प्रयत्न 'सर्वसंग्रह' नामक मासिकाच्या द्वारा होऊं लागला, आणि प्राचीन काव्यासंबंधीं प्रेम वाटूं लागलें. तथापि अव्वल दर्जाचा वाङ्मयीन ग्रंथ या कालात एकहि झाला नाहीं हे प्राजलपणे कबूल करणे भाग आहे.

**( ३ ) निबंधमालेचें युग.**

आतांपर्यंत झालेल्या मराठी वाङ्मयाचें स्वरूप कांहींसें परपुष्ट आहे. स्वतंत्र प्रतिभेचे लेखक अद्याप निर्माण व्हावयाचे होते. नाटक, काव्य, कादंबरी इत्यादि वाङ्मयप्रकारांत चिरस्थायी स्वरूपाची कलात्मक कृति निर्माण झालेली नव्हती. तो काल म्हणजे मराठी वाङ्मयाचा अरुणोदय होता. तांबडें फुटलें होतें व भावी कालांत होणाऱ्या सूर्योदयाचीं स्पष्ट चिन्हे दिसत होतीं. इंग्रजी संस्कृति आणि वाङ्मय यांचा दृढ परिचय झाल्यामुळें सबंध समाज हादरून गेला होता. नवे विचार, नवे तत्त्वज्ञान, नवी दृष्टि, नवी लोकस्थिति येत होती. या नव्या तत्त्वज्ञानाला वाचा फोडण्याचे कार्य करण्यास नवीन लेखक पुढें आले. मूक-स्थितींत असलेल्या समाजाच्या भावना व विचार याना वाङ्मयात चिरंतन करून ठेवण्याचें कार्य प्रतिभाशाली लेखक व कवि करीत असतात. या नवो-दित लेखकांमध्ये अग्रपूजेचा मान **विष्णुशास्त्री चिपळूणकर** यांना दिला पाहिजे.

कृष्णशास्त्री चिपळूणकर यांचे विष्णुशास्त्री हे ज्येष्ठ चिरंजीव. यांचा जन्म पुणे येथे १८५० सालीं झाला. यांचें प्राथमिक व दुय्यम शिक्षण पुणे येथेच झालें. पुढे उच्च शिक्षणाकरितां त्यानीं कॉलेजमध्यें प्रवेश केला. घरचें वातावरण सुसंस्कृत. कृष्णशास्त्री याच्याकडे नित्य नवीं नवीं पुस्तकें येत. विष्णु-शास्त्री याना वाचनाची आवड जबरदस्त असल्यामुळें पित्याचा ग्रंथसंग्रह त्यांनीं अल्पावधींतच वाचून काढला. जुनी मराठी कविता, संस्कृत काव्यें व नाटकें यांचीं पारायणें केलीं. कॉलेजमध्ये गेल्यावर वाङ्मय व इतिहास या विषया-वरील ग्रंथ त्यांनीं वाचिले. ते १८७२ सालीं बी. ए. झाले.

कृष्णशास्त्री यांच्या वजनामुळें त्यांना पुणें येथील सरकारी हायस्कुलांत शिक्ष-काची नोकरी मिळाली. शिक्षकाची नोकरी करीत असतांनाच १८७४ सालीं त्यानीं आपली प्रसिद्ध निबंधमाला काढली. त्यांनीं लौकरच आपल्या नोकरीचा राजिनामा दिला आणि आपले आवडतें कार्य करण्यास मोकळे झाले. जुनें

काव्य व ऐतिहासिक पत्रें आणि बखरी प्रसिद्ध करण्याकरितां 'काव्येतिहाससंग्रह' नांवाचें मासिक सुरू केलें. 'चित्रशाळा' आणि 'किताबखाना' हे उपक्रम सुरू केले. परंतु याहिपेक्षां महत्त्वाच्या आणि चिरपरिणामी अशा संस्था म्हटल्या म्हणजे न्यू इंग्लीश स्कूलची स्थापना व 'केसरी' आणि 'मराठी' हीं वर्तमानपत्रें. या संस्था त्यानीं टिळक व आगरकर यांच्या साहाय्यानें काढल्या. वर्तमानपत्रें छापण्यास स्वतंत्र व मालकीच्या छापखान्याची जरूर होती म्हणून 'आर्यभूषण' छापखानाहि काढला.

शास्त्रीबोवांनीं आपल्या लेखनसंसाराला निबंधमालेपूर्वींच सुरवात केली होती. शाळापत्रक हें मासिक कृष्णशास्त्री चालवीत असत. त्यावेळींच त्यांनीं स्फुट लेख लिहिण्यास सुरवात केली. संस्कृत कविपंचकावरील लेख प्रथम शाळापत्रकांतूनच प्रसिद्ध झाले. या पुस्तकांत त्यांनीं कालिदास, भवभूति, बाणभट्ट, सुबंधु आणि दंडी इतक्या कवींची मराठी वाचकांना ओळख करून दिली आहे. अलीकडील संशोधनामुळें त्यातील ऐतिहासिक माहिती आज प्रमाण मानतां आली नाहीं तरी त्या त्या कवींच्या वाङ्मयाची रसपूर्ण भाषेंत करून दिलेली ओळख मात्र आजहि वाचकांना पटण्यासारखी आहे.

शास्त्रीबोवांचें चिरंतन वाङ्मयकार्य म्हणजे निबंधमाला होय. निबंधमालेच्या एकंदर ८४ अंकांतून त्यांनीं निरनिराळ्या विषयांचा परामर्श घेतला आहे. याच लेखांनीं महाराष्ट्राला सत्वाची जाणीव करून दिली, कर्तव्याची दिशा दाखविली, मराठी भाषेचें अन्तर्हित सामर्थ्य निदर्शनास आणिलें आणि महाराष्ट्राच्या राजकीय, सामाजिक व धार्मिक भावनाना ओजस्वी वळण लावलें. भाषाविषयक, वाङ्मयचर्चात्मक, सामाजिक व राजकीय या सर्व विषयांवर त्यांनीं वेळोवेळीं निबंध लिहिले.

विष्णुशास्त्री यांची मराठी भाषा प्रौढ, रसभरित व आवेशयुक्त आहे. प्रतिपक्षीयावर हल्ला करतांना व्याजोक्ति आणि उपहास यांचा त्यांनीं भरपूर आश्रय केला आहे. ठिकठिकाणीं दिलेलीं अवतरणें, निर्देश व दृष्टान्त यांवरून त्यांच्या बहुविध वाचनाची खात्री पटते. सर्व लिखाणांत स्वाभिमानाचा प्रवाह सळसळत असतो. प्रसंगोपात्त स्वकीयांच्या दोषावरहि कडक प्रहार करण्यास ते कचरत नसत. जॉन्सन, मेकॉले प्रभृति आंग्ललेखकांच्या निबंधप्रकारानुसार त्यांनीं आपल्या निबंधांची मांडणी केली आहे. उत्कृष्ट ठसकेदार भाषा आणि निर्भय

व निर्भीड विषयप्रतिपादन यामुळें लोकांचें लक्ष त्यांनीं तत्काळ ओढलें. पुढील पिढींतील बहुतेक लेखकांना निबंधमालेनेंच स्फूर्ति दिली.

असा हा प्रभावशाली लेखक वयाच्या अवघ्या ३२ व्या वर्षी कालवश व्हावा हें महाराष्ट्राचें दुर्दैवच समजलें पाहिजे. त्यांचें निधन १८८२ सालीं झालें. परंतु त्यांचें कार्य मराठी भाषा जिवंत असे तोंपर्यंत शिल्लक राहील यांत शंका नाहीं.

निबंधमालेनें महाराष्ट्रांत जागृतीची जी ज्योत पाजळली तिजमुळें सर्वच समाज कार्योन्मुख झाला. राजकारण, समाजकारण, व्यापार, शिक्षण, वाङ्मय इत्यादि सर्व क्षेत्रांत नवीन प्रयत्न व नवीन उपक्रम सुरू झाले. समाजाचें जीवन असें बहुविध आणि गतिशील झाल्यामुळें वाङ्मयहि वाढूं लागलें. वाङ्मयाची प्रगति गेल्या साठ वर्षांत झपाट्यानें झाली आहे. गद्यलेखन, नाटक, कादंबरी, लघुकथा, काव्य इत्यादि वाङ्मयक्षेत्रांत जी स्पृहणीय कामगिरी झाली तिचें थोडक्यांत समालोचन पुढें दिलें आहे. हें समालोचन वर्षानुक्रमानें न देतां विवेचनाच्या सोयीकरितां वाङ्मयाच्या भिन्नभिन्न शाखानुसार दिलें आहे. या शाखा खालीलप्रमाणें पडतात :—

( १ ) गद्यलेखन. ( २ ) विनोदी लेख. ( ३ ) काव्य. ( ४ ) कादंबरी. ( ५ ) लघुकथा. ( ६ ) नाटक. ( ७ ) चरित्रें व आत्मचरित्रें. ( ८ ) इतिहास व ऐतिहासिक संशोधन.

### ( १ ) गद्यलेखन

विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचे सहकारी **टिळक व आगरकर** हे अनुक्रमें राजकीय पुढारी आणि समाजसुधारक म्हणून लोकांना माहित आहेतच. या त्रिवर्गांनीं जे उद्योग सुरू केले होते त्यांत ‘ केसरी ’ आणि ‘ मराठा ’ हीं वर्तमानपत्रें होतीं. प्रारंभीं केसरीमध्ये सर्वच मंडळी लेख लिहीत असत. परंतु वैयक्तिक मतभेदामुळें तीच प्रथा चालू ठेवणें अशक्य झालें आणि केसरी वर्तमानपत्र कोणाच्या तरी एकाच्या हातीं असणें इष्ट आहे असें वाटूं लागलें. व तसें तें १८८७ च्या सुमारास टिळकांच्याकडे गेलें. तेव्हांपासून त्यांनीं राजकीय, सामाजिक शैक्षणिक, वाङ्मय, तत्त्वज्ञान इत्यादि सर्व विषयांवर लिहिलें आहे. त्यांनीं जें लिहिलें आहे तें वाङ्मयाच्या दृष्टीनें लिहिलेलें नसून लोकमत जागृत करण्याकरितां लिहिलें आहे. विष्णुशास्त्र्यांचा कलाविलास किंवा आगरकरांच्या भाषा-

शैलीचें मनोहारित्व त्यांच्या लेखनांत आढळून येत नसलें तरी त्यांची भाषा आवेशयुक्त व हृदयाचा ठाव घेणारी आहे. विचारांचा प्रौढपणा आणि विवेचनाचें गांभीर्य हे गुण विशेष प्रामुख्याने त्यांच्या लेखनांत आढळतात. टिळकांची बुद्धिमत्ता अगाध होती. सर्व विषयांमध्यें तिची गति अप्रतिहत चालत असे. ज्या ज्या विषयावर त्यांनीं लिहिलें त्यामध्यें त्यांची स्वतःची छाप पडलेली दिसते. गीतारहस्य हा अपूर्व ग्रंथ १९१४ सालीं लिहिला. शंकराचार्यांच्या भाष्यानंतर श्रीमद्भगवद्गीतेवर असा अलौकिक ग्रंथ झालेला नाहीं. गीता ही कर्मयोगपर आहे, ती संन्यासाचा उपदेश शिकविणारी नाहीं, हा या ग्रंथांतील मुख्य सिद्धान्त आहे आणि पौर्वात्य व पाश्चिमात्य तत्त्वज्ञानाचा तुलनात्मक अभ्यास करून लो. टिळकांनीं हा आपला सिद्धान्त मांडला आहे. मराठी भाषेंत तर या ग्रंथाला तोड नाहीं. याखेरीज 'ओरायन' आणि 'आर्क्टिक होम इन् दि वेदाज' असे त्यांचे वैदिककालासंबंधीं दोन ग्रंथ आहेत; पण ते त्यांनीं इंग्रजीमध्यें लिहिले आहेत.

प्रिन्सिपाल गोपाळ गणेश आगरकर (१८५६ ते १८९५) हे लो. टिळकांचे सहाध्यायी. त्यांचें कॉलेजशिक्षण बरोबर झालें. कॉलेजमध्यें असतांनाच शिक्षण संपल्याबरोबर सार्वजनिक आयुष्यास वाहून घेण्याचा संकल्प दोघांनीं केला. यांनीं प्रथम न्यू इंग्लीश स्कूल ही संस्था पुणें येथें काढली आणि तिचेंच रूपांतर पुढें डेक्कन एज्युकेशन सोसायटीमध्यें झालें. सोसायटीने फर्ग्युसन कॉलेज काढल्यावर आगरकर तत्त्वज्ञानाचे प्रोफेसर म्हणून काम करूं लागले आणि टिकळ गणित व संस्कृत या विषयांचे प्रोफेसर झाले. प्रि. आपटे यांच्या मागून आगरकर यांची प्रिन्सिपॉलच्या जागेवर नेमणूक झाली. टिळक व आगरकर यांच्यामध्यें मतभेदाचे प्रसंग एकसारखे येत असत व त्यामुळेंच केसरी व सुधारक अशीं दोघांचीं दोन निराळीं पत्रें निघूं लागलीं.

विष्णुशास्त्री चिपळूणकरांप्रमाणें आगरकर यांनींहि निबंध लिहून लोकजागृतीचें कार्य केलें आहे. परंतु दोघांच्या निबंधाचें स्वरूप भिन्न आहे. चिपळूणकरांनीं आपले निबंध मासिक पुस्तकांत प्रसिद्ध केले आहेत. निबंध लिहिण्यास आवश्यक असणारी स्वस्थता त्यांना लाभलेली होती. निबंधाला व्यवस्थित रूप देऊन विषयाची मांडणी पद्धतशीर व रेखीव करतां आली आहे. याच्या उलट आगरकरांचे सर्व निबंध 'केसरी' किंवा 'सुधारक' या वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झाले

आहेत. वर्तमानपत्राचा बहुसंख्य वाचकवर्ग बौद्धिक दृष्ट्या सामान्य प्रतीचा असतो. लेखनाची मर्यादा सांभाळावी लागते. लोकांच्या आटोक्यांत असतील असे विषय घ्यावे लागतात. विद्वत्ताप्रदर्शनास फारसा वाव नसतो. आगरकरांच्या निबंधांत हे सर्व विशेष आपणास सांपडतात. वर्तमानपत्रांतील लेखन निरनिराळ्या विषयांवर होतें आणि आगरकरांनीं अनेक विषयांवर लिहिलेंहि आहे; पण सामाजिक विषयांसंबंधीं लिहिलेल्या निबंधांत आगरकरांचें खरेंखुरें दर्शन होतें. निबंधांच्या भाषेत आवेश ओथंबलेला आहे. प्रतिपक्षावर हल्ला करतांना चिपळूणकर उपहासाचें शस्त्र मोठ्या कुशलतेनें चालवीत. आगरकर प्रतिपक्षासमोर सरळ उभे राहून सडेतोड आणि स्पष्टोक्तिपूर्ण चर्चा करीत. नवीन नवीन शब्दांचीं नाणीं त्यांनीं पाडलीं आहेत. भाषेमध्यें एक प्रकारचें ओज आहे. मधून मधून सामाजिक चालरीतींची हास्यास्पदता दाखविण्यासाठीं त्यांनीं विनोदाचा आश्रय केला आहे.

विपुल गद्यलेखन करणाऱ्या लेखकांमध्यें **वि. कों. ओक** (१८४७–१९१५) यांचा उल्लेख केला पाहिजे. 'बालबोध' नांवाचें मासिक पुस्तक त्यांनीं ३४ वर्षें चालविलें. त्यांतील सर्व लेखन त्यांचेंच आहे. त्याशिवाय लहानमोठीं सुमारें ४० पुस्तकें त्यांनीं लिहिलीं आहेत. त्यांच्या लेखनांत स्वातंत्र्य व विद्वत्ता नाहीं, परंतु निरनिराळे विषय सामान्य मनुष्यासहि समजतील आणि वाचावेसे वाटतील अशा रीतीनें सुबोध भाषेंत मांडण्याचें त्यांचें कौशल्य वाखाणण्यासारखें होतें. सुबोध भाषाशैलीचा नमुना म्हणूनच त्यांच्या वाङ्मयाचा निर्देश करावा लागेल.

वर्तमानपत्रलेखनांत ज्यांनीं पहिल्या प्रतीचा दर्जा मिळविला आहे असे लेखक म्हटले म्हणजे **शि. म. परांजपे** आणि **न. चिं. केळकर** हे होत. परांजपे यांच्या लेखांत कल्पनाविलास भरपूर आढळतो. व्याजोक्तिपूर्ण निबंध लिहिण्यांत परांजपे यांचा हातखंडा असे. सोपी पण सरस भाषा लिहावी परांजपे यांनींच. न. चिं. केळकर हे मराठींतील गद्यलेखकांचे अग्रणी आहेत. राजकारण, इतिहास वाङ्मय इत्यादि अनेक विषयांवर त्यांनीं आपली लेखणी चालविली आहे. अर्वाचीन मराठी गद्याचें वैभव वाढविण्यास केळकरांचें लेखन कारणीभूत झालें आहे. टीकाकाराला आवश्यक असणारा समतोलपणा आणि न्यायबुद्धि त्यांच्या ठिकाणीं असल्यामुळें कोणत्याहि तऱ्हेचें विवेचक लेखन त्यांच्या हातून चांगलें होतें. त्यांची दृष्टि विशाल आणि व्यासंग अप्रतिहत असल्यामुळें त्यांच्या

लेखनांत ताजेपणा असतो. प्रतिपक्षाच्या दोषाप्रमाणेंच गुणावरहि त्यांची दृष्टि जाते आणि त्याचें गुणगौरव करण्यास ते तत्पर असतात. भावनेचा किंचित् काल टिकणारा खळखळाट त्यांच्या लेखनांत नसतो. बुद्धीला चालना देऊन ती जागृत करण्याकडे त्यांचा रोंख असतो. रसिकता आणि विवेचकता यांचा सुंदर मिलाफ त्यांच्या लेखनांत आढळतो.

मराठीमध्यें त्रुटित लेखन पुष्कळच झालेलें आहे. हें नियतकालिकाचें युग आहे त्यामुळें अशा लेखनाला अनुकूल संधिहि प्राप्त झाली आहे. मराठी गद्य-भाषेचें वळण ठरविण्यास ज्या नामवंत लेखकांच्या भाषाशैली कारणीभूत झाल्या त्यांचा निर्देश वर केला आहे. चालू पिढींतील लेखकांमध्यें विशिष्ट भाषाशैलीचे प्रतिनिधि म्हणून अ. ब. कोल्हटकर, द. वा. पोतदार, श्री. म. माटे, ग. त्र्यं. माडखोलकर इत्यादि लेखकांचा प्रामुख्यानें उल्लेख करावयास पाहिजे.

## विनोदी वाङ्मय

मराठींतील विनोदी वाङ्मय हें इंग्लीश वाङ्मयाच्या बरोबर घडून आलेल्या परिचयाचाच परिपाक आहे यांत शंका नाहीं. याचा अर्थ महाराष्ट्रांतील लोकांना विनोदबुद्धि नव्हती असें नाहीं. कदाचित् इतर राष्ट्रांतील लोकांच्या मानानें तिचें प्रमाण कमज्यास्त असेल एवढेंच. परंतु या विनोदबुद्धीचें प्रतिबिंब वाङ्मयाच्या आदर्शांत पडण्यास इंग्लीश वाङ्मयाच्या अभ्यासानें आलेली नवीन वाङ्मयदृष्टि कारणीभूत झाली. बहुतेक जुनी मराठी कविता अध्यात्मपर व धार्मिक भावनेनें रसरसलेली आहे. संस्कृतांतील धर्मपर वाङ्मयाची तिच्यावर छाप अधिक बसलेली. तिच्यावर संस्कृतांतील ललित वाङ्मयाची छाया अगदीं पुसट पडलेली आहे. संस्कृतमध्यें सुद्धां विनोदी वाङ्मय बेताचेंच. अशी परिस्थिति असतांना देखील तुकाराम, रामदास, मोरोपंत इत्यादि कवींच्या काव्यांत विनोदाच्या लहरी प्रसंगोपात्त उमटतातच.

या विनोदबुद्धीचें प्रतिबिंब चिरस्थायी स्वरूपाच्या वाङ्मयापेक्षां अल्पकालीन वा तात्कालिक लौकिक प्रचारांत असलेल्या वाङ्मयांत अधिक पडलें आहे. थोर व्यक्तीबद्दलच्या आख्यायिका, जुन्या लोककथा, जावईबोवासंबंधीं प्रचारांत असलेल्या गोष्टी, नारद किंवा श्रीकृष्ण अशा सारख्या पौराणिक व्यक्तींविषयीं प्रचलित असलेल्या हरदासी थाटाच्या कथा यांमध्यें या विनोदबुद्धीचें प्रत्यंतर पाहण्यास सांपडेल.

विनोदी वाङ्मयाच्या जनकत्वाचा मान **श्रीपाद कृष्ण कोल्हटकर** यांना दिला पाहिजे. कोल्हटकरांच्या पूर्वी झालेल्या वाङ्मयांत विनोद येत नव्हता असें नाहीं. निबंधमालेमध्यें उपहासात्मक विनोदाचीं उत्कृष्ट उदाहरणे सांपडतात. वर्तमानपत्रांत प्रतिपक्षावर टीका करतांना विनोदाचा आश्रय घेतलेला दिसतो. प्रहसनें, फार्स किंवा सामाजिक नाटकें यांमध्यें विनोदाला महत्त्वाचें स्थान होतें. परंतु या सर्व ठिकाणीं विनोद हा अगभूत होता. कोल्हटकरांनीं विनोदी लेखनाची नवीन प्रथा पाडली. यांत विनोदाला प्रमुख स्थान दिलेलें दिसून येतें. त्यांचे हे सर्व विनोदी लेख 'साहित्यबत्तिशी' या पुस्तकांत समाविष्ट केले आहेत. अतिशयोक्तीचा आश्रय करून समाजांतील व्यंगें उपहासविषय होतील अशा तऱ्हेनें मांडावयाची त्यांची पद्धत असे. कोल्हटकर हे पक्के समाजसुधारक होते. त्यामुळें पुराणमताभिमानी लोक व त्यांचे आचारविचार यांवर त्यांनीं टीकास्त्र सोडलें आहे. परंतु तरवारीच्या वाराप्रमाणें त्यानें जखम होत नाहीं तर रेशमी चाबकाच्या मऊ फटकाऱ्यासारखा मुका मार बसतो. शिमगा, गणेशचतुर्थी, निर्जळी एकादशी, चित्रगुप्ताचा जमाखर्च इत्यादि लेखांनीं समाजाच्या डोळ्यांत झणझणीत अंजन घातलें आहे. कांहीं प्रकारच्या आरशापुढें उभें राहिलें म्हणजे आपली आकृती विकृत स्वरूपांत दिसते आणि आपलें आपल्यालाच हसूं येतें, त्याप्रमाणें आपल्या समाजांतील रूढ चालींचें विकृत स्वरूप त्यांच्या विनोदी लेखामुळें वाचकांना तत्काळ पटतें.

म्हातारपणाचे फायदे, साक्षीदार, कुलुप, चोरांचें संमेलन, साहित्यपरिषदेची तयारी इत्यादि लेख कोल्हटकरांच्या उच्च विनोदी बुद्धीची चांगली साक्ष देतात. पांडुतात्या, बंडूनाना व सुदामा अशीं तीन काल्पनिक पात्रें त्यांनीं निर्माण केलीं आहेत आणि त्यांचा संबंध बहुतेक लेखांत आणला आहे. हीं पात्रें निर्माण केल्यामुळें निरनिराळे विनोदी प्रसंग व घटना लेखांत आणणें शक्य झालें आहे. समाजाला मान्य असलेल्या कल्पना किंवा रूढि घेऊन त्यांतील फोलपणा परिहासपूर्वक निदर्शनास आणावयाचा आणि तसें करतांना शब्दावरील कोट्या सढळ हातानें इतस्ततः विखरून ठेवावयाच्या ही त्यांची पद्धत असे. तथापि वर निर्दिष्ट केलेल्या लेखांमध्यें त्यांचा शुद्ध विनोद पहावयास सांपडतो.

कोल्हटकरांच्या विनोदी लेखनपद्धतीचें अनुकरण बऱ्याच लेखकांनीं केल

आहे. त्यांत **राम गणेश गडकरी** हे प्रमुख आहेत. बाळकराम या टोपण नांवाखालीं त्यांनीं आपले विनोदी लेख लिहिले. गडकरी कवि आणि नाटककार म्हणून जसे प्रसिद्धीस आले तसेच ते विनोदी लेखक म्हणूनहि गाजले. ठकीचें लग्न या विषयावर त्यांनीं लिहिलेल्या लेखमालेंत वरसंशोधनाची आपली पद्धत, लग्न मोडण्याचीं कारणें, वराच्या बापाचा चढेलपणा, हुंड्याची चाल, पत्रिकांचें अवास्तव महत्त्व इत्यादि गोष्टींचा त्यांनीं खरपूस समाचार घेतला आहे. त्यांचा विनोद अतिशयोक्तीकडे अधिक झुकलेला असे. ठकीचें वर्णन आणि तिच्या लग्नाच्या मोहिमेचें वर्णन हे अतिशयोक्तीचे नमुने आहेत. 'कवींचा कारखाना' ही आधुनिक कवि व कविता यांवर केलेली टीका त्यांच्या निष्ठुर उपहासाचें उदाहरण आहे. 'सकाळचा अभ्यास' या बालस्वभावदर्शक प्रहसनांतील प्रसंगनिष्ठ विनोद बहारीचा आहे. 'स्वयंपाकघरांतील गोष्टी' यामध्यें गडकऱ्यांचा कोटिबाजपणा दिसून येतो. एकंदरींत विनोदी लेखनाच्या बाबतींत गडकऱ्यांनीं कोल्हटकरांचीच परंपरा पुढें चालविली. शब्दावरील कोट्यांचें प्राचुर्य दोघांच्याहि लेखांत दिसून येतें. परंतु कोल्हटकरांचें लक्ष सामाजिक व्यंगांकडे विशेष गेलें होतें. त्याचे निम्मे अधिक लेख सामाजिक टीका या सदरांत येतील. शिवाय कोल्हटकरांच्या लेखनांतील भारदस्तपणा गडकऱ्यांच्या लेखनांत आढळून येत नाहीं. कोल्हटकराच्या व्यासंगांचे आणि विद्वत्तेचें दिग्दर्शन त्यांच्या या लेखांतहि होत असल्यामुळें वाचक बहुश्रुत असल्याखेरीज त्या विनोदाचें रहस्य व यथार्थ व्यंजकता त्याला कळणार नाहीं. गडकऱ्यांचा विनोद सामान्य वाचकांच्याहि हांसून हांसून मुरकुंड्या वळवितो.

**का. ना. पटवर्धन** यांनीं 'नाटक्याचे तारे' म्हणून एक लेखमाला लिहिली आहे. नटवर्ग, नाटक करण्याची पद्धत, कथानकाच्या कालाचा विचार न करतां वेष धारण करण्याची हौस, निरर्थक प्रवेश इत्यादि नाट्यांगांवर मार्मिक टीका विनोदप्रचुर भाषेंत त्यांनीं केली आहे. मराठी रंगभूमीचें तत्कालीन स्वरूप समजून येण्यास या टीकालेखांचा फारच उपयोग आहे. **प्रो. ना. के. बेहेरे** यांचे विनोदी लेख 'बोथट बाण' या पुस्तकांत संकलित केले आहेत. परंतु यांतील विनोद अगदींच सामान्य दर्जाचा आहे. तथापि त्यांतील 'दोन चित्रें' व 'आजकालचीं पोरें' हे लेख मार्मिक आहेत.

विमा-तज्ञ म्हणून महाराष्ट्रांत प्रसिद्ध असलेले श्री. ग. स. मराठे यांनीं

आपले विनोदी लेख " थालीपीठ " या नांवाखालीं प्रसिद्ध केले आहेत. श्री. स. ना. ठोसर यांच्या सहकार्यानें त्यांनीं श्री. कोल्हटकर यांच्या गुप्तमंजूषा नाटकावर 'नाट्यकलारुक्कुठार' नांवाची विनोदी टीका लिहिली आहे. श्री. मराठे यांनीं विलायतच्या प्रवासाचें वर्णन विनोदी भाषेंत करून त्यांचा संग्रह थालिपीठ या पुस्तकांत केला आहे. या विनोदांत कृत्रिमपणा असला तरी त्यांत लेखकाची प्रखर कल्पनाशक्ति दिसून येते.

अलीकडील विनोदी लेखकांत **प्र. के. अत्रे, कॅ. लिमये** आणि **प्रो. चिं. वि. जोशी** हे प्रमुख आहेत. 'बाळूची बायको', 'जांबुवंत दंतमंजन,' 'ब्रँडीची बाटली,' इत्यादि गोष्टी व 'चित्रमय पुणें' ही लेखमाला प्रि. अत्रे यांच्या खुसखुशीत विनोदाचीं उदाहरणें आहेत. 'विनोदलहरी,' 'विनोदसागर' व 'जुनाबाजार' या तीन पुस्तकांत कॅ. लिमये यांचे बहुतेक सर्व विनोदी लेख आले आहेत. 'एरंडाचें गुऱ्हाळ,' 'चिमणरावांचें चऱ्हाट' 'वायफळांचा मळा' हीं तीन पुस्तकें प्रो. चिं. वि. जोशी यांचीं आहेत. या तिन्ही लेखकांनीं मराठींतील विनोदी लेखनाची परंपरा चालू ठेविली आहे. तिघेहि लेखक प्रतिभासंपन्न आहेत. त्यांच्यामध्यें तल्लख विनोददृष्टि आहे. आणि त्यांच्या हातून यापुढेहि विनोदी वाङ्मयांत चांगली भर पडेल असा विश्वास वाटतो.

नवोदित विनोदी लेखकांमध्यें श्री. शं. कृ. देवभक्त, श्री. य. न. केळकर, श्री. मो. गो. सोमण, श्री. वि. मा. दी. पटवर्धन आणि श्री. शामराव ओक यांचा प्रामुख्यानें निर्देश करावयास पाहिजे. श्री. केळकर यांचा विनोद बुद्धिनिष्ठ असल्यामुळें व त्यांतील कोटिबाजपणा सुसंस्कृत असल्यामुळें सामान्य वाचकांच्या आवांक्या पलिकडील आहे. पटवर्धन आणि ओक यांच्या लेखनांत चालू परिस्थितीचे पडसाद उमटलेले असतात त्यामुळें त्यांचें विनोदी लेखन अधिक लोकप्रिय आहे.

## काव्य

अर्वाचीन मराठी कवितेस स्वतंत्र प्रभावी वळण केशवसुतापासून लागलें. तत्पूर्वीची कविता संस्कृत किंवा इंग्लीश या भाषांतील काव्यांचीं भाषांतरें असत. कृष्णशास्त्री चिपळूणकर आदिकरून शास्त्रीमंडळींनीं संस्कृत काव्यांचीं भाषांतरें केलीं, तर विष्णु मोरेश्वर महाजनी, गोविंद वासुदेव कानिटकर आदिकरून सुशिक्षित पदवीधर विद्वानांनीं इंग्रजी काव्याला मराठी पेहराव दिला. या संधि-

कालांत स्वतंत्र रचना करणारे कांहीं कवि झाले पण त्यांच्या काव्यावर संस्कृत किंवा इंग्रजी कवि यांची दाट छाया पडली आहे. **कुंटे** यांनीं शिवाजी आणि राजाराम यांवर एक खण्डकाव्य लिहिलें आहे. सोपी भाषा लिहण्याचा निश्चय कुंटे यांनीं केला होता. पण त्यांच्या सोपेपणाला ग्राम्यपणाचें रूप प्राप्त झालें आहे. **चिंतामणिपेठकर** यांचें गंगावर्णन हें काव्य जुन्या वळणाचें पण स्वतंत्र आहे. **वासुदेवशास्त्री खरे** यांचें यशवंतराव महाकाव्य याच कालांतलें आहे. **कीर्तिकर** यांनीं आंग्लकवि टेनिसन यांच्या प्रिन्सेस्‌चें भाषांतर 'इंदिरा' म्हणून केलें. नारायणराव पेशव्याचा वध, अकबर इत्यादि खण्डकाव्यें यावेळीं लिहिलेलीं दिसतात. तथापि या सर्व कवींमध्यें आपल्या स्वतंत्र प्रतिभेनें वाचकांना आकर्षून घेणारा एकहि नव्हता. हे सर्व पडसाद होते. मराठी कवितेला स्वतंत्र वळण लावणारा कवि निर्माण व्हावयाचा होता.

हें कार्य केशवसुतांनीं केलें. त्यांचें संबंध नांव **कृष्णाजी केशव दामले.** यांचा जन्म १८६६ मध्यें झाला व ते १९०५ मध्यें प्लेगनें वारले. त्यांचें शिक्षण पुणें येथील न्यू इंग्लीश स्कूलमध्यें प्रवेशपरीक्षेपर्यंत झालें. त्यानंतर त्यांचें सर्व आयुष्य खानदेशांत शाळामास्तरची नौकरी करण्यांत गेलें. १८८५ ते १९०५ पर्यंतच्या वीस वर्षांच्या काळांत त्यांनीं सुमारें १५० भावगीतें लिहिलीं. यांपैकीं थोडीं भाषांतरात्मक असून बाकी सर्व स्वतंत्र आहेत. नव्या कल्पना व जोरकस भाषा यामुळें केशवसुतांच्या कवितेंत जिवंतपणा वाटतो व त्यांतील भावनांची उत्कटता हृदयाला जाऊन भिडते. केशवसुतांना स्फूर्ति जरी इंग्रजी कवितेपासून मिळाली असली तरी त्याना आपली संस्कृति व देश याबद्दल उत्कट प्रेम वाटत होतें. त्यांच्या भाषेंत नादमाधुर्य कमी असलें तरी ओजस्विता आणि स्फूर्तिदायकता हे गुण भरपूर आहेत.

**रे. नारायण वामन टिळक** हे केशवसुतांचे समकालीन कवि. यांचा जन्म कोंकणांत १८६२ सालीं झाला. त्यांचें थोडें बहुत इंग्रजी शिक्षण नाशकास झालें. परिस्थितीच्या प्रतिकूलतेमुळें इंग्रजी शिक्षण अर्धेंच सोडावें लागलें. यानंतरचा दहा बारा वर्षांचा काळ त्यांनीं महाराष्ट्रांतील निरनिराळ्या शहरीं भिन्न भिन्न व्यवसाय करण्यांत घालविला. त्यांची वृत्ति अतिशय चंचल असे. नागपुरास असतांना त्यांनीं धर्मचर्चेला वाहिलेलें 'ऋषि' नांवाचें मासिक

काढलें होतें. परंतु अखेरीस ख्रिस्ती धर्ममताची छाप त्यांच्यावर अधिक बसल्यामुळें १८९५ सालीं त्यांनीं त्या धर्माचा स्वीकार केला. यापुढील त्यांचें १९१७ पर्यंतचें आयुष्य अहमदनगरास गेलें व शेवटलीं दोन वर्षें त्यांनीं साताऱ्याला घालविलीं. त्यांच्या धर्मपरिवर्तनामुळें त्यांनीं ख्रिस्तप्रेमानें प्रेरित होऊन बरीच कविता केली. रामायणाच्या धर्तीवर 'ख्रिस्तायन' म्हणून ख्रिस्तचरित्रपर महाकाव्य लिहिण्याचें कार्य त्यांच्या हातून पूर्ण झालें नाहीं तें त्यांच्या पत्नीनें पुरें केलें. 'अभंगाञ्जलि' आणि 'भजनसंग्रह' यांमध्यें त्यांची भक्तिपर रचना सांपडते. खण्डकाव्यांपैकीं त्याचे ' वनवासी फूल ' हे तत्त्वप्रचुर काव्य विशेष प्रसिद्ध आहे. मुलें आणि फुलें यासंबंधीं मनोरम काव्यें यांनीं केलीं असल्यामुळें यांना मुलाफुलांचे कवि असें म्हणतात. शृंगार किंवा वीर या रसापेक्षां करुण, वत्सल व शांत या रसांकडे कवीचा ओढा विशेष आहे. त्यांची भाषा साधी व गोड आहे. सोप्या शब्दांत तत्त्वज्ञानप्रचुर विचार मांडण्याचें चांगलेंच कौशल्य या कवीमध्यें दिसून येतें.

**गंगाधर रामचंद्र मोगरे** (१८५८–१९०४) यांची कविता जुन्या वळणाची आहे. त्यांची सर्व कविता मोगऱ्याचीं फुलें या नांवाखालीं पांच भागात प्रसिद्ध झाली आहे. विडंबन हा काव्यप्रकार मराठींत प्रथम आणण्याचें श्रेय मोगरे यांना दिलें पाहिजे. पदव्यांचा पाडवा, मेथाजींची मजलस वगैरे विडंबन काव्यें त्यांनीं लिहिलीं आहेत. ज्याला भावगीते म्हणतां येईल अशी काव्यरचना त्यांच्या हातून फारशी झाली नाहीं. विडंबनकाव्याखेरीज शोककाव्यें आणि खण्डकाव्यें त्यांनीं लिहिलीं आहेत. आर्या हें वृत्त त्यांना बरेंच आवडतें असावेंसें दिसतें. मोगऱ्यांनीं तत्कालीन प्रसंगावर कांहीं स्फुट रचना केली आहे.

**वि. भ. लेंभे** आणि **चंद्रशेखर शिवराम गोऱ्हे** या दोघांहि कवींच्या रचनेचें वळण जुनेच आहे. श्लोकबद्ध रचना हा त्यांचा विशेष आहे. भावगीतें रचण्याला अनुकूल अशी त्यांची प्रतिभा नाहीं. परंतु त्यांनीं लिहिलेलीं खण्डकाव्ये आणि स्फुट प्रकरणें सरस आहेत. लेंभे यांचीं सुरतरंगिणी व खण्डिता हीं काव्यें आणि शोकावर्त हें विलापिका काव्य वाचनीय आहेत. संस्कृतभाषेच्या अभ्यासामुळें लेंभे यांची भाषा संस्कृतप्रचुर परंतु नादमधुर आहे. चंद्रशेखरांची **चंद्रिका** नांवाप्रमाणेंच आल्हाददायक आहे, कल्पना व रचना या दोन्ही

बाबतींत चंद्रशेखरांची कविता अर्वाचीन मराठी काव्यापासून दूर आहे. भावगीतें हें अर्वाचीन मराठी काव्याचें वैशिष्टय तर चंद्रशेखरांची प्रतिभा खण्डकाव्यें लिहिण्यांतच सार्थक मानते. चंद्रशेखरानीं वाचकांना जें वेड लाविलें तें भाषेच्या हृदयंगमतेमुळें. त्यांची वाणी आकर्षक आणि प्रासादिक आहे. शब्दयोजना वेंचक. काव्यमय शब्द त्यांना सहज स्फुरतात. हें भाषेचें सौंदर्य अर्वाचीन मराठी काव्यांत तरी अपूर्व आहे.

मराठी कवितेला अर्वाचीन वळण देण्याचें कार्य केशवसुत व टिळक यांजप्रमाणें **विनायक जनार्दन करंदीकर** यांनींहि केलें आहे. विनायकांचा जन्म १८७२ मध्ये झाला आणि ते १९०९ सालीं निवर्तले. जन्म आणि शिक्षण धुळें येथें झालें. विनायकांना आधुनिक राष्ट्रीय व ऐतिहासिक कवितेचे जनक म्हणण्यांत येते तें अगदीं सार्थ आहे. देशाची दुरवस्था पाहून त्यांचें हृदय पिळवटून निघत असे; ऐतिहासिक कालांत ज्या शूर स्त्रियांनीं अतुल पराक्रम किंवा स्वार्थत्याग दाखविला अशा स्त्रियांचीं चरित्रें त्यांनीं आदरपूर्वक गायिलीं आहेत. सोपी परंतु उत्कट भावनांनीं ओथंबलेली कविता लिहिण्याचें त्यांचें कौशल्य इतरांना क्वचितच साधलें आहे. महाराष्ट्राच्या दिव्य पूर्वेतिहासाबद्दल त्यांना नितांत अभिमान वाटत होता आणि म्हणूनच त्यांना भावी काल आशादायक वाटत होता. ' प्रीति निमाली तर, ' ' सुवास ' आणि ' स्त्री आणि पुरुष ' हीं भावगीतें म्हणजे त्यांच्या प्रतिभेचे उत्कृष्ट फळ आहे.

**'दत्त'** यांचें सबंध नांव **दत्तात्रय कोंडो घाटे**; यांचा जन्म १८७५ त अहमदनगर येथें झाला. १८९८ सालीं ते कलकत्ता युनिव्हर्सिटीची बी. ए. परीक्षा पास झाले. नौकरी मिळविण्यासाठीं ते बडोद्यास गेले आणि तेथेंच प्लेगच्या दुःसाध्य रोगाला ते वयाच्या अवघ्या चौविसाव्या वर्षी बळी पडले. दत्तांनीं निसर्गपर, देशभक्तिपर आणि काहीं प्रेमविषयक अशीं काव्यें केलीं असलीं तरी त्यांचें वैशिष्टय शिशुगीतांत आहे. वत्सलरसाचा परिपोष त्यांना चांगला साधतो. ' निज नीज माझ्या बाळा ' या उत्कृष्ट करुणगीताला मराठी भाषेंत तोड नाहीं. ' फुलें विकणारी पोर ' व ' एका आसन्नमरण दुष्काळ पीडितास ' या कविता हृदयद्रावक आहेत. दत्त यांना अधिक आयुष्य लाभलें असतें तर मराठी काव्यवाङ्मयांत चांगली भर पडली असती.

**माधवानुज** यांचें मूळ नांव **काशिनाथ हरि मोडक** ( १८७२–१९१७ ); धंदा डॉक्टरीचा पण वाङ्मयाकडे स्वभाविक कल असल्यामुळें इंग्रजी कवींच्या कृतीचा उत्तम परिचय त्यांना झाला होता. रवीन्द्रनाथ टागोर यांच्या प्रसिद्ध गीताञ्जलीचें यांनीं केलेलें भाषांतर आतांपर्यंत झालेल्या सर्व प्रयत्नांत सरस आहे. काव्यरचना करतांना जुन्या वृत्तांप्रमाणेच नवीन चालींचाहि त्यांनीं स्वीकार केला आहे. नित्याच्या जीवनांतील मनोवेधक प्रसंगांची निवड करून त्यावर काव्य करण्याकडे माधवानुजांची प्रवृत्ति असे. करुणरस त्यांच्या काव्यांत प्रमुखत्वानें आढळतो. त्यांना जे प्रसंग प्रत्यक्ष अनुभवावे लागले तेच सहानुभूतिपूर्वक वर्णिल्यामुळें त्यांच्या कवितेंत नाविन्य आलें आहे. कल्पनेची उत्तुंग भरारी त्यांच्या काव्यांत आढळावयाची नाहीं. पण मर्यादित क्षेत्रांतील वेंचक विषय साध्या भाषेंत सांगितल्यामुळें त्यांच्या काव्यांत जिव्हाळा अधिक आहे. तत्त्वशोधनाकडे त्यांचा कल फार. गोष्ट सांगितली कीं तात्पर्य सांगावयाचें असा प्रकार नीतिपर कथेंत जसा असतो त्याचेंच अनुकरण त्यांनीं बऱ्याचशा कवितांमधून केलें आहे. एखाद्या हृदयंगम कल्पनेचा विस्तार करण्याची हातोटीहि त्यांच्यामध्यें दिसून येत नाहीं. तथापि त्यांच्या कवितेंतील शुचिर्भूतपणामुळें ती आबालवृद्धांना सारखीच प्रिय आहे.

**त्र्यंबक बापूजी ठोमरे** ऊर्फ **बालकवि** हे कवि म्हणून अगदीं लहान वयांत पुढें आले आणि म्हणूनच महाराष्ट्रानें बालकवि ही पदवी कौतुकानें व प्रेमानें त्यांना बहाल केली. बालकवींचा रे. नारायण वामन टिळकांबरोबर परिचय घडून आला आणि या परिचयाचें रूपांतर दृढ स्नेहांत झालें. टिळक यांनीं आपत्कालीं बालकवि यांना आधार दिला. केशवसुत, टिळक आणि विनायक या तिघांहि समकालीन कवींचा बालकवींच्या काव्यावर परिणाम झालेला दिसून येतो. केशवसुताप्रमाणें त्यांनीं गूढगुंजनात्मक कविता लिहिली. देशभक्तिपर किंवा ऐतिहासिक कविता लिहिण्याची स्फूर्ति त्यांना विनायकांपासून मिळाली. टिळकांच्या धर्तीवर त्यांनीं मुलाफुलांचीं गाणीं रचलीं. परंतु बालकवींचें खरें वैशिष्ट्य त्यांच्या निसर्गवर्णनात्मक काव्यामध्यें सांपडतें. बालकवी निसर्गाशीं तादात्म्य पावत असत. सृष्टींतील सौंदर्यानें बेहोष होऊन रचलेलीं निसर्गसंबंधींचीं गाणीं नितांतमधुर आहेत. 'संध्यारजनी', 'अरुण', 'फुलराणी ', 'निर्झर ', 'तारकांचें गाणें' या निसर्गपर कविता मराठींत अमरपद पावल्या आहेत. त्यांची

शब्दरचना अत्यंत कोमल आहे. माधुर्य हा गुण त्यांच्या कवितेंत ओतप्रोत भरला आहे. अशा या कवीचा वयाच्या केवळ २८ व्या वर्षी अपघातानें अंत व्हावा हें मराठी वाङ्मयाचें केवढें दुर्दैव !

केशवसुतांच्या युगांतील शेवटले कवि म्हणजे **गोविंदाग्रज** ऊर्फ **राम गणेश गडकरी.** कवि, नाटककार आणि विनोदी लेखक या तिन्हीं नात्यांनीं ते महाराष्ट्रांत गाजले. त्यांनीं आपले विनोदी लेख बाळकराम या टोपण नांवानें आणि कविता गोविंदाग्रज या नांवानें प्रसिद्ध केल्या आहेत. गोविंदाग्रजाइतकी लोकप्रियता कोणत्याहि आधुनिक मराठी कवीला त्यावेळीं लाभली नव्हती. गोविंदाग्रजांची कविता कॉलेजांतील विद्यार्थींच गुणगुणत असें नव्हे तर माजघरांतील लहान–थोर स्त्रीवर्गामध्यें त्यांच्या कवितेचा एकेकाळीं प्रसार झाला होता. गोविन्दाग्रज यांना प्रेमाचे शाहीर व तरुणांचे कवि असें संबोधण्यांत येतें. तरुणजनसुलभ अशा प्रेमविषयक भावना त्यांनीं शब्दार्थालंकारांनीं नटलेल्या आपल्या भाषेनें ग्रथित करून वाचकांना मोहिनी पाडली. त्यांच्या बहुतेक प्रेमविषयक कवनांतून निराशेचा सूर निघत असतो. गोविन्दाग्रज आपणाला केशवसुतांचे सच्चे चेले म्हणवीत असत. परंतु दोघांच्या काव्यरचनेंत तफावत आहे. केशवसुतांच्या भावनेची उत्कटता गोविंदाग्रजामध्ये नाहीं. त्यांचे काव्य भावनेपेक्षां बुद्धीला हलविणारें आहे. कल्पनांचा विलास आणि उत्प्रेक्षा यांकडे त्यांचा ओढा अधिक. चमत्कृतिजन्य आल्हाद आणि शब्दाची कसरत यांची रेलचेल त्यांच्या काव्यांत आढळते. केशवसुतांच्या भाषेचा साधेपणा कधीं कधीं रसापकर्षक वाटतो. उलट गोविन्दाग्रजांनीं भाषासुंदरीला अनेकपरीनें भूषविलें आहे. जुनें मराठी काव्यमय शब्द शोधून काढून त्यांचा उपयोग करण्याचा हव्यास त्यांना लागलेला होता. त्यांना कल्पनेवर कल्पना सुचत, आणि त्या त्या कल्पनेला अनुकूल भाषाहि ते लिहीत. त्यामुळें त्यांच्या कांहीं कविता पाल्हाळिक झाल्या आहे. कल्पनेची बळजोरी झाल्यामुळें भावनेकडे दुर्लक्ष झालें आहे. गोविंदाग्रजांनीं आपल्या भाषेची मोहनी इतकी टाकली कीं, त्यांचें अनुकरण करणारे लेखक व कवि पुष्कळ निर्माण झाले.

**भा. रा. तांबे** हे केशवसुत टिळकांचे समकालीन. त्यांचा जन्म १८७४ सालीं झाला. त्यांचें शिक्षण आणि नौकरी ग्वाल्हेर संस्थानांत झाली आहे. अर्वाचीन कवीमध्यें तांबे यांचें स्थान पहिल्या प्रतीचें आहे. केशवसुतादिकांच्या कवितांमध्यें

तत्कालीन महाराष्ट्राचें शब्दचित्र उमटलेलें सांपडतें. समाजाच्या सामुदायिक सुखदुःखाचा आढावा घेणें तांब्यांच्या प्रतिभेला तितकेंसें मानवलेलें दिसत नाहीं. त्यांची कांहीं कविता सामाजिक विषयावर आहे हें खरें; परंतु नवविचारांची आंच त्यांना तितकीशी लागलेली नाहीं. त्याची प्रतिभा स्वतःच्या जगांत मनसोक्त विहार करीत असते. स्वतःला आवडणारा विचार किंवा प्रसंग सांपडतांच कवीच्या हृत्कुहरामध्यें घुमूं लागणाऱ्या भावना शब्दरूपानें बाहेर पडून मूर्तस्वरूप पावतात.

तांब्यांनीं जुन्याप्रमाणें नवीन छंदांचाहि अवलंब केला आहे. जुन्या वृत्तांपैकीं शार्दूलविक्रीडित, द्रुतविलंबित, उपजाति व दिंडी या वृत्तांचा त्यांनीं उपयोग केला आहे. अलीकडील बहुतेक कविता नवीन छंदांत रचलेली आहे. आधुनिक वृत्तांना अनुरूप रागाची जोड दिल्यामुळें त्यांच्या कवितेंत गेयता आली आहे. अन्त्ययमक हें मराठींतील काव्यलेखनाचें एक आवश्यक अंग होऊन बसलें आहे. तथापि ज्या कांहीं थोड्या कवींनीं अन्त्ययमकरहित कविता लिहिण्याचा प्रयोग करून पाहिला त्यात तांबे हे एक आहेत. तांब्यांचीं सुनीतें, 'चिरंजीव कोण ?' इत्यादि कविता अशाप्रकारें लिहिलेल्या आहेत. तांबे यांची भाषा संस्कृत-प्रचुर असली तरी व्याकरणशुद्धतेकडे त्यांचें लक्ष कमी दिसतें. तसेंच अनुरूप शब्दयोजना न झाल्यामुळें कित्येकवेळां रसोत्कर्षासहि बाध येतो.

तांबे यांच्या पहिल्या पहिल्या कवितांमध्यें कौटुंबिक प्रसंगांवरील कविता रम्य आहेत. शिशुगीतें थोडींच लिहिलीं आहेत; परंतु तींहि सरस आहेत. 'आतां गडी फू दादाशीं' हें गीत तर फारच उत्कृष्ठ साधलें आहे. त्यांच्या नाट्यगीतांमध्यें शृंगार व वीर या रसांचा मनोहर मिलाफ झालेला आहे. 'रोखुनि मज पाहूं नका', 'राजकन्या व दासी' या कवितांमध्ये स्त्रीस्वभाव उत्कट रीतीनें प्रतिबिंबित झाला आहे. तांबे यांच्या अलीकडील बऱ्याचशा कविता तत्त्वसंशोधनात्मक आहेत. तथापि तांबे यांची प्रतिभा इतकी उज्ज्वल आहे कीं या तत्त्वपर कवितांमध्यें नीरस अशी कविता क्वचितच सांपडेल. गूढगुंजनाची वायफळ बडबड त्यामध्यें बिलकूल नाहीं.

केशवसुतांच्या संप्रदायांतील टिळक, गडकरी आणि बालकवि हे कवि १९२० सालच्या सुमारास दिवंगत झाले. तेव्हां केशवसुतांचें युग संपून नवीन युगाला

यावेळीं सुरवात झाली असें समजण्यास हरकत नाहीं. या काळांत अनेक कवि उदयास आले आहेत. रविकिरणमंडळाच्या सदस्यांपैकीं माधव ज्यूलिअन्, गिरीश आणि यशवंत यांचीं नांवें प्रमुख आहेत. या तिघांहि कवींनीं मराठी काव्यवाङ्मयांत अभिनंदनीय अशी भर घातली आहे. **माधव ज्यूलिअन्** यांचें सबंध नांव माधव त्रिंबक पटवर्धन. त्यांचें शिक्षण बडोद्यास झालें. १९१८ ते १९२३ पर्यंत ते फर्ग्युसन कॉलेजांत फार्सी भाषेचे अध्यापक होते. सध्यां ते कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजांत फार्सी व इंग्लीश या भाषांचे अध्यापक आहेत. वाङ्मयाचा त्यांचा व्यासंग दांडगा आहे. विद्वत्त्व आणि कवित्त्व दोन्हीहि त्यांच्या ठिकाणीं वसत आहे. ' फार्सी–मराठी कोश, ' ' छंदोरचना ' अशीं विद्वत्ताप्रचुर पुस्तकें त्यांच्या व्यासंगाची साक्ष देत आहेत. ' विरहतरंग ', ' सुधारक ', ' द्राक्षकन्या ' हीं त्यांचीं खण्डकाव्यें आहेत. त्यांची स्फुट कविता ' गज्जलाञ्जलि ' व ' स्वप्नरंजन ' या पुस्तकांत संकलित केली आहे. भाषा-शुद्धीचा त्यांचा पुरस्कार अभिनंदनीय आहे. त्यांच्या काव्यांत जिवंतपणा आहे. कल्पना आणि विचार या दोन्हींचें नाविन्य प्रामुख्यानें आढळतें.

**प्रो. मायदेव** यांनीं विविध विषयावर काव्य लिहिलें असलें तरी त्यांचे वैशिष्ट्य त्यांच्या शिशुगीतांत दिसून येतें. ना. वा. टिळक यानीं मुलांवर कविता लिहिल्या परंतु बालस्वभाव द्योतक असें काव्य मायदेवानीं लिहिले आहे आणि मुलांचे कवि असें सार्थ नांव त्यांनाच देतां येईल.

**शंकर केशव कानेटकर** हे आपली कविता **गिरीश** या टोपण नांवानें प्रसिद्ध करतात. ' अभागी कमल ', ' कला ', ' आम्बराई ' हीं खण्डकाव्यें त्यांनीं लिहिलीं आहेत आणि त्यांची स्फुट कविता ' काञ्चनगङ्गा ' व ' फलभार ' यांत प्रसिद्ध झालेली आहे. गिरीशांना कुणबाऊ भाषा चांगली साधते. त्यांचा सामान्यतः कल सामाजिक विषयांकडे असून स्त्रियांचीं गाऱ्हाणीं त्यांनीं आपल्या काव्यांतून जनतेपुढें मांडलीं आहेत. अपरिचित किंवा कर्णकटु शब्दप्रयोग त्यांच्या काव्यांत सहसा आढळत नाहींत. नवीन चाली व वृत्ते लोकप्रिय करण्याचें श्रेय गिरीशांना दिलें पाहिजे. त्यांनीं गेयानुकूल भावगीतें पुष्कळच लिहिलीं आहेत.

**यशवंत दिनकर पेंढारकर** उर्फ **यशवंत** यांनीं 'बंदीशाळा' हें दीर्घ काव्य आणि पुष्कळशी स्फुट कविता लिहिली आहे. त्यांचीं 'यशोधन' व 'यशोगन्ध'

हीं पुस्तकें प्रसिद्ध आहेत. त्यांची भाषा जोरदार असते. समाजांत दलितवर्गावर होणारा अन्याय पाहून त्यांना मनस्वी त्वेष चढतो आणि जगावर कठोर निंदाप्रहार करण्यास ते मागेंपुढें पाहात नाहींत. त्यांची ऐतिहासिक कविता स्वाभिमानवृत्तीची द्योतक आहे. रविकिरणमंडळाचे सदस्य श्री. **विठ्ठलराव घाटे** यांनीं थोडीच परंतु भावपूर्ण कविता लिहिली आहे. अंतःकरणपूर्वकता हा तिचा विशेष आहे.

**प्र. के. अत्रे** यांनीं विडंबन काव्याचा नवीन प्रकार सुरू केला. **य. न. केळकर** आणि **निशिगंध** यांनीं काव्य थोडेंच लिहिलें असलें तरी त्यांचा दर्जा निसंशय श्रेष्ठ आहे. **ठोकळ** यांचीं जानपदगीतें जिव्हाळ्यामुळें सरस वठलीं आहेत. **आ. रा. देशपांडे** उर्फ अनिल यांच्या कवितेंतून गूढगुंजनाची नवीन प्रथा येत आहे. **कारे** यांनीं गोमंतकीय वातावरणाचीं शब्दचित्रें चांगलीं रेखलीं आहेत. '**बी**' यांच्या कवितेंत प्रेमळपणा, नादमाधुर्य आणि भाषासौंदर्य या गुणांचा उत्कर्ष आढळतो. **सावरकरांच्या** काव्यांत उत्कट भावना आणि नाविन्य आहे. याखेरीज कितीतरी कवि आणि कवियित्री आज महाराष्ट्र-सरस्वतीची काव्यपूजा बांधीत आहेत.

कुमुदबांधव या टोपण नावानें कविता लिहिणारे शुक्ल यांचे 'कुमुदबांधव' व 'सुनीतिका' असे दोन काव्यसंग्रह प्रसिद्ध झाले आहेत. उत्कट भावना, तरल कल्पनाविलास, नादमधुर पण सुबोध अशी भाषाशैली, रचनेचें वैचित्र्य आणि विचारांचें नाविन्य इत्यादि गुण कुमुदबांधवांच्या काव्यांत प्रामुख्यानें दिसून येतात.

## कादंबरी

गद्यलेखनाचा पाया जसा विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं घातला, तसा स्वतंत्र, सामाजिक व ऐतिहासिक कादंबरीलेखनाचा पाया घालण्याचा मान **हरि नारायण आपटे** यांचा आहे. हरिभाऊंच्या पूर्वी झालेल्या मंजुघोषा, मुक्तामाला इत्यादि अद्भुत कादंबऱ्यांचें स्वरूप पूर्वी सांगितलेंच आहे. अद्भुत कादंबऱ्यांतील स्वप्नसृष्टि अशिक्षित मनाचें समाधान करण्यास समर्थ असली तरी सुसंस्कृत वाचकांची तहान त्या तऱ्हेच्या कादंबऱ्यांनीं भागणें शक्य नव्हतें. पूर्णपणें स्वतंत्र आणि उच्च प्रतीच्या कादंबऱ्या प्रसिद्ध होण्यापूर्वीच्या संधिकालांत 'लालन

बैरागीण,' 'ठगाची जबानी,' 'नूरजहान,' 'अनाथ पांडुरंग' अशासारख्या कादंबऱ्या कांहींशा ऐतिहासिक असल्या तरी अद्भुताच्या वातावरणांतच विकास पावलेल्या दिसतात. अद्भुत कादंबऱ्यांतील असंभाव्य प्रसंग आणि कथानकाचा ठराविक सांचा याहि कादंबऱ्यांत दिसून येतो. याच वेळीं कित्येक इंग्रजी कादंबऱ्यांचीं बरींवाईट रूपांतरें वाचकांना सादर करण्यांत आलीं. नांव घेण्याजोग्या स्वतंत्र अशा कादंबऱ्या थोड्याफार लिहिण्यांत आल्या नाहींत असें नाहीं; आणि पुढील उज्ज्वल युगाचीं हीं पूर्वचिन्हें समजण्यास हरकत नाहीं. रहाळकर यांची 'नारायणराव व गोदावरी' ही सामाजिक कादंबरी स्वतंत्र असून त्यांतील घरगुती कथानक मनोवेधक आहे. **धनुर्धारी** यांनीं गोल्डस्मिथच्या Vicar of Wakefield चें भाषान्तर करण्यास घेतलें, परंतु त्यांची 'वाईकर भटजी' ही एक स्वतंत्रच कादंबरी गणण्यास हरकत नाहीं. सुरवातीचे साम्य जाऊन कादंबरीचें कथानक स्वतंत्र दिशेनें वाहूं लागलें. धनुर्धारी यांची भाषा ओघवती असल्यामुळें ही कादंबरी मूळाइतकीच सरस उतरली आहे. **काशीबाई कानिटकर** या मराठींतील पहिल्या स्त्रीकादंबरीकार म्हणतां येतील. त्यांची 'रंगराव' ही कादंबरी अस्खलित भाषा, वर्णनशैली आणि वास्तविकता या गुणामुळें वाचनीय झाली आहे.

हीं सर्व पुढील युगाचीं प्रसादचिन्हें होतीं. स्वतंत्र कादंबरीलेखनाचें युग **हरिभाऊ आपटे** यांनीं सुरू केलें. त्यांची अगदीं पहिली कादंबरी 'मधली स्थिति' ही रूपांतरित आहे. निदान तिचा पहिला काहीं भाग तरी तसा आहे आणि धनुर्धारीच्या 'वाईकर भटजी' या कादंबरीप्रमाणें ते पुढे जसजसे लिहीत गेले तसतसा मूळाचा आश्रय सुटला आणि कथानकाला स्वतंत्र वळण लागले. हरिभाऊंची पहिली स्वतंत्र कादंबरी 'पण लक्षांत कोण घेतो ?' ही १८८९ सालीं प्रसिद्ध होऊं लागली. हरिभाऊंनीं दहा सामाजिक व अकरा ऐतिहासिक कादंबऱ्या लिहिल्या आहेत. त्यांच्या इतक्या विपुल आणि श्रेष्ठ दर्जाच्या कादंबऱ्या लिहिणारा लेखक अद्यापपावेतों दुसरा कोणी झाला नाहीं. त्यांच्या या पहिल्या स्वतंत्र कादंबरीनें वाचकांवर मोहनी टाकली आणि लेखकास कीर्तिलाभ करून दिला. यानंतर त्यांनीं 'गणपतराव, यशवंतराव खरे, मी, जग हें असें आहे, भयंकर दिव्य, मायेचा बाजार, आजच, कर्मयोग' या सामाजिक कादंबऱ्या लिहिल्या. त्यांच्या ऐतिहासिक कादंबऱ्यांपैकीं 'उषःकाल, केवळ स्वराज्यासाठीं,

गड आला पण सिंह गेला, सूर्योदय, मध्यान्ह, सूर्यग्रहण, या कादंबऱ्या मराठ्यांच्या इतिहाससंबंधीं विशेषतः शिवकालासंबंधीं आहेत. चंद्रगुप्त व म्हैसूरचा वाघ यांचा काल नांवावरूनच स्पष्ट होतो. विजयनगरच्या साम्राज्याचा नाश हा 'वज्राघात' कादंबरीचा विषय आहे. 'रूपनगरची राजकन्या' औरंगजेबकालीन तर 'कालकूटां'त पृथ्वीराजजयचंदाचें कथानक घेतलें आहे. या कादंबरीवाङ्मयाखेरीज त्यांनीं आपल्या 'करमणूक' पत्रांत कितीतरी गोष्टी व अवांतर लेख लिहिले आहेत.

हरिभाऊंच्या सामाजिक कादंबऱ्यांत तत्कालीन सामाजिक प्रश्नांची चर्चा कथानकाच्या ओघानें आली आहे. ध्येयदर्शित्व हा त्यांच्या कादंबऱ्यांचा विशेष आहे. आगरकरांनीं आपल्या निबंधांतून, कोल्हटकरांनीं आपल्या विनोदी लेखनांतून ज्या सामाजिक व्यंगांचें आविष्करण केलें आणि ज्या सुधारणांचा पुरस्कार केला, त्यांचेंच उद्घाटन त्यांनीं कादंबरींतील कथानकांच्या द्वारां केलें आहे. स्त्रीशिक्षण, केशवपन, पुनर्विवाह, सापत्नभाव, अविभक्त कुटुंबपद्धति इत्यादि सामाजिक प्रश्नांचा ऊहापोह त्यांच्या कादंबऱ्यांत आला आहे. देशाच्या उद्धाराकडे तरुणपिढीचें लक्ष त्यावेळीं लागलें होतें आणि ते मार्ग कसे सांपडतील याचा शोध चालू होता. त्या मार्गांचें दिग्दर्शन स्वतःच्या मताप्रमाणें त्यांनीं 'यशवंतराव खरे, मी, व कर्मयोग' या कादंबऱ्यांतून केलें आहे. त्यांचा सामाजिक कादंबऱ्यांचा दुसरा गुण म्हटला म्हणजे वस्तुस्थितिनिदर्शकता. त्याचीं कथानकें व त्यांतील पात्रें परिचयाचीं वाटतात. समाजाच्या आजूबाजूला पाहिलें कीं तीं भेटतात असें तत्कालीन वाचकांस वाटत होतें. बहुतेक पात्रें मध्यमवर्गांतील आहेत; त्यामुळें वाचकांस त्यांसंबंधीं जिव्हाळा वाटतो. तथापि त्यांच्या कादंबऱ्यांना चिरंतन वाङ्मयांत स्थान मिळण्याचें कारण त्यांची मानवी भावनांचें सूक्ष्म पृथक्करण करण्याची हातोटी. त्यांच्या कादंबऱ्या आजहि वाचावयास आवडतात याचें कारण शाश्वत अशा मानवी स्वभावाचे त्यांनीं कलापूर्ण जें चित्रण केलें आहे तेंच होय. त्यांच्या कादंबऱ्या हप्त्याहप्त्यानें प्रकाशित होत गेल्यामुळें प्रमाणहीनतेचा दोष मुख्यतः डोळ्यांत भरतो. पात्रें किंवा प्रसंग यांची पुनरुक्ति झालेली आढळते. कधीं कधीं वर्णनाच्या ओघांत ते वाहूं लागले म्हणजे कथानकाचा धागा तुटतो. उपकथानकें ज्यास्त येतात आणि शेवटीं त्यांचा धागा मुख्य कथानकाशीं

जोडतांना घाई होते. परंतु हे रचनादोष अपरिहार्य होते आणि त्यामुळें मूळ सौंदर्याला फारसा बाध येत नाहीं.

हरिभाऊंच्या नंतर कादंबरीवाङ्मय चांगलेंच फोफावलें. इंग्लीश व बंगाली कादंबऱ्यांचीं रूपांतरें किंवा भाषांतरेंहि बरींच झालीं आहेत. बंगाली कादंबऱ्यांची रचनापद्धति आणि ललित व मधुर भाषाशैली **वि. सी. गुर्जर** यांनीं मराठींत आणली. त्यांच्या 'जीवनसंध्या', 'संसार असार', 'देवता', 'शशांक' इत्यादि कादंबऱ्या विशेष लोकप्रिय झाल्या आहेत. स्वतंत्र कादंबरीलेखन त्यांनीं केलें नसल्यामुळें त्यांचें नांव मागें पडलें आहे. परंतु कादंबरी व लघुकथा-वाङ्मय समृद्ध करणारांमध्यें त्यांचे प्रयत्न विशेष उल्लेखनीय ठरतील यांत शंका नाहीं.

**श्री. द्वारकानाथ माधव पितळे** ऊर्फ **नाथमाधव** यांनीं सुमारे २५ तरी कादंबऱ्या लिहिल्या आहेत. मराठी राज्याचा इतिहास कादंबरीस्वरूपांत मांडण्याकरितां 'स्वराज्याचा श्रीगणेशा' इत्यादि कादंबऱ्या त्यानीं लिहिल्या. या कादंबऱ्या चटकदार असल्या तरी ऐतिहासिक सत्याच्या कसोटीला कितपत उतरतील हा प्रश्नच आहे. 'विहंगवृंद', 'दैवाचे खेळ', 'विमलेची ग्रहदशा' इत्यादि अनेक सामाजिक कादंबऱ्या त्यांनीं लिहिल्या असून तत्कालीन सामाजिक प्रश्नांभोंवतीं कथानकाची जुळणी केली आहे. 'सांवळ्या तांडेल' ही दर्यावर्दी जीवनविषयक मराठींतील पहिलीच कादंबरी आहे. 'रायक्लब अथवा सोनेरी टोळी' ही अगदीं नवीन धर्तीची कादंबरी एकेकाळीं बरीच लोकप्रिय झाली होती. नाथमाधव यांच्या कादंबरीलेखनाचा मुख्यतः हेतु मनोरंजन हा होता. भाषेवरील प्रभुत्व बेताचेंच, तथापि त्यांचें शिक्षण व परिस्थिति लक्षांत घेतां त्यांनीं निर्माण केलेलें कथात्मक वाङ्मय पाहून अचंबा वाटतो.

**नारायण हरि आपटे** यांनींहि पंचवीस–तीस कादंबऱ्या लिहिल्या आहेत. 'कर्मगति', 'भुरळ', 'लांच्छित चंद्रमा', 'पहाटेपूर्वीचा काळोख' इत्यादि कादंबऱ्या मराठी वाचकांच्या परिचयाच्या आहेत. ना. ह. आपटे यांच्या एकंदर लेखनावर हरिभाऊंची बरीच छाया पडलेली दिसते. सुधारणेचा मध्यबिंदु रंगविण्याकडे त्यांचा कल असतो. कथानकें फारशीं गुंतागुंतीचीं नसतात. रचना सुबोध, भाषा प्रवाही आणि एकंदर लेखन उपदेशप्रधान असे त्यांच्या लेखनाचे विशेष सांगतां येतील.

**वा. गो. आपटे, कृ. के. गोखले,** व **सहकारी कृष्ण** हे कादंबरीकार याच युगांतले होत. वा. गो. आपटे यांनीं हेन्री वुडच्या कादंबऱ्या मराठी वेषांत वाचकांपुढे आणल्या. बंकिमचंद्र चतर्जी या प्रख्यात बंगाली कादंबरीकाराच्या सर्व कादंबऱ्यांचीं त्यांनीं केलेलीं भाषांतरें भारत-गौरव-ग्रंथमालेनें प्रसिद्ध केलीं आहेत. कृ. के. गोखले यांनीं Pride and Prejudice या कादंबरीच्या आधारें ' आजपासून पन्नास वर्षांनीं ' ही कादंबरी लिहिली. त्यांनीं इंग्रजी कादंबऱ्यांचीं आणखीहि दोनतीन रूपांतरें केलीं आहेत. कृष्णाजी अनंत एकबोटे उर्फ सहकारी कृष्ण यानीं कुटुंब-शिक्षणमालेमध्ये बऱ्याच लघु कादंबऱ्या लिहिल्या आहेत. त्यांचे बहुतेक विषय सामाजिक विशेषतः कौटुंबिक आहेत. ' शापित महाराष्ट्र ' ही संभाजीकालीन ऐतिहासिक कादंबरी हीच त्यांची महत्त्वाची व नांव घेण्यासारखी कृति होय आणि याच कादंबरीमुळें त्यांचें नांव मराठी वाङ्मयांत राहील.

वाङ्मयाच्या इतर शाखांमध्यें कार्य करून प्रसिद्धीस आलेल्या मराठींतील कांहीं लेखकांनीं हौसेचा मामला म्हणून आपला मोर्चा कादंबरीलेखनाकडे वळविलेला दिसतो. भारताचार्य **चिं. वि. वैद्य** यांनीं पानिपतच्या प्रसंगावर लिहिलेली ' दुर्दैवी रंगू ' ही ऐतिहासिक कादंबरी अप्रतीम आहे. पात्रें काल्पनिक असलीं तरी कथानक व प्रसंग यांची उभारणी करतांना ऐतिहासिक सत्याचा ज्यास्तींत जास्त आधार घेतलेला आहे. बारीकसारीक वर्णनांत देखील ही ऐतिहासिक दृष्टि आणली आहे. हरिभाऊ आपटे यांच्यापेक्षां निराळी अशी ऐतिहासिक कादंबरी लिहिण्याची ही पद्धत निःसंशय अनुकरणीय आहे. **शि. म. परांजपे** यांनीं ' गोविंदाची गोष्ट ' व ' विंध्याचल ' या दोन कादंबऱ्या लिहिल्या आहेत. भाषा उत्तम आहे; कांहीं प्रकरणें तर सरस आहेत; परंतु कथानकाचा एकंदर ठसा वाचकाच्या मनावर बरोबर उमटत नाहीं. सुंदर सुंदर दालनें असलेल्या पण विस्कळित रीतीनें बांधलेल्या वाड्याप्रमाणें हीं कथानकें भासतात **सी. के. दामले** यांनीं ' जग हें त्रिविध आहे ' व 'न्याय कीं अन्याय' ह्या दोन कादंबऱ्या लिहिल्या आहेत. **श्री. कृ. कोल्हटकर** यांची ' दुहेरी कीं दुटप्पी ' ही कादंबरी लहान पण रहस्यमय व मनोवेधक आहे. काव्यमय भाषेमुळें तिच्या चित्ताकर्षकेंत भर पडली आहे. त्यांची 'श्यामसुंदर' ही कादंबरी अस्पृश्योद्धार या प्रचलित विषयावर लिहिलेली आहे. प्रो. **गो. चि. भाटे** यांची ' प्रेम कीं लौकिक ' ही कादंबरी

आत्मचरित्रपर आहे. आत्मचरित्र आणि काल्पनिक प्रसंग यांचें कुशल मिश्रण या कादंबरींत सांपडतें. ‘माझें रामायण’ या कादंबरींत महाराष्ट्राचा गेल्या पन्नास वर्षांचा इतिहास गोवण्याचा **तुळजापूरकर** यांनीं प्रयत्न केला आहे. संस्थानी राजकारणासंबंधीं मराठींतील एकमेव कादंबरी लिहून **न. चिं. केळकर** यांनीं आदर्श संस्थानिकाचें चित्र आपुलकीच्या भावनेनें रेखाटले आहे.

आपटे यांनीं कादंबरी लेखनाची दिशा दाखवून दिल्यानंतर कादंबऱ्या प्रकाशित करणाऱ्या बऱ्याच माला अस्तित्वांत आल्या. मनोरंजक-ग्रंथप्रसारक-मंडळी इतर पुस्तकांबरोबर कादंबऱ्याहि प्रसिद्ध करीत होती. भारत-गौरव-ग्रंथमालेंत प्रसिद्ध झालेल्या कादंबऱ्या बऱ्याच वरच्या दर्जाच्या आहेत. ‘सरस’ व ‘सुरस’ ग्रंथमालांमध्यें प्रसिद्ध झालेल्या कादंबऱ्यांमध्यें उत्कृष्ट कादंबऱ्यांचें प्रमाण एकंदर निर्मितीच्या मानानें अल्प आहे. श्री. शहा यांच्या ‘राजा छत्रसाल’ व ‘सम्राट् अशोक’ या ऐतिहासिक कादंबऱ्या मात्र रचनाचातुर्य, भाषाशैली व कल्पनाविलास या दृष्टीनें पहिल्या प्रतीच्या आहेत.

वर निर्दिष्ट केलेल्या कादंबऱ्यांपैकीं कांहीं कादंबऱ्या जरी अगदीं अलीकडे प्रसिद्ध झालेल्या असल्या तरी त्या आपटे याचीच परंपरा पुढें चालवीत आहेत. विषय, रचना व भाषापद्धति या दृष्टीनें त्यांचा समावेश त्या युगांत करणेंच इष्ट होईल.

कादंबरीलेखनांतील अगदीं अलीकडल्या युगाला सुरवात **प्रो. वा. म. जोशी** यांच्या ‘रागिणी’नें केली. ‘रागिणी, नलिनी, आश्रमहारिणी, सुशिलेचा देव’ आणि ‘इंदु काळे व सरला भोळे,’ अशा या प्रो. जोशी यांच्या पांच मानसकन्या आहेत. प्रो. जोशी यांची दृष्टि तत्त्वशोधनाकडे अधिक आहे. कादंबरींतील पात्रांचें स्वभावदिग्दर्शन अधिक सूक्ष्म व मूलग्राही आहे. रागिणी व उत्तरा हीं पात्रें परस्परांचीं पूरक अशीं आहेत. रागिणी भावनाप्रधान तर उत्तरा विचारप्रधान, रागिणी विनयशील तर उत्तरेच्या ठिकाणीं शिक्षणसुलभ धाष्टर्य व बेडर वृत्ति आलेली, रागिणीचा कल आयुष्यांत तडजोड करण्याकडे तर उत्तरा एक घाव दोन तुकडे करणारी—अशी ही जोडी मराठी वाङ्मयांत अजरामर झाली आहे. रागिणी कादंबरींतील सर्वच पात्रें तत्त्वजिज्ञासु, वेळीं अवेळीं तात्त्विक चर्चा करतांना दिसतात व या कादंबरीचें काव्यशास्त्रविनोद हें दुसरें

नांव अन्वर्थक करतात. आश्रमहरिणी ही लहानशी कादंबरी रचनावैशिष्ट्याच्या दृष्टीनें अपूर्व आहे. यांतील वातावरण पौराणिक कालांतील आहे तर विषय पुनर्विवाह किंवा द्विपतिकत्व यासारखा अर्वाचीन आहे. परंतु हा सांधा लेखकानें इतका बेमालुम साधला आहे कीं कथानक वाचीत असतांना वाचकाला अस्वाभाविकतेचा वासहि येत नाहीं. नलिनी या कादंबरीमध्यें अराजकांचें राजकारण हा विषय घेतला आहे. परंतु ही कादंबरी पूर्वोक्त कादंबऱ्यांइतकी सरस उतरलेली नाहीं. 'सुशिलेचा देव' या कादंबरींत सुशिला या नायिकेच्या देवाविषयीं कल्पना कशा उत्क्रांत पावत जातात हें लेखकानें दाखविलें आहे. अखेरीस ती ध्येय हाच देव या प्रो. जोशी यांच्या आवडत्या तत्त्वज्ञानाचा पुरस्कार करते. परंतु ध्येयाचा मार्ग हा काट्याकुट्यानीं भरलेला असतो. ध्येयनिष्ठ मनुष्यास दैव नेहमींच हात देतें असें नाहीं. ही वस्तुस्थिति 'इंदु काळे व सरला भोळे' या कादंबरींत त्यांनीं दाखविली आहे. ध्येयनिष्ठ मनुष्य व्यावहारिक जगांत सुखी ठरतोच असें नाहीं. वामनरावांची दृष्टि भविष्यकालाकडे आहे. वर्तमानाचें आवरण फोडून ते सार्वकालिक दृष्टीनें कोणत्याही प्रश्नाकडे पाहतात. सत्य हें एकजिनसी बहुमुखी आहे असें त्यांचें ठाम मत असल्यामुळें त्यांच्या प्रतिपादनांत निश्चितता कमी आढळते.

**प्रो. फडके** हे कलेकरितां कला या मताचे पुरस्कर्ते असल्यामुळें त्यांच्या कादंबऱ्यांत कलाविलास अधिक दृष्टीस पडावा यांत आश्चर्य नाहीं. त्यांची 'अल्ला हो अकबर' ही अगदीं पहिली कादंबरी रूपांतरित आहे. त्यानंतर त्यांनीं 'कुलाब्याची दांडी', 'जादूगार', 'दौलत', 'अटकेपार', 'निरंजन', 'कलंक शोभा', 'उद्धार', 'समरभूमि', 'काश्मिरी गुलाब', 'प्रवासी' अशा कादंबऱ्या लिहिल्या असून त्यांचे कादंबरीलेखन अद्याप चालू आहे. प्रो. फडके हे चालू तरुण पिढीचे आवडते कादंबरीकार आहेत. मध्यम वर्गांतीलच परंतु त्यांतल्यात्यांत सुखवस्तु व सुधारलेल्या कुटुंबांतील जीवनाचें चित्र त्यांच्या कादंबऱ्यांतून रंगविलें आहे. तरुण हृदयाच्या प्रेमविषयक भावना आणि जीवनांतील आकांक्षा यांच्याशीं ते समरस होतात. त्यांच्या वर्णनांत बारकावा असतो त्यावरून त्यांची अवलोकनशक्ति दिसून येते. रसिक सौंदर्यदृष्टि आणि कलाप्रेम जागजागीं प्रतीत होतें. रचना प्रमाणबद्ध असते परंतु कथानकामध्यें वैचित्र्य नसतें. त्यांचे नायक व नायिका एकाच

तऱ्हेच्या वाटतात. भोंवतालच्या परिस्थितीमुळें त्यांमध्यें जेवढी अपरिहार्य भिन्नता दिसेल तेवढीच काय ती ! त्यांच्याइतकी सफाईदार भाषा फारच थोड्यांना साधते. कथानकांतील विलासी वातावरणाप्रमाणें त्यांची भाषाहि उन्मादक आहे.

महाराष्ट्रीय ज्ञानकोशासारखा प्रचंड उद्योग करणारे विद्वान् पंडित **डॉ. श्री. व्यं. केतकर** यांनीं 'गोंडवनांतील प्रियंवदा', 'परागंदा', 'आशावादी', 'गांवसासू' आणि 'ब्राह्मण कन्या' अशा पांच कादंबऱ्या लिहिल्या आहेत. डॉ. केतकर यांनीं समाजशास्त्राचा खोल अभ्यास केला आहे. बहुविधविषयांचें वाचन आणि जगभर प्रवास यामुळें त्यांची दृष्टि विशाल झाली आहे. त्यांच्या बहुतेक कादंबऱ्यांतील कथानकांना वस्तुस्थितीचा आधार आहे आणि कित्येक वेळां वास्तविक जग आणि काल्पनिक वातावरण यामधील पडदा त्यांनीं इतका झिरझिरीत ठेवला आहे कीं लेखकाला कोणत्या समकालीन व्यक्ति अभिप्रेत आहेत हें वाचकाला तेव्हांच कळतें. त्यांच्या कादंबऱ्यांत नाविन्य मात्र आहे. भाषा सुंदर लिहिण्याकडे त्यांचा फारसा कल नाहीं. कथानकाला बांधेसूदपणा देण्याकडे लक्ष कमी. स्वभावाचें चित्रण हलुवार हातानें केलेलें सहसा आढळावयाचें नाहीं. परंतु रूढ विचार व भावना यांना अजीबात फांटा दिल्यामुळें खुलें व स्वतंत्र वातावरण त्यांच्या कादंबऱ्यांतून आढळतें. निर्भीडपणानें व कांहींएक आड पडदा न ठेवतां भावना चित्रित केलेल्या असल्यामुळें त्यांच्या कादंबऱ्यांत वास्तविकता अधिक आढळते. विचारांचें वाहन म्हणून ते भाषेकडे पहातात. विचार व्यक्त होण्यास अडचण पडूं लागली तर वाटेल तसे नवीन शब्द बनविण्यास ते कचरत नाहींत. त्यांच्या कादंबऱ्यांत कलाविलास नसला तरी या स्वतंत्र व खुल्या वातावरणामुळें आणि विचारनाविन्यामुळें त्या वाचनीय झाल्या आहेत.

**भा. वि. वरेरकर** हे नाटककार म्हणून विशेष प्रसिद्ध आहेत आणि त्यांच्या प्रतिभेला तोच वाङ्मयप्रकार विशेष मानवतो असें त्यांच्या कादंबऱ्यांवरून वाटतें. त्यांची भाषाशैली ओघवती आहे, आणि त्यांच्या पहिल्या कांहीं कादंबऱ्या हरिभाऊंची आठवण करून देतात. 'चिमणी,' 'विधवा कुमारी,' 'धांवता धोटा,' 'गोदू गोखले,' 'परतभेट,' 'कुलदैवत' अशा सहा कादंबऱ्या त्यांनीं लिहिल्या आहेत. वरेरकर हे नवमतवादाचा पुरस्कार करणारे कादंबरीकार आहेत. स्त्रियांचे समान हक्क व आर्थिक स्वातंत्र्य, गिरणी कामगार व मजूर

आणि त्यांच्या चळवळी, वेश्या व त्यांचें जीवन अशा विषयांचा ऊहापोह त्यांच्या कादंबऱ्यांतून आला आहे. स्वीकारलेल्या मतांचा अभिनिवेश त्यांच्यामध्यें फार दिसून येतो आणि म्हणून त्यांचें लिखाण मतप्रचारी स्वरूपाचें झालें आहे. कथानकाचा स्वाभाविक विकास किंवा मनोव्यापाराच्या गुंतागुंतीचें कलापूर्ण वर्णन यांना या त्यांच्या वृत्तीमुळें बाध येतो. त्यांच्या कादंबऱ्यांत 'विधवाकुमारी' आणि 'गोदू गोखले' या विशेष वाचनीय झाल्या आहेत.

मराठींतील चतुरस्र लेखक **वि. स. खांडेकर** यांच्या आतांपर्यंत 'हृदयाची हांक', 'कांचनमृग,' 'दोन ध्रुव,' आणि 'उल्का', 'हिरवा चांफा', 'दोन मनें' अशा कादंबऱ्या प्रकाशित झाल्या असून पुढील दोन-तीन कादंबऱ्यांची जाहिरातहि आहे. 'हृदयाची हाक' व 'काचनमृग' या कादंबऱ्यांवर मराठींतील इतर प्रसिद्ध फडकली कादंबऱ्यांची दाट छाया पडली आहे. जन्माचा जोडीदार निवडतांना श्रीमंती किंवा विद्वत्ता यांकडे न पाहतां हृदयाच्या प्रेरणेलाच तरुण मुलींनीं महत्त्व दिलें पाहिजे हा त्यांच्या पहिल्या कादंबरीचा विषय आहे. खेडेगांवांची सुधारणा करण्यास निघालेल्या स्वार्थत्यागी तरुणाचें चित्र काचनमृगामध्यें पहावयास सांपडतें. परंतु या दोन्ही कादंबऱ्या पूर्वसूरींच्या पावलावर पाऊल टाकून लिहिल्या आहेत. खांडेकरांचे वैशिष्ट्य त्यांच्या पुढील दोन कादंबऱ्यांत दिसून येतें. खांडेकरांची जीवनविषयक स्वतंत्र दृष्टि येथून पुढें वाचकांच्या प्रत्ययास येते. सांप्रत दिसून येत असलेल्या सामाजिक विषमतेचा त्यांना तिट्कारा आहे. या विषमतेचे परिणाम भोगाव्या लागणाऱ्या दलितवर्गाबद्दल त्यांना सहानुभूति वाटते. समाजाची पुनर्घटना झाली पाहिजे असा त्यांचा आग्रह आहे. परंतु त्यांना विधायक मार्ग सुचत नाहीं. पुष्कळ वेळां उपमादि अलंकारांच्या ओझ्याखालीं वाकलेल्या भाषेच्या धुक्याआड त्यांचे अस्पष्ट व संदिग्ध विचार दडलेले असल्यामुळें वाचकाला त्यांचा उमज पडत नाहीं.

**श्री. वि. वा. हडप** यांच्या इतकें विपुल कादंबरीलेखन दुसऱ्या कोणत्याहि लेखकाचें नाहीं. त्यांनीं पेशवाईचा कादंबरीमय इतिहास तेरा कादंबऱ्यांत लिहिला आहे. त्यांच्या सामाजिक कादंबऱ्याहि पुष्कळ आहेत आणि त्यांचें कादंबरीलेखन अविरत चालू आहे. शीघ्रलेखन करतांना कलाविलास, कथनकौशल्य, विचार-प्राधान्य या गोष्टींकडे साहजिकच त्यांचें दुर्लक्ष झालें आहे. परंतु त्यांची भाषाशैली प्रवाही व मनोवेधक आहे.

**प्रो. नाईक** यांची नंदादीप ही कादंबरी आणि श्री. रघुवीर सामंत हे लिहीत असलेली प्रवासी ही प्रदीर्घ कादंबरी या पुस्तकांनीं कादंबरी वाङ्मयांत उत्कृष्ट भर टाकली आहे. गॅल्सवर्दीच्या धर्तीवर **रा. सामंत** हे त्रिखंडात्मक प्रवासी कादंबरी लिहीत असून त्याचा पहिला खंड 'उपकारी माणसे' हा प्रसिद्ध झाला आहे.

**पु. य. देशपांडे** यांच्या एकंदर तीन कादंबऱ्या आहेत. त्यांची 'बंधनाच्या पलीकडे' ही कादंबरी म्हणजे तरुण मनाची परंपरागत रूढिविरुद्ध बंडखोरी करण्याच्या प्रवृत्तीची द्योतक आहे. हा विषय जुनाच आहे. प्रेमविवाहाची तरफदारी यापूर्वी पुष्कळांनीं केलेलीच आहे. कादंबरीलेखनाचे प्राथमिक धडे ही कादंबरी लिहीत असतांना लेखक घेत आहे असे वाटतें. कथानकाची उभारणी सदोष झाली आहे. ठिकठिकाणीं लेखक समाजावर तुटून पडला आहे त्यामुळें स्वभावपरिपोषाकडे द्यावें तितकें लक्ष दिले नाहीं. परंतु त्यांच्या पुढील दोन कादंबऱ्या 'सुकलेलें फूल' आणि 'सदाफुली' म्हणजे कलापूर्ण व मनोविश्लेषणात्मक लेखनाचा अप्रतिम नमुना आहे. आंग्ल कादंबरीकार टॉमस हार्डी यांच्या लेखनपद्धतीचा यशस्वी अवलंब 'सुकलेलें फूल' यामध्यें केलेला आहे. मोजकीं पात्रें आणि बाह्यसृष्टिपेक्षां अंतःसृष्टींत होत असलेल्या खळबळींचें यथार्थ उद्घाटन हे विशेष या कादंबरींत दिसून येतात. सूचकता हा या कादंबरीचा विशेष गुण आहे. परंतु त्याचा अतिरेक 'सदाफुलीं'त झाला आहे. भाषेच्या दृष्टीने दोन्ही कादंबऱ्या सरस उतरलेल्या आहेत.

**ग. त्र्यं. माडखोलकर** यांची मुक्तात्मा ही कादंबरी निव्वळ राजकीय विषयाला वाहिलेली आहे. क्रान्तिकारकांचें तत्त्वज्ञान आणि इतर राजकीय पक्षांचा फोलपणा सांगण्याचा त्यांचा हेतु आहे. 'भंगलेलें देऊळ' या कादंबरींत घटस्फोटाची इष्टानिष्टता दाखविण्याचा प्रयत्न केलेला आहे. रचनेच्या दृष्टीनें पहिल्यापेक्षां दुसरी कादंबरी सरस आहे आणि तींतील स्वभावरेखनहि स्वाभाविक वाटतें.

वर उल्लेखिलेल्या कादंबरीकारांखेरीज, प्रो. अळतेकर, वा. कृ. भावे, दा. न. शिखरे, वा. वि. जोशी, ना. वि. कुळकर्णी, प्रो. बेहेरे, पुरोहित, खाडिलकर इत्यादि अनेक कादंबरीकारांनीं मराठी वाङ्मयांत भर घालण्याचें कार्य केलें आहे. स्त्रियाहि कादंबरीकार म्हणून पुढें आल्या आहेत. सौ. शांताबाई

नाशिककर, सौ. कमलाबाई बम्बेवाले, सौ. इंदिराबाई सहस्रबुद्धे, कु. पिरोज आनंदकर, कु. कुमुदिनी प्रभावळकर, सौ. इंदिराबाई आंबेगांवकर इत्यादि स्त्रियांनीं लिहिलेल्या कादंबऱ्या प्रसिद्ध आहेत. त्यांतल्यात्यांत विभावरी शिरूरकर या टोपण नांवाखालीं लिहिलेली 'हिंदोळ्यावर' ही कादंबरी फार वरच्या दर्जाची आहे. कलेप्रमाणेच तत्त्वप्रतिपादनालाहि हीमध्यें योग्य वाव मिळाला आहे.

## लघुकथा

लघुकथा हा वाङ्मयप्रकार रूढ होण्यास नियतकालिकांची आवश्यकता असते. पुण्यास हरिभाऊ आपटे यांनीं 'करमणूक' हें साप्ताहिक सुरू केलें. मुंबईस त्याच सुमारास काशिनाथ रघुनाथ मित्र हे मासिक मनोरंजन चालवीत असत. या दोन नियतकालिकांमुळें लघुकथालेखनाला जोराची चालना मिळाली. लघुकथेच्या रचनेसंबंधीं आधुनिक कलात्मक दृष्टि त्यावेळीं नव्हती. त्यावेळच्या लघुकथा म्हणजे छोट्या कादंबऱ्याच असत. तथापि तंत्राच्या कसोटीस पूर्णपणें उतरतील अशा थोड्याबहुत लघुकथा त्यावेळींहि लिहिल्या गेल्या आहेत.

कादंबरीवाङ्मयाप्रमाणें लघुकथेच्या जनकत्वाचाहि मान हरिभाऊ आपटे यांच्याकडे जातो. त्यांनीं आपल्या करमणूक पत्रांतून वेळोवेळीं लिहिलेल्या गोष्टींचे चारपांच भाग पुस्तकरूपानें प्रसिद्ध झाले आहेत. कथासूत्राचा साधेपणा, एकच प्रसंग किंवा एकमेकांशीं अतिशय निगडित झालेले थोडे प्रसंग, एकाच भावनेचा विकास, कथानकाला आवश्यक तेवढीं पात्रें, वर्णनांचा आटोपशीरपणा वगैरे उत्कृष्ट लघुकथांचीं आवश्यक अंगें म्हणून जीं सध्यां समजतात त्यांची कल्पना त्यावेळीं नव्हती. 'अपकाराची फेड उपकारांनीं,' 'काळ तर मोठा कठीण आला' या गोष्टी वरील कसोटीस उतरणार नाहींत. 'पुरी हौस फिटली,' 'पहिलें भांडण,' 'डिस्पेप्शिया' या लघुकथा अर्वाचीन कल्पनेशीं अधिक जुळत्या आहेत. एकदोन अपवाद सोडून दिल्यास हरिभाऊंच्या सर्व गोष्टी सामाजिक आहेत; आणि त्यांना आवडणाऱ्या सामाजिक सुधारणांचा पुरस्कार त्यांनीं केला आहे. समाजांतील मध्यम वर्ग किंवा गरीब परिस्थितीशीं टक्कर देत असणारा पांढरपेशा वर्ग यांचीं चित्रें सहानुभूतिपूर्वक त्यांनीं रेखाटलीं आहेत. त्यांनीं वर्णिलेले प्रसंगहि वास्तविक असतात. परंतु कथानकाची मांडणी आकर्षक करण्याकडे त्यांचें लक्ष कमी असतें.

मासिक मनोरंजनांतील कथालेखकांमध्यें वि. सी. गुर्जर आणि कृ. के. गोखले हे प्रमुख आहेत. गुर्जर यांनीं अनेक बंगाली कथांचीं उत्तमोत्तम भाषांतरें करून मराठी वाचकांना रिझविलें. सुमारें दोनशें तरी लघुकथा त्यांनीं लिहिल्या असतील. त्यांच्याइतक्या लघुकथा दुसऱ्या कोणी लिहिल्या असतील असें वाटत नाहीं. त्यांची लिहिण्याची पद्धति हरिभाऊंच्या सारखीच असल्यामुळें लघुकथांच्या तंत्राकडे त्यांचें दुर्लक्ष होतें. हरिभाऊंच्या प्रमाणेंच त्यांची भाषा सुबोध आणि मधुर असते. चटकदार संभाषणें लिहिण्यांत त्यांचा हातखंडा आहे. मनोरंजनाचे दुसरे लघुकथालेखक कृ. के. गोखले यांनीं सुमारें पाऊणशें गोष्टी लिहिल्या आहेत. कांहीं गोष्टींमध्यें सामाजिक सुधारणेवर भर दिला आहे. कांहीं गोष्टींची उभारणी रहस्यमय कथानकावर केली आहे.

शि. म. परांजपे, न. चिं. केळकर, श्री. कृ. कोल्हटकर आणि वा. म. जोशी यांनीं प्रसंगोपात्त थोड्याशा लघुकथा लिहिल्या आहेत. परांजपे यांनीं मुख्यतः आपलीं राजकीय मतें फैलावण्याच्या दृष्टीनें या गोष्टी लिहिल्या आहेत. त्यांच्या इतर गद्यलेखनाप्रमाणें या गोष्टींतूनहि कल्पनाविलास, उपरोध, उपहास, भावनोत्कटता इत्यादि गुण दिसून येतात. कथानक फारसें नसतेच. लहानशा कथासूत्राचा विस्तार त्यांनीं केलेला आढळतो. न. चिं. केळकर यांची 'माझी आगगाडी कशी चुकली' ही विनोदी लघुकथा छान आहे. 'कपड्यांची अदलाबदल' यामध्यें प्रसंगनिष्ठ विनोद चांगला साधला आहे. 'सामाजिक चालीरीतींची बदल', 'शृगालसंमेलन' या कथांची उभारणी कल्पनाविलासावर आहे. श्री. कृ. कोल्हटकर यांच्या 'गाणारें यंत्र,' 'संपादिका,' 'गरीब बिचारें पाडस,' अशा गोष्टी आहेत. त्यांतील शेवटली गोष्ट कल्पना व करुणरस या दृष्टीनें चांगली आहे. वा. म. जोशी यांना लघुकथांच्या लेखनांत फारसें यश लाभलेलें दिसत नाहीं. त्यांच्या गोष्टींमध्यें 'नांव बदलीन,' 'चारित्र्यक्रान्ति' या गोष्टी बऱ्या आहेत.

श्री. वाग्भट नारायण देशपांडे, ना. ह. आपटे, सरस्वतीकुमार, आधुनिक एकलव्य यांच्या लघुकथांचे संग्रह प्रसिद्ध झालेले आहेत. हे चारहि लघुकथालेखक हरिभाऊंच्या परंपरेंतील आहेत. श्री. वाग्भट यांच्या कथा स्त्रीजीवनावर अधिष्ठित झालेल्या असतात, आणि बहुतेक कथांतून स्त्रियांनीं पुरुषांबरोबर बौद्धिक सहकार्य करण्यास तयार झालें पाहिजे ही मध्यवर्ती कल्पना आहे.

'दयेचा न्याय' ही गोष्ट भिन्न प्रकारची आहे. कर्जामुळें सावकाराच्या कचाटींत सांपडलेल्या एका गरीब कुटुंबाच्या दुर्दशेचें चित्र येथें पाहावयास सांपडतें. ना. ह. आपटे यांच्या लघुकथेंत कादंबऱ्यांप्रमाणेंच बोधपरता येते. तथापि अलीकडील कांहीं गोष्टींत त्यांनीं रचनेचें नाविन्य आणण्याचा प्रयत्न केला. सरस्वतीकुमार यांच्या गोष्टी लांबलचक, कथानकें संमिश्र आणि भाषा गडकरी थाटाची असते. त्यांच्या गोष्टीचे विषय मात्र जुनेच आहेत.

या काळच्या स्त्रीलेखिकांत श्री. काशीबाई कानिटकर आणि सौ. गिरजाबाई केळकर या प्रमुख आहेत. कानिटकर यांचें 'चांदण्यांतील गप्पा' व 'शिळोप्यांतील गप्पा' असे दोन लघुकथासंग्रह प्रसिद्ध आहेत. केळकर यांनीं 'समाजचित्रें' आणि 'केवळ विश्रांतिसाठीं' या दोन पुस्तकांत आपल्या लघुकथा संकलित केल्या आहेत. दोघींच्या लेखनावर हरिभाऊंच्या लेखनपद्धतीचा स्पष्ट छाप दिसून येतो. आधुनिक दृष्टीला त्याच्या लघुकथा मनोरंजक वाटणार नाहींत.

१९२० च्या पुढें लघुकथांसंबंधीं आधुनिक दृष्टि येऊं लागली. पाश्चात्य वाङ्मयाचा वाढता परिचय हेंहि याचें कारण असूं शकेल. नियतकालिकांची वाढ झाल्यामुळें लघुकथांची निपजहि फार मोठ्या प्रमाणांत होऊं लागली आहे. रचना आणि विषय यांचें वैचित्र्य दिसून येत आहे. सर्व बाजूंनीं या वाङ्मयप्रकाराचे वैभव वाढत आहे असें दिसून येईल; आणि लघुकथा लिहिणारांची संख्या भूमितिश्रेणीनें चढत आहे.

या नवीन युगास खांडेकर-युग असें नांव देण्यास हरकत नाहीं. अल्पकाळांत खांडेकर यांनीं केलेली वाङ्मयाची सेवा आश्चर्योत्पादक आहे. परंतु त्यांच्या इतर लेखनाच्या मानानें त्यांचें लघुकथालेखन अधिक चिरस्थायी स्वरूपाचें आहे. संख्या व गुण या दोन्ही दृष्टींनीं त्यांचें लेखन इतर कोणत्याहि लेखकाच्या मानानें श्रेष्ठ दर्जाचें ठरतें. 'नवमल्लिका', 'दत्तक व इतर गोष्टी', 'ऊन पाऊस', 'जीवनकला' इत्यादि लघुकथांचे संग्रह त्यांनीं प्रसिद्ध केले आहेत. उपमा, कोट्या, श्लेष, उत्प्रेक्षा इत्यादि अलंकारांची सढळ हातानें खैरात करून त्यांनीं आपल्या भाषासुंदरीला नटविली आहे. कलापूर्ण लेखनाकडे त्यांचें विशेष लक्ष आहे. लघुकथांचा आरंभ आणि शेवट, रचना, नामाभिधान इत्यादि अंगो-

पांगांकडेसुद्धां त्यांनीं लक्ष पुरविलें आहे. नाविन्यपूर्ण रचना हा त्यांचा विशेष आहे; आणि या गुणामुळेंच अलीकडील लघुकथालेखकांत ते शिरोभागीं झळकतात.

प्रो. फडके यांच्या आरंभींच्या लघुकथा जुन्या वळणाच्या असल्या तरी अलीकडील लघुकथांमध्यें त्यांनीं पूर्वीची पद्धति सोडून देऊन नवीन स्वीकारिली आहे. निरनिराळ्या रचनापद्धतींचा अवलंब त्यांनीं केला आहे. लालित्यपूर्ण भाषेमुळें त्यांच्या लघुकथा लोकप्रिय झाल्या आहेत. 'पुनर्भेट'कर्ते श्री. य. गो. जोशी यांच्या कथांमध्यें सुखवस्तु, मध्यम वर्गाच्या खालचा पण मोलमजुरी करून उपजीविका करणाऱ्या वर्गापेक्षां वरच्या दर्जाच्या पांढरपेशा वर्गाचें जीवन आणि भावना प्रतिबिंबित झालेल्या असतात. त्यांच्या कथांमध्यें अलीकडील तरुण पिढीचा कधीं मृदु तर कधीं कठोर उपहास केलेला असतो. समाधि व इतर गोष्टी ' हा दिवाकर कृष्ण यांचा लघुकथासंग्रह तंत्रदृष्ट्या निर्दोष आहे. त्यांतील सर्वच कथा शोकान्त असल्यामुळें खिन्नतेचें उदास वातावरण सर्वत्र पसरलेलें दिसतें. महायुद्धाचे पडसाद कॅ. लिमये यांनीं लिहिलेल्या ' शकूचा भाऊ ' आणि ' तिच्याकरितां ' या लघुकथासंग्रहामध्यें उमटलेले आहेत. स्वतः समरभूमीवर जाऊन आल्यामुळें त्यांनीं अगदीं स्वतंत्र वातावरणाची पार्श्वभूमि आपल्या कथाकरितां निर्माण केली आहे. या कथालेखकांखेरीज कितीतरी लेखक पुढें आले आहेत. त्यापैकीं प्रो. लक्ष्मणराव सरदेसाई, बोकील, अ. तु. वाळके, कुमार रघुवीर, य. ग. नाईक, पु. ग. सहस्रबुद्धे, ना. धों. ताम्हणकर, आंबेकर, निरंतर इत्यादि प्रमुख आहेत. स्त्रीलेखिकांमध्यें सौ. क्षमाबाई राव, सौ. कमलाबाई टिळक, कृष्णाबाई, सौ. शांताबाई नाशिककर, सौ. आनंदीबाई शिर्के, विभावरी शिरूरकर, सौ. कृष्णाबाई मोटे ( खरे ), सौ. कमलाबाई बम्बेवाले इत्यादि प्रमुख आहेत व त्यांचें लघुकथालेखन अखंडित चालू आहे. मुक्ताबाई लेले याचा 'अनिरुद्धप्रवाह' हा कथासंग्रह विशेष उल्लेखनीय आहे.

## नाटकें

सांगलीचे अधिपति श्रीमंत चिंतामणराव आप्पासाहेब यांच्या प्रोत्साहनानें कर्नाटकी नाटकाच्या धर्तीवर विष्णुपंत भावे यांनीं मराठींतील पहिलीं पौराणिक नाटकें लिहिलीं. या नाटकांचें स्वरूप अगदींच प्राथमिक होतें. पौराणिक कथाभाग

घेऊन रंगभूमीवर सोंगें दाखविणें हा मुख्य उद्देश असे. संभाषणें थोडींच असत. नाटकांतील बहुतेक सर्व पदें म्हणण्याचा मक्ता सूत्रधारानें उचललेला असे. विनोद निर्माण करण्याकरितां विदूषकाची योजना केलेली असे. विनोद अचकटविचकट व ग्राम्य असे, आणि एकंदरींत धांगडधिंगा फार. परंतु ही स्थिति पालटण्यास कारणीभूत होणारी परिस्थिति लौकरच निर्माण झाली. इंग्रजी विद्येच्या प्रसारामुळें आणि विश्वविद्यालयीन शिक्षणामुळें आंग्लवाङ्मयांतील उत्कृष्ट नाट्यकृतींचा परिचय झाला. संस्कृतमधील बहुतेक प्रमुख नाटकांचीं भाषांतरें गोडबोले, राजवाडे वगैरे शास्त्रीमंडळींनीं केलीं. शेक्सपिअरच्या अथेल्लो, सिंबेलाइन, किंग लियर वगैरे जगप्रसिद्ध नाटकांचीं भाषांतरें इंग्रजी शिकलेल्या लोकांनीं केलीं. आणि कीर्तने यांनीं 'थोरले माधवराव' आणि 'जयपाळ' हीं आपलीं स्वतंत्र नाटकें याच सुमारास लिहिलीं. मुंबईस त्रिलोकेकर यांचीं 'नलदमयंती' आणि 'हरिश्चंद्र' हीं संगीत नाटकें रंगभूमीवर आलीं. परंतु एकंदर नाट्यवाङ्मयाची स्थिति परपुष्टच होती. वाङ्मय व रंगभूमि या दोन्ही दृष्टींनीं उच्च दर्जाचीं नाटकें निर्माण व्हावयाचीं होतीं.

ही क्रान्ति **बळवंत पांडुरंग** उर्फ **अण्णा किर्लोस्कर** यांनीं घडवून आणली. अण्णा किर्लोस्कर हे बेळगांवकडील राहणारे. रेव्हिन्यू खात्यांत प्रथम नोकरीला होते. त्यांना नाटकाची आवड लहानपणापासून होती. त्यानीं स्वतः एक मंडळी काढून 'विक्रमचरित्र', 'बाजीराव यांचा फार्स' अशीं नाटकें केलीं. त्यांनीं आपल्या तिसाव्या वर्षी श्रीशांकरदिग्विजय हें नाटक लिहिलें. अण्णा किर्लोस्कर यांची कीर्ति मुख्यतः संगीत नाटकावर आहे. संगीत शाकुन्तल हें कालिदासकृत अभिज्ञान शाकुंतलाचें भाषांतर आहे. यांतील श्लोकांचें भाषांतर श्लोकबद्धच न करतां संगीताला अनुकूल अशा चाली व राग देऊन केलें आहे. याप्रमाणें त्यांनीं संगीत नाटकांचा पाया घातला आहे. संगीत सौभद्र आणि संगीत रामराज्यवियोग हीं किर्लोस्कर यांनीं लिहिलेलीं नाटकें स्वतंत्र आहेत. यांपैकीं रामराज्यवियोगाचे फक्त तीनच अंक त्यांनीं लिहिले. किर्लोस्करांच्या सर्व नाटकांत सौभद्र नाटक अतिशय लोकप्रिय झालें आहे, आणि अद्यापिहि त्याचें नाविन्य कमी झालें नाहीं. रंगभूमीवर वर्षांनुवर्षें टिकून राहणें हें नाटकाच्या यशाचें गमक मानलें, तर सौभद्र नाटकाची अत्यंत यशस्वी नाटकांत गणना करावी लागेल. कथानकाच्या उभारणींत नाट्यप्रसंग चांगले साधले असून

संवादांची भाषा सरळ व चटकदार आहे. विदूषकाचा ठराविक साच्यांतील विनोद सोडला तरी प्रसंगात्मक विनोदाला भरपूर वाव मिळालेला आहे. पदांची भाषा गोड आणि रसाळ असून आकर्षक चालींमुळें हीं पदें लोकांच्या तोंडांत खेळत राहिलीं आहेत.

**अण्णा किर्लोस्कर** यांनीं १८८० सालीं किर्लोस्कर नाटक मंडळी स्थापून संगीत नाटकांच्या प्रथेला चालना दिली. ते स्वतः नट होते. उंच व भव्य अंगयष्टि आणि जोमदार आवाज यामुळें त्यांचा अभिनय व गायन परिणामकारक होई. अण्णासाहेब हे १८८५ सालीं गुर्लहोसुर मुक्कामीं मधुमेहाच्या विकारानें वारले.

किर्लोस्करांच्या नंतर नाट्यवाङ्मयाचा इतिहास पाहिला तर संगीत नाटकें आणि गद्यनाटकें असे दोन प्रकार पडलेले दिसतात. हीं दोन प्रकारचीं नाटकें करणाऱ्या नाटक कंपन्यासुद्धां भिन्न भिन्न असत. विषयाच्या दृष्टीनें पाहिलें तर नाट्यवाङ्मयाचा हा ओघ पौराणिक, ऐतिहासिक आणि सामाजिक अशा तीन प्रवाहांतून वाहत गेलेला आहे. नाटकाच्या रचनेच्या दृष्टीने पाहिलें तर बहुतेक सर्व नाटकें पंचांकी असत. प्रत्येक अंक एकाहून अधिक प्रवेशांत विभागलेला असे. रंगभूमीच्या दृष्टीनें या कालांत पुष्कळच प्रगति झालेली आहे.

किर्लोस्करांच्या नंतर झालेल्या नाटककारांमध्यें **कृ. प्र. खाडीलकर** यांना प्रमुख स्थान दिलें पाहिजे. त्यांनीं १८९३ पासून नाट्यरचनेला सुरवात केली, आणि आतांपर्यंत चौदा नाटकें लिहिलीं आहेत. प्रारंभीं त्यांचा ओढा गद्यनाटकें लिहिण्याकडे होता. गद्यनाटकांपैकीं 'कांचनगडची मोहना', 'कीचक वध', 'बायकांचें बंड', 'सत्त्वपरीक्षा', 'भाऊबंदकी' इत्यादि नाटकें एके काळीं फार लोकप्रिय होतीं. 'मानापमान', 'स्वयंवर', 'विद्याहरण', 'द्रौपदी', 'मेनका', 'सावित्री' हीं त्यांचीं संगीत नाटकें आहेत. यांपैकीं नऊ नाटकें पौराणिक आणि तीन ऐतिहासिक आहेत. कलेच्या दृष्टीनें खाडीलकरांचीं नाटकें निःसंशय श्रेष्ठ दर्जाचीं आहेत. त्यांचें भाषेवरील प्रभुत्व असामान्य आहे. शृंगार, करुण आणि वीर हे तीन प्रमुख रस त्यांना चांगले साधतात. त्यांच्या नाटकांतील विनोद मात्र पुष्कळ वेळां ओढून ताणून आणलेला असतो आणि विनोद करण्याच्या मोहाला ते बळी पडले नसते तर बरें झालें असतें असें वाटूं लागतें.

त्यांचीं कांहीं नाटकें रूपकात्मक आहेत आणि हें रूपक समजण्यास हीं नाटकें लिहिलीं त्यावेळची परिस्थिति वाचकास माहित असणें जरूर आहे.

**श्रीपाद कृष्ण कोल्हटकर** हे खाडीलकरांचे समकालीन परंतु खाडीलकरां-इतकीं त्याचीं नाटकें भाग्यशाली ठरलीं नाहींत. यानीं एकंदर बारा नाटकें लिहिलीं. खाडीलकर यांनीं गद्यनाटकें रचतांना शेक्सपिअरला आदर्श मानला होता, तर कोल्हटकरांच्या नाट्यतंत्रावर फ्रेंच नाटककारांच्या पद्धतीचा परिणाम झालेला दिसतो. नाट्यरचनेच्या बाबतींत नवीन प्रकार आणण्याचा प्रयत्न कोल्हटकर यांनीं केला आहे. 'वीरतनय', 'गुप्तमंजूषा', 'मतिविकार', इत्यादि सर्व नाटकें सामाजिक चालीरीतींचा बरेवाईटपणा दाखविण्याकरितां लिहिलीं आहेत. परंतु लेखकाचें लक्ष कथानक आणि पात्रांचा स्वभाव-परिपोष इकडे गुंतल्यामुळें मूळ हेतूची हेळसांड केलेली सांपडते. कोल्हटकर यांचीं कथानकें स्वतंत्र आहेत. कल्पनेची भरारी, उच्च तऱ्हेचा विनोद, चटकदार संवाद इत्यादि गुण त्यांच्या नाट्यकृतींत दिसून येतात. कथानकाची मांडणी कित्येक वेळां शिथिल व गुंतागुंतीची असते. काव्यदृष्ट्या त्यांचीं पदें सरस आहेत. कल्पना-नाविन्य हा विशेष गुण आहे. कांहीं पदांची भाषा मात्र अत्यंत संस्कृतप्रचुर झाली आहे. कोल्हटकर यांनीं संगीत शास्त्राचा उत्तम अभ्यास केला असल्यामुळें पदांच्या नवीन चाली शोधून त्यांत त्यांनीं रचना केली आहे.

**गोविंद बल्लाळ देवल** यांनीं शारदा, शापसंभ्रम, विक्रमोर्वशीय, मृच्छकटिक, दुर्गा, झुंझारराव आणि संशयकल्लोळ अशीं सात नाटकें लिहिलीं. यांपैकीं पहिलें नाटक स्वतंत्र आहे. पुढील तीन नाटकें संस्कृतच्या आधारें व शेवटलीं तीन नाटकें इंग्रजीच्या आधारें लिहिलीं आहेत. देवलांच्या सर्व नाटकांत शारदा व संशयकल्लोळ हीं नाटकें विशेष लोकप्रिय झालीं आहेत. शारदा नाटकांत जरठ-कुमारीविवाहाचा विषय आहे. आणि या विषयाचें औचित्य जसें नाहींसें होत जाईल तशी त्या नाटकाची लोकप्रियताहि ओहोटीस लागेल. पण संशयकल्लोळ हें नाटक मात्र हास्यप्रधाननाटकाचा उत्कृष्ट नमुना म्हणून मराठी रंगभूमीवर पुष्कळ वर्षें जिवंत राहील. घरगुती संभाषणाची भाषा देवल यांना फार चांगली लिहितां येते.

**न. चिं. केळकर** यांनींहि सहासात नाटकें लिहिलीं आहेत. त्यांतील तोतयाचें बंड व कृष्णार्जुनयुद्ध हीं विशेष प्रसिद्ध आहेत. नाना फडणवीसांनीं सदाशिवराव भाऊच्या तोतयाचें पारिपत्य कसें केलें हा पहिल्या नाटकाचा विषय आहे. स्वभावपरिपोषाच्या दृष्टीनें नाना फडणवीस, पार्वतीबाई, अमला या पात्रांचें स्वभावरेखन उत्कृष्ट आहे. कृष्णार्जुनयुद्ध आणि वीरविडंबन यांतील प्रसंगनिष्ठ विनोद बहारीचा आहे. प्रसिद्ध इतिहाससंशोधक मिरजेचे **वासुदेवशास्त्री खरे** यांनीं गुणोत्कर्ष, चित्रवंचना, तारामंडळ, शिवसंभव इत्यादि नाटकें लिहिलीं आहेत. खरे यांच्या नाटकांमध्यें फारसा कल्पनाविलास दिसून येत नाहीं. कथानकाची उत्कण्ठापूर्ण घटना करावयाची इकडे त्यांनीं विशेष लक्ष पुरविलें आहे. बहुतेक नाटकांत ऐतिहासिक वातावरण घेतलें आहे, परंतु कथानक मात्र स्वतंत्र आहे. शिवसंभव हें एकच नाटक याला अपवाद ठरेल. रचना व भाषा जुन्या पद्धतीकडे झुकलेली आणि नवीन विशेषांचा अभाव यामुळें त्यांचीं नाटकें लोकप्रिय राहणें शक्य नव्हतें. ऐतिहासिक विषयावर यशस्वी नाटकें **टिपणीस** आणि **औंधकर** यांनीं लिहिलीं आहेत.

कवि किंवा विनोदी लेखक यापेक्षां नाटककार म्हणून **राम गणेश गडकरी** यांचें मराठी वाङ्मयांतील स्थान बरेंच उच्च दर्जाचें आहे. प्रेमसंन्यास, पुण्यप्रभाव, एकच प्याला आणि भावबंधन हीं संपूर्ण नाटकें आणि राजसंन्यास व वेड्याचा बाजार हीं अपूर्ण नाटकें इतकी नाट्यवाङ्मयांत त्यांनीं भर घातली आहे. प्रेमसंन्यास हें नाटक पुनर्विवाहाच्या पुरस्काराकरितां लिहिलें असून तें शोकान्त आहे. दारूच्या व्यसनापायीं स्वतःच्या संसाराची सुधाकरानें केलेली राखरांगोळी हा एकच प्यालाचा विषय आहे. पुण्यप्रभावांत पतिव्रतेचा प्रभाव वर्णन केला आहे तर भावबंधन कथानकप्रधान आहे. सर्वच नाटकांमधील त्यांची भाषा कृत्रिम आहे; परंतु त्यावरून त्यांचें भाषाप्रभुत्व चांगलेंच निदर्शनास येतें. अनुप्रासात्मक रचना, विशिष्ट धर्तीचीं वाक्यें, शब्दांवरील कोट्या यांची रेलचेल त्यांच्या नाटकांत सांपडेल. प्रसंगाला अस्थानीं आणि अनुचित वाटला तरी त्यांचा विनोद हास्याच्या लहरीवर लहरी उठवितो. भावनांची तीव्रता दर्शविण्याकडे त्यांचा कल अधिक आहे. सामान्य व्यवहारांत देवमाणसें काय किंवा राक्षसी वृत्तीचीं माणसें काय फारशीं आढळून येत नाहींत. सत् आणि असत् यांमधील सीमारेषेचे आगेंमागें जगाचे व्यवहार चाललेले असतात. पण गडकरी दोन

टोंकाला धांवतात. त्यांची वसुंधरा आणि सिंधु काय किंवा कमलाकर आणि घनः-श्याम काय या अपवादभूतच व्यक्ति आहेत. अशा तीव्रतर भावनांचें चित्रण करणें मग तें कोणत्याहि रसासंबंधीं असो हें गडकऱ्यांच्या प्रतिभेला विशेष मानवतें. भावबंधन नाटकांत कोटिबाजपणाचा कहर झाला आहे तर राजसंन्यासांत जुन्या शब्दांचा सर्रास उपयोग केल्यामुळे भाषा दुर्बोध झाली आहे. स्वभावरेखन आणि कथानकाचा एकसूत्रीपणा यामुळे त्याचें एकच प्याला हें नाटक मात्र अप्रतिम वठलें आहे, आणि त्याची लोकप्रियता कायम राहील असा विश्वास वाटतो.

अलीकडील काळांत नाट्यवाङ्मयांत महत्त्वाची भर घालणारे नाटककार **वरेरकर व अत्रे** हे आहेत. वरेरकर यांनीं १९०८ साली 'कुंजविहारी' ही पहिली नाट्यकृति लिहिली आणि तेव्हांपासून आतांपर्यंत सुमारे वीस लहानमोठीं नाटकें त्यांनीं लिहिलीं आहेत. पौराणिक किंवा ऐतिहासिक विषयांपेक्षां सामाजिक विषयांवर त्यांनीं लिहिलेलीं नाटकेंच सरस आहेत. 'हाच मुलाचा बाप,' 'संन्याशाचा संसार,' 'सत्तेचे गुलाम,' 'सोन्याचा कळस,' इत्यादि त्यांच्या सामाजिक नाटकांवरून त्यांची प्रगमनशीलताहि दिसून येते. समाजापुढे जे जे नवीन प्रश्न येत आहेत त्यांकडे ते आधुनिक दृष्टीनें पाहतात. तसेंच रचनेच्या दृष्टीनें नवीन नवीन प्रयोग करून पाहाण्यास त्यांची नेहमीं तयारी असते. नाट्यलेखनामध्यें त्यांच्या इतक्या सुधारणा करून पाहण्याची तत्परता दुसऱ्या कोणत्याहि नाटककारानें दाखविली नसेल. तथापि रचनादोष नाहींत असें नाहीं; आणि थोड्या सावधानतेनें त्यांना ते टाळतांहि आले असते.

**अत्रे** यांचीं आतांपर्यंत सहा नाटकें प्रसिद्ध झालीं आहेत. त्यांपैकीं साष्टांग नमस्कार व भ्रमाचा भोपळा हीं हास्यरसप्रधान आणि घराबाहेर व उद्याचा संसार हीं गंभीर विषयावर आहेत. श्री. वर्तक यांनीं रूपांतरित केलेल्या आंधळ्यांची शाळा, लपंडाव वगैरे नाटकांनीं इब्सेन संप्रदायाचें नाट्यलेखनतंत्र महाराष्ट्राच्या परिचयाचें केलें. या तंत्रानुसार अत्रे यांनीं आपल्या दोन गंभीर-विषयक नाटकांची रचना केली आहे आणि त्यांत ते यशस्वीहि झाले आहेत. मानसिक घडामोडी आणि त्यांचें पृथक्करण याला या प्रकारच्या नाटकांत विशेष महत्त्व असतें. वास्तविकतेचें वातावरण कायम ठेवून नाट्यानुकूल अशी

अघटित घटना घडवून आणावयाची असते. अत्रे यांच्या दोन्ही कृतींत हें कौशल्य दिसून येतें. साध्यासुध्या कथानकांतून अपूर्वता निर्माण करावयाची आणि ती निर्माण होईपर्यंत वाचकांची उत्कंठा कथानकावर केन्द्रित करावयाची हें काम कांहीं लहानसहान नव्हे. अत्रे यांनीं या क्षेत्रांत मिळविलेलें स्पृहणीय यश त्यांच्या भावी यशाची ग्वाही देत आहे.

सदाशिव अनन्त शुक्ल यांचीं पौराणिक नाटकें बरींच लोकप्रिय आहेत. पौराणिक कथांतील तेजस्वी तत्त्वांचे विशदीकरण करून त्यावर आधुनिक विचारांचा कल्पनारम्य साज चढविण्यांत शुक्ल कुशल आहेत. 'सिंहाचा छावा,' 'स्वर्गावर स्वारी,' 'सत्याग्रही' हीं नाटकें मराठी रंगभूमीवर विशेष प्रसिद्धीस आलीं. नाटकांतील पदांची रचना काव्यरसपूर्ण करण्यांत त्याचा हातखंडा आहे. रागदारी आणि ताल यांचें बंधन स्वीकारून लालित्यपूर्ण रचना करणें फार थोड्यांना साधते. शुक्ल यांनीं तें यश संपादिलें आहे.

## चरित्रें

चरित्रलेखनाची परंपरा जुनी असली तरी लेखनपद्धति आणि चरित्रविषयीभूत व्यक्ति याकडे पाहण्याचा दृष्टिकोण एकच असतो असें नाहीं. प्राचीन कवींनीं सतांचीं चरित्रें गायिलीं आहेत, पण त्यांत श्रद्धेचा भाग ज्यास्त. पाश्चात्य धर्तीवर चरित्रें लिहिण्याची प्रथा १८४७ च्या पुढील दशकांत सुरू झाली. न्या. रानडे यांनीं मराठी वाङ्मयावर जो निबंध लिहिला आहे त्यांत १८४७ ते १८५७ या दशकात कॅ. कुक्, कोलंबस, साक्रेटीस आणि नाना फडणवीस यांचीं चरित्रें प्रसिद्ध झाल्याचा उल्लेख आहे. त्यांपैकीं पहिलीं तीन इंग्रजीच्या आधारें लिहिलीं असून नाना फडणवीस यांचें चरित्र भाषांतरात्मक होतें. यानंतर चरित्रलेखनास सुरवात झाली असें म्हटलें पाहिजे. आतांपर्यंत प्रसिद्ध झालेल्या चरित्रवाङ्मयाचें विषयाच्या दृष्टीनें वर्गीकरण केलें तर तें असें होईल. (१) परकीय थोर पुरुष, (२) संत, (३) ऐतिहासिक, (४) पौराणिक आणि (५) समकालीन थोर विभूति. पहिल्या पहिल्या लेखकांचा ओढा परदेशस्थ थोर विभूतींच्याकडे होता. याचीं कारणें अनेक असूं शकतील. आपल्याकडील इतिहासकालीन किंवा समकालीन थोर पुरुषांबद्दल माहिती उपलब्ध नसेल किंवा पाश्चात्य लोक आपल्यापेक्षां श्रेष्ठ तेव्हां त्यांचें चरित्र वर्णन करावें

असाहि हेतु असेल. शिवाय अशा व्यक्तींचें चरित्र लिहिणें सोपें होतें. इंग्रजीमधील चार दोन चरित्रें गोळा करून वाचलीं कीं झालें काम. फारसे श्रम करायला नकोत. व्हिक्टोरिया, पिट, बेकन, स्विफ्ट, न्यूटन, कॉब्डेन, लिव्हिंग्स्टन, क्लाइव्ह इत्यादि इंग्लंडमधील थोर पुरुषांचीं, वॉशिंग्टन, फ्रँकलिन, लिंकन, गारफील्ड या अमेरिकन विभूतींचीं किंवा आलेक्झांडर, साक्रेटीस, डिमॉस्थेनीस, या ग्रीक व्यक्तींचीं चरित्रें लिहिण्यांत आलीं. पण यांतील विशेष नांव घेण्याजोगें एकहि नव्हतें. याचें कारण लेखकाची स्वतंत्र प्रतिभा या चरित्रग्रंथांत कोठेंहि दृष्टीस पडत नव्हती.

लेखकाची ही स्वतंत्र प्रतिभा विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं लिहिलेल्या डॉ. जॉन्सनवरील चरित्रात्मक निबंधांत प्रथम अनुभवास येते. थोडक्यामध्यें डॉ. जॉन्सन यांचा जीवनवृत्तांत, त्यांचें कार्य आणि लेखकाची त्याविषयीं दृष्टि यांचा परिचय वाचकाना होतो व चरित्रनायकाच्या व्यक्तीचा कायमचा ठसा वाचकांच्या मनावर या चरित्रवाचनानें उमटतो. डॉ. जॉन्सनबद्दल चिपळूणकरांना आदराबरोबर सहानुभूतिहि वाटत होती. त्यांच्या लेखनांत जिव्हाळ्याचा ओलावा प्रत्येक पानावर आढळला तरी त्यांनीं आपल्या नायकाचें फाजील स्तोम कोठेंहि गायिलें नाहीं. चिपळूणकरांच्या नंतर परकीय थोर पुरुषांचीं बरींच चरित्रें लिहिलीं गेलीं आहेत. बर्क (चाफेकर), कार्लाइल (दामले), स्पेन्सर (फडके), मेकॉले इत्यादिकांचीं चरित्रें लिहिण्यास त्या त्या चरित्रनायकांचें विश्वविद्यालयाच्या अभ्यासक्रमांत असलेलें स्थान कारणीभूत झालेलें आहे. जागतिक राजकारणांत कित्येक राष्ट्रें कांहीं कांहीं कारणामुळें विशिष्ट कालांत लोकांच्या दृष्टीसमोर येतात आणि त्या राष्ट्राचा इतिहास आणि त्यामधील राष्ट्रपुरुष यासंबंधीं साहजिकच कुतूहल निर्माण होतें. गेल्या कांहीं वर्षांत आयर्लंड, इटली, जर्मनी, रशिया हीं राष्ट्रें अशींच जगाच्या पुढें आलीं. आधुनिक जर्मनीची प्राणप्रतिष्ठा करणारा थोर मुत्सद्दी प्रिन्स बिस्मार्क याचीं मुंडले आणि प्रभाकर यांनीं विस्तृत चरित्रें लिहिलीं आहेत. काव्हूर, गॅरिबाल्डी आणि माझिनी या इटालीच्या राष्ट्रसूत्रधारांचीं चरित्रें एके काळीं विशेष लोकप्रिय होतीं. मुंडले यांनींच काव्हूरचें चरित्र लिहिलें आहे. त्यांच्या लेखनांत सरळ कथन असतें. विषयाची आकर्षक मांडणी किंवा मोहक भाषाशैली यांचें प्रमाण कमी असल्यामुळें चरित्रलेखन कंटाळवाणें होतें. न. चिं. केळकर यांनीं लिहिलेलें गॅरिबाल्डीचें

चरित्र चांगलें आहे. घाणेकर, बॅ. सावरकर आणि जोगळेकर या तिघांनीं माशिनीचें चरित्र लिहिलें आहे. यावेळच्या सर्व चरित्रांत वि. ल. भावे यांनीं लिहिलेलें चक्रवर्ति नेपोलिअन याचें चरित्र सरस वठलें आहे. कांहीं कांहीं प्रसंग तर त्यांनीं इतक्या चटकदार पद्धतीनें वर्णिले आहेत कीं आपण एखाद्या कादंबरींतील प्रकरणें तर वाचीत नाहीं ना असा संदेह वाचकास पडतो. भावे यांनीं चरित्रलेखनांत अभिनव पद्धति आणिली यांत शंका नाहीं. प्रो. फडके यांनीं मॅक्स्विनी आणि डी–व्हॅलरा यांचीं लहानच पण आकर्षक अशीं लिहिलेलीं चरित्रें वाचनीय आहेत. ताम्हण-कर यांचें मुसोलिनीचें चरित्र प्रवाही भाषेमुळें वाचावेसें वाटतें, परंतु विवेच-नाची शिथिलता त्यामध्यें फार आढळते. टॉलस्टॉय या रशियन तत्त्वज्ञानी लेखकाचे विस्तृत चरित्र भारत–गौरव–ग्रंथमालेनें प्रसिद्ध केलें आहे. याखेरीज लहानमोठीं अनेक चरित्रें झालीं आहेत; पण त्या सर्वांचा उल्लेख करण्याचें कारण नाहीं.

महाराष्ट्रांतील साधुसंतांचीं चरित्रें हें चरित्रपर वाङ्मयांतील महत्त्वाचें दालन आहे. ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम इत्यादि प्रमुख संतांचीं चरित्रें पुष्कळ लेखकांनीं लिहिलेलीं आहेत. भिंगारकर बोवा यांनीं लिहिलेलें ज्ञानेश्वराचें चरित्र ऐतिहासिक आहे. ज्ञानेश्वराचा कालनिर्णय, ज्ञानेश्वर एक कीं दोन या तत्कालीन वादग्रस्त मुद्यांच्या खण्डनार्थ त्यांनीं आपलें चरित्र लिहिलें आहे. प्रो. दाडेकर यांचें छोटेंसें चरित्र थोडक्यांत ज्ञानेश्वरासंबंधीं सर्व माहिती देतें. या सर्व संतचरित्रकारांमध्यें संख्याधिक्य व गुणाधिक्य या दृष्टीनें **श्री. ल. रा. पांगारकर** यांचें स्थान पहिलें लागतें. ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम या संतांचीं व मोरोपंत आणि मुक्तेश्वर या प्राचीन कवींचीं नमुनेदार चरित्रें त्यांनीं लिहिलीं आहेत. संतवाङ्मयाचें त्यांचें अध्ययन दीर्घकालीन व खोल असल्या-मुळें त्यांचीं चरित्रें माहितीच्या दृष्टीनें जशीं विश्वसनीय तशींच भाषेच्या दृष्टीनें प्रासादिक उतरलीं आहेत. तुकारामाचें चरित्र लिहितांना त्यांनीं तत्कालीन समाजाच्या दृष्टीनें तुकारामाच्या चरित्राचें परीक्षण करण्याचा यशस्वी प्रयत्न केला आहे. चरित्रलेखनाची ही पद्धत अनुकरणीय आहे.

महाराष्ट्रभाषाभूषण अशी सार्थ पदवी मिळालेल्या **श्री. आजगांवकर** यांनीं महाराष्ट्र कविचरित्राचे सहासात भाग प्रसिद्ध केले आहेत. जुन्या कवींची

माहिती मोठ्या प्रयासानें मिळवून ती त्यांनीं या चरित्रांतून प्रथमच वाचकापुढें मांडली आहे. आजगांवकरांनीं हा प्रयत्न केला नसता तर कित्येक जुने कवि केवळ नांवानेंच परिचित असते. आजगांवकर यांचा व्यासंग दीर्घकालीन असल्यामुळें त्याचीं चरित्रे माहितीपूर्ण अशीं झालीं आहेत. चरित्रांत ठिकठिकाणीं साधार व सोदाहरण विवेचन केले असल्यामुळें त्या कवींच्या वाङ्मयकार्याचीहि कल्पना येतें.

महाराष्ट्र कविचरित्राचे सहासात भाग प्रसिद्ध करणाऱ्या आजगांवकरांनीं विपुल लेखन केलें आहे. परंतु त्यांचीं चरित्रें त्रोटक आहेत. त्यांचें एकनाथाचेंच चरित्र फक्त मोठें असल्यामुळे त्यांना आपल्या विषयाचा विस्तृत परामर्ष घेतां आला आहे. कृ. ना. आठल्ये यांनीं समर्थांचें सामर्थ्य म्हणून रामदासाचें विस्तृत चरित्र लिहिलें आहे. परंतु त्यांत ऐतिहासिक माहितीबरोबर दन्तकथांचाहि संग्रह करण्यांत आल्यामुळें चरित्रग्रंथ म्हणून त्याची योग्यता कमी झाली आहे. सदाशिव खंडो आळतेकर यांनीं उपलब्ध सर्व साहित्याचा उपयोग करून श्रीसमर्थ रामदासांचें चरित्र लिहिलें आहे. भिडे व हर्षे यांचे तुकारामावरील प्रबंध थोडक्यांत विषयाची योग्य माहिती करून देणारे आहेत.

पौराणिक व्यक्तींचीं चरित्रेंलि हिण्याची प्रथा अद्याप पडलेली नाहीं. जी कांहीं थोडीबहुत लिहिलेलीं असतात तीं विद्यार्थ्यांच्या दृष्टीनें. परंतु पौराणिक दंतकथांचें जंजाळ काढून टाकून त्यांतून ऐतिहासिक पुरुष निर्माण करण्याचा प्रयत्न होणें जरूर आहे. असा प्रयत्न फक्त **चिं. वि. वैद्य** यांनीं आपल्या श्रीरामचरित्र व श्रीकृष्णचरित्र या दोन ग्रंथांत केलेला आहे. काव्यपूर्ण भाषा आणि रसवत्ता यामुळें हीं दोन्ही चरित्रें आदर्शभूत झालीं आहेत. वाकसकर यांचें राधेय कर्ण हें चरित्रहि उल्लेखनीय आहे.

ऐतिहासिक चरित्रें लिहिण्यास धनुर्धारी उर्फ रामचंद्र विनायक टिकेकर यांनीं सुरवात केली; परंतु या चरित्रलेखनाचा हेतु स्वदेशांतील वीर व मुत्सद्दी यांचीं चरित्रें गाऊन देशभक्तीचे धडे देण्याचा असल्यामुळें त्यांचें स्वरूप प्रचारकी थाटाचें झालें आहे. इतिहास बाजूलाच राहतो आणि लढाया किंवा चरित्रनायकाचे सद्गुण यांचें अत्युक्तिपूर्ण वर्णन करण्यांतच लेखक गुंतलेला दिसतो. तीच स्थिति ना. वि. बापट यांच्या ‘ पहिले बाजीराव पेशवे ’ यांच्या चरित्राविषयीं.

तथापि या चरित्रांनीं एकेकाळीं स्वकीय इतिहासाबद्दल प्रेम निर्माण केलें यांत शंका नाहीं; आणि त्याचेंच प्रत्यंतर म्हणजे यापुढील कालांत लिहिलीं गेलेलीं संशोधनपूर्वक ऐतिहासिक चरित्रें. द. ब. पारसनीस यांचें महाराणी लक्ष्मीबाई झांशीवाली इचें चरित्र १८९४ सालीं प्रसिद्ध झालें. संशोधनपूर्वक माहिती देऊन लेखनांत मनोरंजकता आणावयाची हा हेतु यांत साध्य झाला आहे. त्यांनीं लिहिलेल्या ब्रह्मेन्द्रस्वामींच्या चरित्रानें एकेकाळीं वादाची बरीच धुमाळी माजविली होती. शुद्ध ऐतिहासिक चरित्राचा पाया वासुदेवशास्त्री खरे यांनीं 'नानांचा अधिकारयोग' आणि 'नाना फडणविसाचें चरित्र' हीं दोन पुस्तकें लिहून घातला. अत्रे यांचें मल्हारराव होळकरांचें चरित्र, नातु यांचें महादजींचें चरित्र आणि देव यांचें अहिल्याबाईचें चरित्र या पुस्तकांनीं ऐतिहासिक चरित्रवाङ्मयांत चांगली भर घातली आहे. छत्रपति शिवाजी महाराज यांचें प्रमाणभूत चरित्र अद्यापिही लिहिलें गेलें नाहीं. केळुसकर यांनीं चरित्र लिहिल्यानंतर पुष्कळच नवीन माहिती उजेडांत आली आहे. वाकसकर यांनीं सर यदुनाथ सरकारच्या पुस्तकाचें भाषांतर केलें आहे. चिं. वि. वैद्य यांचें चरित्र आदर्श मानतां येत नाहीं. अलीकडे प्रसिद्ध झालेल्या ऐतिहासिक चरित्रग्रंथात प्रो. बेहेरे यांचें 'पहिले बाजीराव पेशवे' आणि रियासतकार सरदेसाई यांचें 'नानासाहेब पेशवे' हीं चरित्रें उल्लेखनीय आहेत.

अर्वाचीन थोर पुरुषांचीं चरित्रें मराठींत बरींच झालीं आहेत आणि यांत एकसारखी भर पडत आहे. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचें त्यांच्या बंधूंनीं लिहिलेलें चरित्र नमुनेदार आहे. व्यक्ति व वाङ्मय या दोहींची यथार्थ कल्पना त्यावरून होते. परंतु विष्णुशास्त्र्यांचें वाङ्मयांतील स्थान समकालीनत्वामुळें त्यांना बरोबर ताडतां आलें नाहीं. काशीबाई कानिटकर यांनीं डॉ. आनंदीबाई जोशी यांचें लिहिलेलें चरित्र त्यात दिलेल्या आनंदीबाईच्या पत्रांमुळें वाचनीय झालें आहे. डॉ. भांडारकर, न्यायमूर्ति तेलंग, डॉ. भाऊदाजी याचीं श्री. ना. कर्नाटकी यांनीं लिहिलेलीं चरित्रें माहितीपूर्ण आहेत. ना. गोखले यांचें विस्तृत चरित्र अद्याप लिहिलें जावयाचें आहे. सध्यां उपलब्ध असलेल्या चरित्रांमध्यें पां. स. साने यांचें चरित्र चांगलें आहे.

समकालीन व्यक्तींचें चरित्र लिहिण्याची एक अभिनव पद्धति **न. चिं. केळकर** यांनीं आपल्या विस्तृत टिळक-चरित्रांत अवलंबिलेली आहे. केळकरांच्या

टिळक–चरित्राचे तीन खंड आहेत. टिळक ज्या काळांत विद्यमान होते त्या काळाचा इतिहास, त्यांचा ज्या व्यक्तींबरोबर आणि ज्या चळवळींशीं संबंध आला त्याची हकीकत आणि खुद्द चरित्रनायकाचा मनोविकास इत्यादि गोष्टी दिल्यामुळे मराठींतील चरित्रपर वाङ्मयांत टिळक–चरित्र आदर्शभूत बनलें आहे. न. र. फाटक यांचें न्यायमूर्ति रानडे यांचें चरित्र वरील पद्धतिनुसारच लिहिलेलें आहे; पण त्याचा विस्तार कमी असल्यामुळें रानडे यांच्या कार्याचें संपूर्ण विवेचन त्यांत येऊं शकलें नाहीं. प्रो. आळतेकर यांचा आगरकरांवरील चरित्र-प्रबंध जरा निराळ्या पद्धतीनें लिहिलेला आहे. चरित्रग्रंथामध्ये येणारी माहिती देऊन त्यांच्या राजकीय, सामाजिक व आर्थिक विषयांवरील मतांची विचिकित्सा शास्त्रीय पद्धतीनें करण्यांत आली आहे.

वाङ्मयात्मक कार्याचा आढावा घेणारीं प्रसिद्ध वाङ्मयसेवकांचीं प्रमाणभूत चरित्रें मराठींत व्हावयाचीं आहेत. बा. मा. आंबेकर यांनीं हरिभाऊ आपटे यांचें संक्षिप्त चरित्र लिहिलें आहे. व्यक्ति या नात्यानें हरिभाऊ कसे होते याची ओळख या चरित्रवाचनानें तेव्हांच पटते. **कु. वेणूबाई पानसे** यांचें आपट्यांचें चरित्र विस्तृत असून हरिभाऊंचें जीवनवृत्त आणि वाङ्मयकार्य याची संपूर्ण हकिकत त्यांत देण्यांत आली आहे. **वि. स. खांडेकर** यांनीं गडकरी आणि आगरकर याचीं चरित्रें लिहिलीं आहेत. त्यांत त्यांचें गडकरी यावरील व्यासंगपूर्ण लिहिलेलें पुस्तक गडकरी वाङ्मयाची ओळख करून देण्याच्या दृष्टीनें चांगलें आहे.

आत्मचरित्रें हा चरित्राचाच एक भाग आहे. आपलें आपण स्वतःचें चरित्र लिहिण्याची पद्धत आपण पाश्चात्यांकडूनच घेतली आहे. स्वचरित्र-विषयक उल्लेख पूर्वीच्या कांहीं लेखकांमध्यें सांपडत नसतील असें नाहीं, पण त्याला आत्मचरित्र म्हणतां यावयाचें नाहीं. अव्वल इंग्रजींतील लेखक दादोबा पांडुरंग आणि बाबा पदमजी यांनीं लिहिलेल्या आत्मचरित्रांवरून समकालीन माहिती बरीच मिळते. श्री. रमाबाई रानडे यांच्या ‘ आमच्या आयुष्यांतील आठवणी ’ या पुस्तकाचा समावेश चरित्रांतहि करतां येत नाहीं आणि त्याला आत्मचरित्रहि म्हणतां येत नाहीं. लक्ष्मीबाई टिळक यांच्या ‘ स्मृतिचित्रें ’ या पुस्तकाचेंहि स्वरूप वरील प्रमाणेंच आहे. हीं दोन्ही पुस्तकें मराठी भाषेंत अपूर्व व रमणीय

आहेत. मराठींतील नांव घेण्याजोगें पहिलें आत्मचरित्र म्हणजे **प्रो. धोंडो केशव कर्वे** यांचे. प्रो. कर्वे यांच्यामध्यें अनुकरणीय चारित्र्य आणि महनीय कार्य यांचा सुंदर मिलाफ झालेला आहे. आत्मचरित्रास आवश्यक असणारा मोकळेपणा आणि एक प्रकारची उदात्तता यामुळें हें आत्मचरित्र उत्कृष्ट वठले आहे. आगरकरांचे शिष्य आणि सातारा न्यू इंग्लीश स्कूलचे आद्य सुपरिंटेंडंट सी. ग. देवधर, भारतीय साम्राज्य या पुस्तकमालेचे लेखक नाना पावगी, प्रसिद्ध विनोदी लेखक व नाटककार श्री. कृ. कोल्हटकर, यांचीं आत्मचरित्रें, धर्मानंद कोसंबी यांचें निवेदन, पार्वतीबाई आठवले यांचें 'माझी कहाणी', बॅ. सावरकर यांचें 'माझी जन्मठेप' आणि डॉ. केतकर यांचें माझें बारा वर्षांचें काम, हीं आत्मचरित्रपर पुस्तकें कमीज्यास्त प्रमाणांत वाचनीय आहेत.

दोन प्रसिद्ध साहित्यिकांचीं आत्मचरित्रें नुकतींच प्रसिद्ध झालीं आहेत. संत-वाङ्मयाचा अखंड व्यासंग करणारे श्री. ल. रा. पांगारकर यांनीं 'चरित्रचंद्र' या नांवानें आपलें आत्मचरित्र प्रसिद्ध केलें आहे. श्री. न. चिं. केळकर यांनीं 'माझी जीवनयात्रा' म्हणून हजार पृष्ठांचा ग्रंथ लिहिला आहे. हीं दोन्हीं आत्मचरित्रें मराठींत अपूर्व अशींच ठरतील. महाराष्ट्रांतील हरएक चळवळीशीं केळकरांचा संबंध कोणत्या ना कोणत्या प्रकारें आला आहे. तेव्हां त्यांची जीवनयात्रा म्हणजे महाराष्ट्राचा गेल्या ४० वर्षांचा इतिहासच म्हटला पाहिजे.

## इतिहाससंशोधन व ऐतिहासिक वाङ्मय

एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभीं ग्रँट डफ या इंग्रज इतिहासकारानें 'मराठ्यांचा इतिहास' हा आपला ग्रंथ लिहिला. मराठ्यांच्या इतिहासावर हा ग्रंथ कित्येक वर्षें प्रमाण मानिला जात असे. या ग्रंथाचें भाषांतर १८२९ सालीं प्रसिद्ध झालें. अर्वाचीन पद्धतीनें इतिहासलेखनाची ही सुरवात म्हणावयास हरकत नाहीं. तथापि हा इतिहास परकीय लेखकाने लिहिलेला असल्याकारणानें त्यांत चुकीची माहिती, विपर्यस्त विधानें येणें अपरिहार्य आहे. या ग्रंथाच्या खऱ्या स्वरूपाचा उलगडा नीळकंठ जनार्दन कीर्तने यांनीं ग्रँट डफच्या बखरीवरील टीका लिहून (१८६७) केला. निबंधमालेंत विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं इतिहास या विषयावर ओजस्वी निबंध लिहून इतिहासाविषयीं महाराष्ट्रात आस्था निर्माण केली.

या आस्थेचा दृश्य परिणाम म्हणजे जुने ऐतिहासिक कागदपत्र आणि जुनी

मराठी कविता, विविधज्ञानविस्तार, काव्येतिहाससंग्रह, इत्यादि मासिकांतून प्रसिद्ध होऊं लागली. प्रथम प्रथम जुन्या बखरी बऱ्याचशा प्रसिद्ध झाल्या. ऐतिहासिक तत्त्वशोधनाच्या दृष्टीनें या बखरवाङ्मयाची योग्यता कमी असली तरी महाराष्ट्राच्या इतिहासाबद्दल त्यांनीं प्रेम निर्माण केलें, आणि म्हणूनच अस्सल ऐतिहासिक कागदपत्राकडे इतिहाससंशोधकांचें लक्ष गेलें.

ऐतिहासिक कागदपत्रांचें संकलन व संशोधन करून प्रसिद्ध करण्याचें कार्य **वि. का. राजवाडे, वासुदेवशास्त्री खरे** आणि रावबहादूर **द. बा. पारसनीस** यांनीं मुख्यतः केलें. पारसनीस यानीं महाराणी लक्ष्मीबाई झांशीवाली इचें चरित्र १८९४ सालीं प्रसिद्ध केलें आणि तेव्हांपासून त्याना इतिहासविषयक कागदपत्रें, चित्रें आणि इतर सामुग्री जमविण्याचा नाद लागला. न्या. रानडे यांच्या साहाय्यानें सरकारी बंदोबस्तांत ठेविलल्या पेशवे दप्तरांत त्यांचा प्रवेश झाला. पेशव्यांच्या कालांतील इतिहासास आवश्यक असणारी माहिती पेशवे–दप्तरांतील बहुमोल आणि अव्वल दर्जाच्या कागदपत्रांत साठविलेली होती. यापैकीं महत्त्वाचीं कागदपत्रें निवडून काढून रावबहादूर वाड आणि पुरुषोत्तम मावजी याच्या साहाय्यानें सुमारें १६ खंडांत त्यांनीं प्रकाशित केलीं. त्यांनीं अन्य ठिकाणीं जमविलेल्या ऐतिहासिक कागदपत्रांच्या प्रकाशनाकरितां 'भारतवर्ष' नांवाचें मासिक पुस्तक सुरू केलें. हें दोनच वर्षें चाललें, पण त्यामध्यें महत्त्वाचे जुने कागदपत्र आणि ऐतिहासीक विषयांवरील निबंध प्रसिद्ध झाले आहेत. यानंतर सातआठ वर्षांनीं 'इतिहास–संग्रह' म्हणून मासिक सुरू केलें. हें सात वर्षें चाललें आणि यांतहि महत्त्वाचे असे विपुल कागदपत्र प्रसिद्ध झाले आहेत. कागदप्रकाशनाचे कार्य चालू असतांनाच त्यांनीं ऐतिहासिक विषयावर कांहीं पुस्तकें लिहिलीं आहेत. ब्रह्मेंद्रस्वामी धावडशीकर यांचें चरित्र, अयोध्येचे नबाब, दिल्ली अथवा इंद्रप्रस्थ इत्यादि त्यांचीं पुस्तकें आकर्षक भाषाशैलीमुळें मनोरंजक झालीं आहेत.

वासुदेवशास्त्री खरे यांनीं मिरज संस्थानच्या संग्रहीं असलेल्या पटवर्धनी-दप्तरांतून निवडलेल्या महत्त्वाच्या कागदपत्रांचे बारातेरा भाग प्रसिद्ध केले आहेत. पारसनीस यांनीं भिन्न कालांतील आणि भिन्न प्रकरणांसंबंधीं कागदपत्र प्रसिद्ध केले आहेत. खरे यांनीं पेशवाईच्या उत्तरार्धांतील कागदपत्र कालानु-

क्रमानें लावून आणि त्यांमध्यें उल्लेखिलेल्या घडामोडींसंबंधीं विवेचक प्रस्तावना लिहून त्या कालाचा सविस्तर इतिहासच लिहिला आहे असें म्हणावयास हरकत नाहीं.

इतिहाससंशोधकांत राजवाडे यांचें स्थान अद्वितीय आहे. इतिहास, व्याकरण, भाषाशास्त्र, संस्कृत वाङ्मय, समाजशास्त्र इत्यादि अनेक विषयात ते पारंगत होते. 'मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें' म्हणून त्यांनीं एकंदर बावीस खंड प्रसिद्ध केले आहेत. त्यांतील कागदपत्रें तर महत्त्वाचीं आहेतच, पण त्याशिवाय त्यांतील कांहीं कांहीं खंडांना लिहिलेल्या विस्तृत प्रस्तावना अत्यंत विद्वात्ताप्रचुर आहेत. आपल्या इतिहासाकडे आपण कोणत्या दृष्टीनें पाहावयाचें हें त्यांनीं महाराष्ट्रास शिकविलें. 'राधामाधवविलासचंपू' हा शहाजीकालीन संस्कृत ग्रंथ त्यानीं प्रकाशित केला आहे. त्यांच्या प्रस्तावने-वरून राजवाडे यांच्या अगाध विद्वत्ता आणि व्यापक व्यासंग या गुणांची ओळख होते. एकनाथपूर्वकालीन ज्ञानेश्वरीची प्रत संशोधून त्यांनीं छापिली आहे. याखेरीज त्यांचे स्फुट लेख तर शेकड्यांनीं मोजण्याइतके आहेत. निबंधमाला-कारानंतर इतकी प्रखर भाषा लिहिणारा राजवाडे याखेरीज दुसरा लेखक झाला नाहीं. पुणें येथील भारत-इतिहास-संशोधक मंडळाची स्थापना करून त्यांनीं ऐतिहासिक संशोधनकार्याची परंपरा महाराष्ट्रांत कायम करून ठेविली आहे.

**शंकर श्रीकृष्ण देव** यांनीं धुळें येथे सत्कार्योत्तेजक सभा ही संस्था स्थापून त्यामार्फत रामदासी वाङ्मयाचें प्रकाशन आस्थापूर्वक केलें आहे. त्यांनीं प्रसिद्ध केलेली दासबोधाची प्रत प्रमाण मानण्यांत येते. महानुभावीय वाङ्मयासंबंधीं असाच प्रयत्न यवतमाळच्या शारदाश्रम या संस्थेमार्फत य. खु. देशपांडे हे करीत आहेत. निरनिराळ्या संस्थानांमध्येंहि ऐतिहासिक संशोधनाचा प्रयत्न चालू असतो, पण त्याचें स्वरूप त्या संस्थानापुरतें मर्यादित असतें. यापैकीं कांहीं संस्थानांचा इतिहास ग्रंथरूपानें प्रकाशित झाला आहे.

हिंदुस्थानचा इतिहास संगतवार आणि विस्तृत लिहिण्याचें कार्य **रियासत-कार सरदेसाई** यानीं आपल्या रियासतींमधून केलें आहे. मुसलमानी, मराठी आणि ब्रिटीश अशा तीन अमलाचे तीन विभाग कल्पून त्यानीं आपल्या रिया-सती लिहिलेल्या आहेत. त्यांतल्या त्यांत त्यांच्या मराठी रियासतीचे भाग मूळ ऐतिहासिक कागदपत्रांचें संशोधन करून लिहिले असल्यामुळें त्यांस प्रामाण्य

प्राप्त झालें आहे. इतिहासांतील विशिष्ट प्रकरणें घेऊन त्यांवर सविस्तर पुस्तकें लिहिण्याचा उपक्रमहि झाला आहे. न. चिं. केळकर यांचें 'मराठे व इंग्रज' द. वि. आपटे यांचें 'श्रीरंगपट्टणची मोहीम' आणि य. न. केळकर यांचें 'वसईची मोहीम' हीं पुस्तकें त्या त्या विषयावरील अधिकृत ग्रंथ समजण्यास हरकत नाहीं.

डॉ. केतकर यांनीं प्राचीन महाराष्ट्राचा इतिहास लिहिण्याचें कार्य अंगावर घेतलें असून त्याचा पहिला भाग प्रसिद्ध झाला आहे. हा विषय आतांपर्यंत अज्ञात असाच होता. जीं कांहीं पुस्तकें झालीं आहेत तीं इंग्रजींत. डॉ. केतकर यांचे सर्व भाग प्रसिद्ध झाल्यावर महाराष्ट्राचा हा आजवर अज्ञात असलेला इतिहास प्रकाशांत येईल.

# परिशिष्ट

## अभ्यसनीय पुस्तकांची यादी

(१) महाराष्ट्र–सारस्वत–वि. ल. भावे.
(२) अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक–गं. दे. खानोलकर.
(३) अर्वाचीन मराठी साहित्य–प्रकाशक वि. पां. नेने, बडोदा.
(४) मराठी भाषा, उद्गम आणि विकास–कृ. पां. कुळकर्णी.
(५) मराठी वाङ्मयाचा इतिहास–ज्ञानेश्वर काल–ल. रा. पांगारकर.
(६) ,, ,, –एकनाथ काल–ल. रा. पांगारकर.
(७) छन्दोरचना–मा. त्रिं. पटवर्धन.
(८) शास्त्रीय मराठी व्याकरण–मोरो केशव दामले.
(९) मराठी गद्याचा इंग्रजी अवतार–द. वा. पोतदार.
(१०) अभिनव काव्यप्रकाश–रा. श्री. जोग.
(११) अलंकारप्रकाश–वि. वा. भिडे.

(प्रस्तुत पुस्तक लिहिण्यांत वरील पुस्तकांचा उपयोग केला आहे आणि त्याबद्दल या सर्व ग्रंथकर्त्यांचे लेखक ऋणी आहेत.)

